


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

## पं. नेहरू विशेषांक

वर्ष १८ वे ] नोव्हेंबर-डिसेंबर १९६४ [ अंक २-३



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किंमत २ रुपये






प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष अठरावे **नवभारत** नोव्हेंबर – डिसेंबर

अंक दुसरा–तिसरा १९६४

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमराववाडी, मुंबई २
फोन नं. २३५५४

अनुक्रमणिका








# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| साधी बांधणी ... | ... ... | ८०·०० |
| कापडी बांधणी ... | ... ... | १०४·०० |
| (२) धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| साधी बांधणी ... | ... ... | १५०·०० |
| कापडी बांधणी ... | ... ... | १८२·०० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला | .... | ४५·०० |
| कापडी बांधणी ... | .... ... | ५३·०० |
| (४) मीमांसादर्शन | ... ... ... ... | ३०·०० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ६ | | २३०·०० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | ... ... | ६·०० |
| (७) बौद्धागमार्थसंग्रहः | .... ... ... | २०·०० |
| (८) हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) | ... | ५·०० |
| (९) वैदिक संस्कृतीचा विकास | ... .. ... | ६·०० |
| (१०) नवमानवतावाद | ... ... ... ... | २·५० |
| (११) मानवाचा आदर्श ... | ... ... ... | ३·०० |
| (१२) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | ... | ३·०० |
| (१३) गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) | ... | २·५० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना ( श्री. चा. अ. दाभोलकर ) | .... | २·०० |

अनुक्रमणिका

प्रा. गोवर्धन पारीख

# पंडित जवाहरलाल नेहरू

पंडित जवाहरलाल नेहरूंच्या निधनाने भारतीय राजकारणातील 'नेहरूयुग' संपले असे वेळोवेळी म्हटले जाते. या विधानाचा प्रस्तुत लेखात थोडासा विचार करावयाचा आहे.

पंडितजींच्या जीवनाचे एक महत्वाचे वैशिष्ट्य म्हणजे स्वातंत्र्यपूर्व आणि स्वातंत्र्योत्तर अशा दोन्ही काळात ते प्रभावी झाले हे होय. लढा आणि रचना अशा दोन्ही कार्यांत चमकलेले व्यक्तिमत्त्व क्वचितच आढळते. नेत्याचा राज्यकर्ता झाला की सामान्यतः लोकप्रियतेला ओहोटी लागायची; परंतु पंडितजींच्या बाबतीत मात्र उलटाच अनुभव आला. यामुळे त्यांची थोरवी वादातीतच म्हटली पाहिजे. युग म्हणजे त्यांचे जीवन, त्यांच्या प्रत्यक्ष कर्तृत्वाचा काळ असा साधा अर्थ घेतल्यास नेहरूंच्या निधनाने नेहरूयुग संपले या विधानाचा फारसा विचार करण्याची गरज शिल्लक राहात नाही. भारतीय राजकारण या एका व्यक्ती-भोवती फिरत होते, ही द्वारका या एका खांबावरच उभी होती एवढेच त्यातून सूचित होईल. जीवनाला 'युग' म्हणून संबोधण्याचे स्पष्टीकरण झाले की प्रश्न संपला. आणि याबाबत नेहरूंच्या कर्तृत्वाविषयी मुळीच संदेह नाही.

तथापि या अर्थाने 'युग' शब्दाचा वापर करीत असताना ते संपले म्हणजे इतिहासाचे एक पान उलटले गेले आहे, आता यापुढे नवे आणि वेगळे काहीतरी घडावयाचे आहे, दोन पानात फारसा संबंध शोधण्याचे कारण नाही, असा ध्वनी निघतो. कालाच्या प्रवाहात, ऐतिहासिक घटनांच्या ओघात हे एक मर्यादित सत्य ठरते. प्रवाहाचे असे खंड पाडता येत नाहीत; घटनांना अशा प्रकारे काळाच्या कप्प्यात बंदिस्त करता येत नाही. यामुळे मागे जे घडले त्याचे परिणाम पुढील काळावर होणारच. तथापि वरील विधानाने या परिणामांची तात्कालिकता सूचित होत असते. ही तात्कालिकता जेथे नसते, उलट हे परिणाम चिरस्थायी स्वरूपाचे जेव्हा दिसू लागतात तेव्हा 'युग' संज्ञेला निराळाच अर्थ येऊ लागतो. निधनाने कर्तृत्व संपते पण कार्य चालूच राहाते. प्राणज्योत मालवली असली तरी प्रकाश मात्र कायम राहील असे उद्गार नेहरूंनी गांधींच्या महानिर्वाण प्रसंगी काढले होते; आणि अनेकांनी नेहरूंच्या निधनप्रसंगी नेहरूंविषयी ते पुनः काढले आहेत; त्यांची यथार्थता वरील दृष्टीनेच स्पष्ट होऊ शकते. पंडितजींच्या राजकीय जीवनात सातत्याने प्रेरणा देण्याचे सामर्थ्य आहे काय? आणि असले तर ते नेमके कशात आहे? या प्रश्नाचा ऊहापोह होणे जरूर आहे. जवाहरलाल नेहरूंना युगपुरुष म्हणता येईल काय हा सवाल येथे विचारात घ्यावयाचा आहे.

स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वीचे पंडितजींचे राजकीय जीवन हे गांधीयुगाच्या आधीच सुरू झाले. त्याचा आरंभ १९१२ साली त्यांच्या बांकीपूर काँग्रेस अधिवेशनातील उपस्थितीपासून झाला. १९१३ साली ते "संयुक्त प्रांत काँग्रेस संघटनेत" सामील झाले. तथापि १९१७ पर्यंत त्यांनी राजकारणात खराखुरा प्रवेश केलाच नाही असे म्हणता येईल. त्यावर्षी जून महिन्यात बेझंट बाईंना स्थानबद्ध करण्यात आले; आणि पंडितजींनी राजकारणात उडी घेतली. होमरूल लीगच्या अलाहाबाद शाखेची स्थापना करून ते तिचे सरचिटणीस झाले. तथापि त्यांच्या जीवनात खरी क्रांती झाली जालियनवाला बागेच्या हत्याकांडामुळेच. गांधींचे नेतृत्व त्यांनी स्वीकारले आणि सुमारे दीड वर्षाच्या तीव्र मतभेदानंतर आपल्या तेजस्वी पित्याचेही त्या दिशेने मन वळवले. १९२१ च्या सत्याग्रह आंदोलनात दोघांनाही प्रथम अटक झाली.

अशा प्रकारे स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वीचे पंडितजींचे सुमारे पंचवीस वर्षांचे राजकीय जीवन गांधीयुगात व्यतीत झाले. याच काळातील आरंभीच्या पाचसात वर्षांत त्यांना अखिल भारतीय कीर्तीचे स्थान मिळाले.







विद्यार्थीदशेतच समाजवादी विचारांचे काहीसे आकर्षण निर्माण झाले होते; त्याला १९२७ च्या सोविएट रशियाच्या भेटीने नवा उजाळा आला. राष्ट्रवादी भूमिका प्रथमपासून होतीच. तिचे जहाल स्वरूप हळूहळू प्रकट होत गेले. या जहाल भूमिकेमुळे गांधींशी झालेले मतभेद कॉंग्रेस संघटनेने संपूर्ण स्वातंत्र्याचे एकमताने ध्येय मान्य केल्यानंतर मिटले; आणि गांधींच्या नेतृत्वाच्या आकर्षणाचे स्थान गांधीवादाच्या मनावरील पकडीने घेतले. स्वातंत्र्यपूर्व काळात पंडितजींच्या व्यक्तिमत्त्वाचा स्वातंत्र्य आंदोलनावर ठसा उमटला खरा, पण तो मुख्यतः गांधीवादाच्या व राष्ट्रवादाच्या पार्श्वभूमीवरच. त्यांचे वैचारिक जीवन या पार्श्वभूमीशी सर्वस्वी संवादी होते असे नाही. किंबहुना ते तसे नसल्यामुळे निर्माण होणारा मनातील संदेह त्यांनी वेळोवेळी प्रकटही केला होता. या पार्श्वभूमीशी ते एकरूप कधीही झाले नाहीत. परंतु तिच्यापासून अलगही झाले नाहीत. त्यांना काहीसे स्वतंत्र मानाचे स्थान होते; इतरांपेक्षा ते वेगळे आहेतसे वाटे. इतरांविषयी विशेष आदर नसलेले देखील त्यांच्याकडे आकर्षिले जात. यामुळे अनेक आधुनिक विचारांच्या तरुणांना राष्ट्रीय आंदोलनाकडे आकर्षित करण्याचे काम त्यांनी केले. गांधींव्यतिरिक्त दुसरे अशा प्रकारचे प्रभावी व्यक्तिमत्त्व राष्ट्रीय आंदोलनात नव्हतेच. सुभाषबाबू बंडखोरीमुळे बाजूला गेले, राजाजी वास्तव दृष्टिकोणामुळे मागे पडले. मानवेंद्रनाथ रॉय उशीरा आले व निष्ठा, वैचारिक प्रखरता व त्यानुसार वर्तन यामुळे प्रभावळीत येण्यापूर्वीच बाहेर पडले. चौकटीत चमकले नेहरूच. त्या चौकटीच्या मर्यादा कोणत्याही निर्णायक प्रसंगी त्यांनी ओलांडल्या नाहीत.

असे असूनही पंडितजींविषयी वेगळाच आदर निर्माण होण्याचे एक कारण म्हणजे त्यांचे काहीसे स्वतंत्र व्यक्तिमत्त्व होय. यामुळेच स्वातंत्र्यपूर्व काळातील कॉंग्रेसमधील काही प्रवृत्तींचे श्रेय पंडितजींकडेच जाते. राजकीय ध्येयाला अधिक जहाल स्वरूप देण्याचे कार्य पंडितजींचेच. "डोमिनियन स्टेटस" ऐवजी संपूर्ण स्वातंत्र्य हे ध्येय मान्य होण्याला मुख्यत्वे त्यांचेच प्रयत्न जबाबदार होते. ध्येयवाद प्रखर झाल्यामुळे गांधीवादातील साधनांबाबतच्या आग्रहाविषयी त्यांना शंका येई. परंतु कोणत्याही निर्णायक प्रसंगी त्यांनी गांधीवादाला बाध येऊ दिला नाही. थोड्याफार प्रमाणात का होईना पण राजकीय ध्येयाचा सामाजिक आशय स्पष्ट करण्याचे कॉंग्रेसमधील प्रयत्नही पंडितजींचेच. कराची अधिवेशनातील मूलभूत हक्कांचा ठराव, फैजपूरचा शेतीसुधारणेचा कार्यक्रम हे त्यांच्याच प्रयत्नांचे परिणाम. समाजवादाचा कॉंग्रेस व्यासपीठावरून हिरीरीने पुरस्कार करणारे पंडितजीच. पण येथेही त्यांनी आपली भूमिका राष्ट्रीय ऐक्याला तडा जाईल इतपत कधीच ताणली नाही; किंवा सरळ वर्गविग्रहाचा पाठपुरावाही केला नाही. भारतीय स्वातंत्र्यलढ्याचा अर्थ जागतिक घडामोडींच्या पार्श्वभूमीवरच लावला पाहिजे ही जाणीव कॉंग्रेसमध्ये निर्माण करण्याचे प्रयत्नही पंडितजींचेच. ॲबिसिनिया, स्पेन, चीन इ॰ राष्ट्रांतून आपलीच लढाई लढली जात आहे असे कॉंग्रेसच्या व्यासपीठावरून स्पष्टपणे सांगणारा हा नेता. तथापि दुसऱ्या महायुद्धात मात्र त्याने राष्ट्रीय दृष्टिकोणालाच महत्व दिले आणि आंतरराष्ट्रवाद त्याच्या आड येऊ दिला नाही. तात्पर्य, चौकटीत चमकणारे असेच हे नेतृत्व होते असे म्हणण्यास हरकत नाही. राष्ट्रवादाला गांधीवादाच्या मर्यादा होत्या. समाजवादाला राष्ट्रवादाच्या मर्यादा होत्या. आंतरराष्ट्रवाद राष्ट्रवादालाच पुष्टी देणारा होता.

या मर्यादांमुळे निर्णायक प्रसंगी विचार व कृती यात अंतर पडत आहेसे वाटे. सर्वांना आशा वाटायची पण समाधान मात्र फारसे कोणाचेच होत नसे. विचारात गगनाला गवसणी घालणारी भरारी दिसे, पण कृतीत संशय निर्माण होई, पाऊल अडखळत आहेसे वाटे, सर्वच भूमिकात अंशसत्याचा साक्षात्कार होऊ लागे. आरंभी ठामपणाने मांडलेल्या विचारात नंतर अडचणी दिसू लागत, बारकावे व खाचाखोचांचा प्रत्यय येई. यामुळे पंडितजींना हवे आहे तरी काय असा अनेकांना प्रश्न पडे; केवळ टीकाकारच नव्हत तर स्नेही देखील गोंधळात पडत. भारतीय राजकारणातील 'हॅम्लेट' हे त्यांचे वर्णन देखील त्याच काळातले. तात्पर्य, त्यांच्या भूमिकेविषयी प्रश्नच असायचा; ती गृहीत धरून चालणे कोणासही शक्य नव्हते.

पंडितजींना अमर्याद लोकप्रियता प्राप्त झाली. जनतेने आपणांवर केलेल्या अलोट प्रेमाबद्दल पंडितजींनी स्वतः अनेकवार कृतज्ञता व्यक्त केली आहे. त्यांच्या








व्यक्तिमत्त्वाचे अनेक महत्वाचे पैलू होते. थोर नेता; खंदा लढवय्या; लेखक; रसिक; काव्याचा भोक्ता नि विज्ञानाचा पुरस्कर्ता; हसतमुख, राजबिंडे रूप; मोकळा स्वभाव; अत्यंत प्रगल्भ व सुसंस्कृत भावनिक जीवन; उमरावी राहाणी; अशा कितीतरी कारणास्तव निरनिराळया थरातील निरनिराळया लोकांना त्यांच्याविषयी आकर्षण वाटे. सामान्य जनतेचे तर ते एकमेव 'बादशहा'च होते. परंतु सामान्य माणसास त्यांच्या ठिकाणी आपले प्रतिबिंब कधीकाळी दिसले की नाही हा एक प्रश्नच आहे. मला वाटते, जनतेपासून ते नेहमीच दूर होते; आणि त्या अंतरातच त्यांच्या विषयीचे आकर्षण होते. हिमालयाच्या उत्तुंग शिखराचे ते आकर्षण होते. कधीच जिथे पोहोचता यावयाचे नाही अशा स्थानाचे ते आकर्षण होते. या आकर्षणात भ्रमनिरासाचा संभवच मुळी कमी. उलट, त्या शिखराकडे पाहाताना सभोवतालच्या खाचखळग्यांचा मुळी विसरच पडायचा. त्यांच्या विचारांची भरारी पहावी आणि आपले कृतीचे दौर्बल्य विसरावे हीच अनेकांची तऱ्हा. त्यांच्या इच्छेविरुद्ध काहीही झाले नाही हे खरे. पण त्यांच्या विचारांशी व भावभावनांशी कितीजण सहमत होत होते हा एक प्रश्नच आहे.

स्वातंत्र्यपूर्व काळातील पंडितजींच्या कर्तृत्वाचा काळ हा साम्यवादाच्या उदयाचा काळ होता. जगातील अनेक थोर थोर विचारवंत या विचाराकडे आकर्षिले जात होते. सोविएट क्रांतीमुळे एक नवी आशा निर्माण झाली होती. पंडितजींचे संवेदनशील मनही तिकडे आकर्षित झाले असल्यास नवल नाही. काँग्रेसच्या व्यासपीठावरून हा विचार मांडणारे पंडितजीच. गांधीवादाच्या मर्यादा सांभाळून त्याकडे जाण्याचा त्यांचा प्रयत्न होता. हे मर्यादित स्वरूपातच-शक्य होते यामुळे त्याना एक प्रकारची खंत वाटत आहे की काय अशी शंका येई. आपल्या वर्तनाचा विचार करताना अनेक वेळा ते साम्यवादाचा तुलादंड वापरीत असावेत असे वाटे. यामुळे कित्येक वेळा सकृद्दर्शनी आकर्षक पण वस्तुस्थितीशी संबंध नसणारे मार्गही ते पुढे मांडीत. उदाहरणार्थ, परकीय राज्यसत्तेची पकड पक्की असतानाच नॅशनल प्लॅनिंग कमिटीचा त्यांनी उभा केलेला संसार. अनेक उपसमित्या नेमल्या गेल्या. आर्थिक जीवनाच्या निरनिराळया क्षेत्रात विकास कसा करायचा याविषयी खल होऊन कित्येक अहवालही प्रसिद्ध झाले. या सर्व कामाकडे पुनः कोणी ढुंकूनही पाहिले नाही हे प्रसिद्ध आहे. आणि सहकाऱ्यांनीही बहुधा हे एक खूळ आहे असे समजून तिकडे फारसे लक्ष दिले नसावे. द्विराष्ट्रवादाच्या राजकारणाचे दुसरे उदाहरण. एकीकडे फाळणीचे राजकारण जोरात होते आणि दुसरीकडे पंडितजी मुसलमान जनतेशी संपर्क साधण्याच्या गोष्टी बोलत होते. येथील सामान्य जनतेच्या मनावर धर्माचा विलक्षण पगडा यामुळे हा मार्ग यशस्वी होणे अशक्य होते. राजाजींनी हे ओळखले आणि समझोता करून हा प्रश्न मिटवावा अशी भूमिका घेतली. पण पंडितजींना ते मुळीच पटले नाही. पुण्याच्या अ. भा. काँ. कमिटीच्या बैठकीत दोघांचा उडालेला खटका प्रसिद्ध आहे. धर्म, जाति, इत्यादीपेक्षा आर्थिक हितसंबंध हे अधिक प्रभावी ठरू शकतील अशी पंडितजींची श्रद्धा होती. पुढे अनुभव मात्र वेगळाच आला. असो.

तथापि कोणत्याही घटनांचा पंडितजींच्या लोकप्रियतेवर मात्र मुळीच परिणाम झाला नाही. गांधींनी त्याना आपले राजकीय वारस म्हणून केव्हाच जाहीर केले होते आणि लोकही त्यांच्याकडे त्याच अपेक्षेने पहात होते. तथापि प्रत्यक्ष लढ्याचे नेतृत्व करीत असताना देखील पंडितजींनी संघटनकार्याकडे फारसे कधीच लक्ष दिले नाही. यामुळे प्रत्यक्ष संघटनेपासून ते काहीसे दूरच होते. आणि हे कार्य सांभाळणारे मातब्बर सहकारीही नेत्यांच्या प्रभावळीत होते. पंडितजींची अमर्याद लोकप्रियता हाच त्यांचा मोलाचा आधार; एरवी ते एकाकीच होते. ही लोकप्रियता संघटनेसाठी अत्यावश्यक असल्याने अग्रपूजेचा मान त्यांच्याकडे जाई. पण तिच्यामुळे इतरांच्या मनात अनेकदा हेवा वा मत्सर तर निर्माण होणार नाही ना अशीही भीती वाटे. पहिले असले तरी पंडितजी तुल्यबल सहकाऱ्यांतच पहिले होते. यामुळे पुढे काय याविषयी चिंता वाटे. त्यांचे व त्यांच्या सहकाऱ्यांचे अनेक बाबतीत मतभेद असल्याचाही गवगवा होता.

१९३७ च्या निवडणुकांनंतर फाळणीच्या राजकारणाला प्रारंभ झाला व भारतीय राष्ट्रवाद अडचणीत सापडला. धर्मातील अध्यात्म व नीतितत्त्वे यावर भर

देऊन धार्मिक अधिष्ठानावरून मानवी समता प्रतिपादन करणारा व हिंदु मुसलमान ऐक्य घडवून आणू पहाणारा गांधींचा मार्ग निष्प्रभ ठरला होता. आणि पंडितजींनी दर्शविलेला जनतासंपर्काचा उपायही फसला होता. द्विराष्ट्रवादाच्या राजकारणाने एक भयंकर राजकीय कोंडी निर्माण होत होती. तिच्यातून बाहेर पडणे प्रत्यही कठीण होत होते. अखेरीस या जहाल राष्ट्रवादी नेत्याला फाळणीला मान्यता द्यावी लागली. राष्ट्रीय आंदोलनाचा सर्वात मोलाचा, विजयाचा क्षण हा अशा प्रकारे पराभवाचाही क्षण होता. फाळणीतून हजारोंच संसार उध्वस्त झाले, लक्षावधी निर्वासित बनले. सर्वत्र भावनांचा भडका उडाला. गुण्यागोविंदाने एकत्र राहणारी माणसे क्षणात एकमेकांच्या जीवावर उठली. सर्व प्रकारच्या युद्धात अत्यंत भयावह म्हणजे यादवी युद्ध. त्याच्या खायीत सारे राष्ट्र लोटले जाते की काय अशी भीती निर्माण झाली.

याच क्षणी गांधींची नैतिकता व नेहरूंची मानवता याचा उत्कृष्ट प्रत्यय राष्ट्राला आला. पंचवीस वर्षांच्या प्रयत्नांनी जे साधले नाही ते ऐक्य साधण्यासाठी राष्ट्रपित्याने सर्वस्व पणाला लावले आणि अखेरीस हौतात्म्य पत्करले. आणि त्याच ऐक्याच्या शोधात सुरक्षिततेची, जीवाची यत्किंचितही तमा न बाळगता पंतप्रधान राजधानीच्या रस्त्यारस्त्यातून प्रक्षुब्ध जमावाला शांत करीत भटकू लागले. पंडितजीचे हे दर्शन अगदी भिन्न होते; त्यात त्यांच्या जनतेवरील अलोट प्रेमाचा साक्षात्कार होता. माणुसकीचा तो एक उत्कट आविष्कार होता. दुभंगलेली मने सांधण्याची नैतिक हिंमत त्यात होती; भंगलेल्या संसारांना दिलासा होता; पराभूत मनोवृत्तीने सर्वनाशास उद्युक्त झालेल्या प्रक्षुब्ध माथेफिरूंना पुनः कह्यात आणण्याचे सामर्थ्य होते. दंडसामर्थ्याने जे कधीही साधले नसते ते या नेत्याच्या जनतेवरील अलोट प्रेमाने शक्य झाले. राष्ट्राला त्या क्षणी पंडितजी जसे दिसले तसे ते पुनः कधीच दिसले नाहीत; परंतु फक्त तेच दिसले, अन्य कोणीही दिसला नाही; आणि तेच शांत करू शकले, अन्य कोणीही करू शकला नसता. गांधींचे खरे वारस नेहरूच याचा प्रत्यय देणारा तो क्षण होता. दुरून आकर्षित करणाऱ्या उत्तुंग शिखराचे सर्वांना सावली देणाऱ्या महान वटवृक्षात रूपांतर त्या क्षणी झाले. आणि पंडितजींच्या राष्ट्रनिर्माण कार्याला आरंभ झाला.

राष्ट्रनिर्माणाचे कार्य पंडितजींनी अखेरपर्यंत केले. त्यांच्या सतरा वर्षांच्या कारकीर्दीतील घडामोडी वा तिची फलश्रुती यांचा येथे सविस्तर विचार करावयाचा नाही. वास्तविक या घटनांच्या आपण इतके जवळ आहोत की त्यांच्याविषयी वस्तुनिष्ठ रीतीने विचार करणे देखील अत्यंत कठिण आहे. एका परीने हा विषय समकालीनांनी हाताळण्याऐवजी भावी इतिहासकारांवरच तो सोपवणे अधिक श्रेयस्कर ठरते. हे सामान्यतः मान्य करूनही आज त्याविषयी लिहिण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे असे म्हणावे लागते. एक म्हणजे पंडितजी काल होते आणि आज नाहीत या घटनेविषयी समकालीनांची प्रतिक्रिया व्यक्त होणे अपरिहार्य आहे. आरंभी या प्रतिक्रियांतून दुःखाची भावना व्यक्त झाली असली तरी नंतर मात्र तिच्यातून विविध प्रकारचे विचार वर येऊ लागले. आणि असे होताच ज्यांनी त्यांचे कधीही ऐकले नाही, अनुयायित्वाचा ज्यांच्यावर कोणीही सहसा आरोप करणार नाही असे लोक पंडितजींविषयींच्या एकनिष्ठतेची ठेकेदारी मिरवू लागले असून "अमूक त्यांच्या धोरणानुसार नाही", "तमुक त्यांच्या भूमिकेविरुद्ध आहे", अशा प्रकारची हाकाटी करताना दिसत आहेत. यामुळे समकालीनांनाही त्यांच्या कार्याविषयी विचार करणे आवश्यक झाले आहे. दुसरे म्हणजे अलोट लोकप्रियता आयुष्यभर उपभोगणारा हा नेता जाताच अत्यंत अनपेक्षित स्वरूपाच्या प्रतिक्रिया व्यक्त होऊ लागल्या आहेत. जणु काही स्वातंत्र्योत्तर काळातील गेली सतरा वर्षे अगदी व्यर्थच गेली असे म्हणणारे काही दिसतात. लोक पंडितजींना विसरले अशी भीती काहींना वाटते. पंडितजींचे यश पंडितजींबरोबरच-किंबहुना ते जाण्याच्या आधीच-लयाला गेले असे कोणी सुचवतात. या प्रतिक्रियात तथ्य नाही उलट सकृद्दर्शनी या प्रतिक्रिया वास्तव वाटतात. तथापि ही वास्तवता आमच्या भावनात्मक जीवनाचा विलक्षण उथळपणा दर्शविणारी असल्याने अत्यंत खेदजनक म्हटली पाहिजे. कालपर्यंत ज्यांच्याविषयी अलोट भक्ती व प्रेम व्यक्त होत होते ते गृहस्थ नाहीसे होताच सर्वत्र त्यांच्याविषयी उदासीनता दिसू लागावी हे एक आश्चर्यच म्हटले










पाहिजे. याचा उलगडा होणेही जरूर आहे, असे वाटते.

पंडितजींची अमोल आणि सातत्याने प्रेरणा देऊ शकेल अशी देणगी म्हणजे आजची भारतीय लोकशाही ही होय. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर स्थापन झालेल्या मंत्रीमंडळात त्यांचे अनन्यसाधारण स्थान होते; सारे 'कर्तुमकर्तुम्' सामर्थ्य त्यांच्याठिकाणी एकवटले होते. अवघ्या तीन वर्षांत सरदार पटेल गेल्यानंतर तर पंडितजी करतील ती पूर्वदिशा अशीच अवस्था होती. यामुळे सर्वाधिकार हाती घ्यावयाचे म्हटल्यास त्यांच्या मार्गात कसलीही अडचण नव्हती, कोणाचाही प्रतिकार होण्याचा संभव नव्हता. किंबहुना फाळणीने दुखावलेल्या अंतःकरणांनी "आता तरी समर्थ बनण्याचे प्रयत्न आपण करावयास नकोत काय ?" असे म्हणत अशा प्रयत्नाला पाठिंबाच दिला असता. भारतीय जनमानसाला त्या दिशेने कलाटणी देण्याचे काम पंडितजींना सहज लीलेने करता आले असते. पंडितजींच्या सतरा वर्षांच्या कारकीर्दीबद्दल कोणतीही टीका होवो वा कितीही प्रमाद दाखवले जावोत, परंतु या एका अमोल ठेव्याबद्दल भारतीय जनतेला त्यांचे कायमचे ऋणी राहावे लागेल यात मुळीच संशय नाही. त्यांच्या सभोवतालच्या वातावरणाकडे क्षणभर नजर टाकल्यास त्यांच्या अलौकिकतेची क्षणार्धात साक्ष पटल्यावाचून राहात नाही. बारीकसारीक स्थानांचा देखील कैफ चढणारे, सत्तेचा अमर्याद हव्यास धरणारे व वेळीअवेळी योग्यायोग्यरीतीने तिचा वापर करणारे, अमर्याद सत्तास्पर्धेत अहर्निश अडकलेले शेकडो लहानमोठे हुकूमशहा त्यांच्या सभोवती सतत वावरत होते; आणि त्या सर्वांच्या मध्ये उभा असलेला हा 'शाहेनशहा' लोकशाहीचा संदेश देत होता, तिचा पाया घालण्याचा प्रयत्न करीत होता. त्यांच्या विचारांशी व भावनांशी समरस होणारे अपवादभूतच होते; पाठिंबा सारेच देत होते पण जाणीवयुक्त पाठिंबा देणारे क्वचितच दिसत. मात्र, त्यांच्या निष्ठेविषयी कोणालाही—अगदी कट्टर विरोधकालाही-शंका नव्हती. पंडितजी हे केवळ पक्षनेते नसून राष्ट्रनेते आहेत अशी ग्वाही विरोधकही देत; आणि यामुळेच प्रभावी विरोधी पक्ष निर्माण होण्यासाठी त्यानी साहाय्य करावे असे आर्जवून सांगत हे प्रसिद्ध आहे.

लोकशाहीच्या दिशेने पडलेले पहिले महत्वाचे पाऊल म्हणजे भारतीय राज्यघटना हे होय. राज्यघटनेची चर्चा येथे प्रस्तुत नसली तरी तिची दोनतीन वैशिष्ट्ये मात्र नमूद करणे आवश्यक आहे. एक म्हणजे एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेची तिच्यात झालेली अभिव्यक्ती हे होय. भारतीय राज्यघटना ही संयुक्त (फेडरल) प्रजासत्ताकाची राज्यघटना असली तरी प्रांतांच्या भौगोलिक सीमांना तिच्यात मुळीच महत्व नाही. या सीमा संसदेला हव्या तेव्हा हव्या तशा बदलता येतील. भारताचा नकाशा संसदेने आडव्या उभ्या कशाही रेषा मारून बदलावा अशा प्रकारचा अधिकार घटनेने संसदेला दिला आहे. आणि याच्याशीच संबंधित अशी दुसरी गोष्ट म्हणजे एकाच प्रकारचे म्हणजे केवळ भारतीय नागरीकत्व घटनेने मान्य केले आहे ही होय. संयुक्त प्रजासत्ताकाचे व प्रांताचे अशा दोन प्रकारच्या नागरीकत्वाची कल्पना तिच्यात नाही. त्याबरोबरच अत्यंत व्यापक स्वरूपाचे नागरिकांचे मूलभूत हक्क तिच्यात अंतर्भूत करण्यात आले असल्याने नागरीक स्वातंत्र्याला घटनात्मक संरक्षण देण्यात आले आहे. घटनेचे स्वरूप संसदीय लोकशाहीचे आहे. संयुक्त राज्यघटना असूनही राज्यसभेचे स्वरूप ठरविताना घटकराज्यांना समान प्रतिनिधित्व देण्याची कल्पना तिच्यात नाही. न्यायदानाचे अबाधित स्वातंत्र्य आणि सत्तेच्या विकेंद्रीकरणाची तरतूद यांनाही घटनेत स्थान आहे. तात्पर्य, लोकशाही म्हणूनच स्वतंत्र भारताचा राष्ट्रीय विकास व्हावा अशीच ही घटना आहे.

राज्यघटनेचे श्रेय केवळ पंडितजींना देता येईल काय ? असा प्रश्न यावर निर्माण होऊ शकेल. आणि तो यथार्थही आहे. राज्यघटनेचा आराखडा तयार करण्याचे श्रेय डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना दिले जाते; आणि तिचे स्वरूप निश्चित करण्याचे कामी अनेकांचे प्रयत्न उपयोगी पडले हेही प्रसिद्ध आहे. तथापि घटनासमितीत पंडितजी ही अशी एक शक्ति होती की जिला मनात आणल्यास घटनेचे स्वरूप बदलणे अशक्य नव्हते. तात्पर्य, घटनेला राजकीय सँक्शन देणाऱ्या व्यक्तींमध्ये पंडितजींची प्रामुख्याने गणना करावी लागेल. आणि राज्यघटनेच्या बाबतीत हीच खरी महत्वाची गोष्ट आहे. यामुळेच तिला स्थैर्य प्राप्त






झाले हेही उघड आहे. पंडितजींनी केवळ लोकशाही घटनाच निर्माण करण्यास सहाय्य केले इतकेच नव्हे तर आपल्या सतरा वर्षांच्या कारकीर्दीतील प्रत्यक्ष आचरणाने व राजकीय व्यवहाराने तिला मजबुती आणण्याचा प्रयत्न केला असे म्हटले पाहिजे.

या दृष्टीने राज्यघटनेच्या निर्मितीप्रमाणेच ती तयार केल्यानंतरचा प्रत्यक्ष व्यवहार हाही महत्वाचा म्हणावयास पाहिजे. भारत ही जगातील सर्वांत मोठी लोकशाही. ती कितपत टिकू शकेल याबद्दल सर्वांनाच स्वाभाविकपणे थोडीफार शंका वाटे. घटना प्रत्यक्ष तयार करणारे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी आमची लोकशाही ही केवळ दिखाऊ स्वरूपाची आहे अशा अर्थाचे उद्गार काढल्याचे प्रसिद्ध आहे. असे असूनही पंडितजींचे सर्व प्रयत्न लोकशाहीला स्थैर्य प्राप्त होण्याच्या दिशेनेच होत राहिले हें कोणासही मान्य करावे लागेल. या सतरा वर्षांत तीन सार्वत्रिक निवडणुका खुल्या, स्वतंत्र व शांततापूर्ण वातावरणात पार पडल्या. पंडितजी व त्यांचा पक्ष यावर टीका झाली; त्यांना आव्हानही दिले गेले व प्रसंगी ते यशस्वीही झाले. केरळ, ओरिसा, महाराष्ट्र इ० उदाहरणे या संदर्भात नमूद करण्यासारखी आहेत. तथापि अडचणीत सांपडल्यानंतर देखील या वातावरणाला मुरड घालण्याचा प्रयत्न पंडितजींनी कधीही केला नाही. निवडणुकीत स्वतः पंडितजींना देखील प्रखर विरोध झाला. परंतु पंडितजींनी कोणाही व्यक्तीविरुद्ध राज्यसत्तेचा उपयोग करण्याचे मनात आणले नाही. अगदी अलीकडे प्राशन कराव्या लागलेल्या गोष्टींतील हालाहलाचे ताजे उदाहरण हेच दर्शविणारे आहे. त्याबरोबरच सत्तेचे विकेंद्रीकरण, सहकारी आंदोलनाची वाढ व त्याचे स्वातंत्र्य अबाधित राखण्याचे प्रयत्न, घटनेतील मूलभूत हक्कांची बूज राखण्याचा प्रयत्न, सर्व प्रकारच्या विरोधी पक्षांचे स्वातंत्र्य अबाधित राखण्याचे प्रयत्न इ० इतरही कितीतरी गोष्टी या संदर्भात नमूद करता येण्यासारख्या आहेत. पंडितजींच्या कारकीर्दीच्या उत्तरार्धात तर मागासलेल्या राष्ट्रातील संसदीय लोकशाही भराभर ढासळू लागली होती. आणि त्यामुळे भारतातही या घटनेचे पडसाद म्हणून पाश्चात्य पद्धतीची ही संसदीय लोकशाही आमच्या येथे रुजू शकणार नाही असे अभिप्राय व्यक्त होऊ लागले होते. मूलगामी (बेसिक) लोकशाही, मार्गदर्शित (गायडेड) लोकशाही इ. पर्यायाविषयी कुतूहल व्यक्त होऊ लागले होते. पण यामुळे पंडितजींची निष्ठा मात्र मुळीच ढळली नाही हे प्रसिद्ध आहे.

लोकशाहीलाच बळकटी आणण्याच्या हेतूने पंडितजींनी आरंभिलेले कार्य आणखी दोन दृष्टींनी उल्लेखनीय आहे. एक म्हणजे त्यांनी पुरस्कारलेली ऐहिक राज्याची कल्पना; आणि दुसरी म्हणजे आर्थिक नियोजनाला त्यानी दिलेली चालना. फाळणीमुळे राजकीय प्रश्न सुटला नाही हे उघड आहे. देशातील हिंदू व मुसलमान या दोन जमाती नसून ती दोन राष्ट्रे आहेत; आणि म्हणून सत्तासंक्रमणाच्या वेळी देशात दोन स्वतंत्र राष्ट्रांची उभारणी होणे आवश्यक आहे ही भारतीय मुसलमानांची भूमिका फाळणीस जबाबदार ठरली. प्रथम गांधींनी धार्मिक अधिष्ठानावरून या दोन जमातींना एकत्र आणण्याचा प्रयत्न केला, आणि नंतर पंडितजींनी आर्थिक हितसंबंधाचा आधार घेऊन ऐक्य साधू पाहिले. तथापि हे दोन्ही प्रयत्न फसले. फाळणी झाली. तरीदेखील भारतात मुसलमान जमात प्रचंड संख्येने होतीच. यामुळे भारताच्या भावी विकासाच्या दृष्टीने या दोन जमाती गुण्यागोविंदाने एकत्र राहिल्याच पाहिजेत ही गरज कायमच होती. आणि ती पूर्ण करण्याच्या हेतूने गांधींचे वारसदार म्हणून समजले गेलेले पंडितजी निधर्मी किंवा ऐहिक राज्याच्या भूमिकेवर गेले. तात्पर्य, आधुनिक उदारमतवादी व बुद्धिवादी विचारांचा हा विजय होता. या राष्ट्रातील धार्मिक, जातीय, भाषिक इ. भेदाभेदांच्या पार्श्वभूमीवर ऐक्य साधायचे म्हटल्यास सर्वांची सामान्य मानवता हेच अधिष्ठान म्हणून स्वीकारणे शक्य व इष्ट होते, आणि तीच भूमिका पंडितजींनी पुढे मांडली हे स्वाभाविकच म्हटले पाहिजे. परंतु फाळणीच्या संदर्भात ती पुढे मांडणे हे एक असामान्य धैर्याचेच काम होते हे मात्र मान्य केले पाहिजे.

तथापि धैर्याचे असले तरी प्रत्यक्षात साध्य होण्याच्या दृष्टीने मात्र ते एक अत्यंत कठिण काम होते. पंडितजींना या विषयीची जाणीव होती हे उघड आहे. राष्ट्रीय ऐक्याला बाध आणू पाहाणाऱ्या सर्वच निरनिराळ्या प्रवृत्तींचे अधिष्ठान एका परीने धार्मिकच होते. अपवादच करायचा झाला तर तो भाषेचा करता

येईल. परंतु निरनिराळ्या भाषा यादेखील, त्यात उपलब्ध असलेल्या वैचारिक संपदेच्या दृष्टीने बोलायचे झाल्यास, धार्मिक विचारांच्याच वाहनस्वरूप आहेत. आधुनिक विचारांचा त्यांना थोडाबहुत वास असला तरी त्यांचे हृदयाला भिडणारे, भावनिक जीवनाला हेलावणारे, लक्षावधी लोकांना कार्यप्रवण करणारे सामर्थ्य त्यांच्यातून अभिव्यक्त होणाऱ्या धार्मिक आशयामुळेच त्यांच्यात आहे यात शंका नाही. भारतीय भाषा अप्रगल्भ आहेत असे म्हटले जाते; आणि याला "तंत्रविद्या वा आधुनिक विज्ञान ही हवीतर परकीय भाषेतून शिकावीत" अशा स्वरूपाचे उत्तरही दिले जाते. तथापि या क्षेत्राचा परकीय भाषांतून आविष्कार होण्यासाठी तेथे प्रथम अत्यंत मूलभूत स्वरूपाची वैचारिक क्रांती घडली ही जाणीव या उत्तरांतून अनेकवेळा निसटते. आणि या उलट, बहुतेक वेळा ज्ञानाच्या इतर क्षेत्राच्या बाबतीत तरी आमच्या भाषा अन्य कोणत्याही भाषेइतक्याच पुढारलेल्या आहेत असेच सूचित करण्याचा हेतू असतो यात शंका नाही. हा समज भ्रामक आहे असे मला नम्रपणे सुचवावयाचे आहे. भाषांचा विकास मानवी क्रिया-प्रक्रियातूनच होत असतो. विज्ञानाव्यतिरिक्त इतर क्षेत्रात यानी आधुनिक स्वरूप धारण केले आहे असे म्हणणे धाडसाचेच होईल. आधुनिकतेचा साज त्यांनी धारण केलेला आढळतो; पण गाभा मात्र धार्मिकतेचाच !

नवविचारांचे वाहन म्हणून अप्रगल्भ भाषांचा उपयोग करणारा एक मार्ग म्हणजे राज्याने विशिष्ट विचारसरणीचा स्वीकार करणे व तिच्या प्रसारासाठी असा उपयोग करणे हा होय. सोविएट रशियाचे उदाहरण या बाबतीत नमूद करण्यासारखे आहे. तथापि पंडितजींच्या लोकशाही निष्ठेला तो मानवण्यासारखा नव्हता. स्वातंत्र्य हे तिचे अधिष्ठान. उलट ऐहिक वा निधर्मी भूमिकेवरून देखील भाषिक प्रेमाला विरोध करणे समर्थनीय नव्हते. यामुळे इतर सर्व फुटीर प्रवृत्तींवर तुटून पडणारे पंडितजी भाषिक प्रश्नावर डळमळले, गोंधळात पडले, सभोवताली निर्माण होत असलेल्या परिस्थितीशी जुळते घेत गेले. भाषा व राष्ट्र याचा सांधा जुळून एकाऐवजी सोळा स्वतंत्र राष्ट्रे निर्माण होणार की काय ही भीती तर त्यात उघडच होती. परंतु ही सोळा राष्ट्रे देखील भूतकाळाऐवजी भविष्याकडे नजर ठेवणारी असली, आधुनिक जीवनाच्या गरजा योग्य रीतीने ओळखणारी असली तर त्यातून पुनः एक राष्ट्र अत्यंत प्रभावी स्वरूपात उदयाला येऊ शकते हे उघड आहे. या आशेचे एक कारण उघड आहे. कोणत्याही भाषिक गटाला आपला आर्थिक प्रश्न सोडवावयाचा म्हटल्यास तो स्वतंत्र रीतीने सोडवणे सर्वथैव अशक्य आहे. यामुळे आधुनिक जीवनाच्या व मूल्यांचा संदर्भात भाषिक प्रश्न धोक्याचा राहणार नाही. परंतु या संदर्भाचा अभाव असणाऱ्या परिस्थितीतच जर भाषिक अभिमान वाढीस लागला तर त्यातून सर्वनाशच ओढवल्यावाचून राहणार नाही हे उघड आहे. हा अभिमान साधनसामुग्रीचा आर्थिक विकासासाठी क्षमतापूर्वक उपयोग होऊ देणार नाही; अपव्यय करणाऱ्या स्पर्धेला जन्म देईल. विविध प्रकारचे मनोगंड व विकृती निर्माण करील. आणि येथील सामान्य नागरिकाच्या जीवनाचे मौलिक प्रश्न सोडवणे अशक्य करून टाकील ही जाणीव पंडितजींना असावी असे वाटते. सर्वच भाषा राष्ट्रीय भाषा आहेत; इंग्रजी चालू राहिली पाहिजे आणि भाषिक अहंगंड ( लिंग्विझम् ) हा सर्वस्वी त्याज्य होय अशी भूमिका स्वीकारून त्यांनी आपला भावी मार्ग आखला; आणि या प्रश्नाने निर्माण केलेल्या अडचणीतून ते तात्पुरते बाहेर पडले.

तथापि ऐहिकतेची भूमिका या ठिकाणी मान्य होणे कठीण होते. ती प्रभावी व्हावी या दृष्टीने धर्म, राजकारण व आर्थिक नि सांस्कृतिक जीवन याच्या पारस्परिक प्रक्रिया ध्यानात घेऊन अत्यंत सावधगिरीने पाऊले टाकणे आवश्यक होते. आणि पंडितजींच्या कार्यात हे दिसून येते. धर्मविरोधी किंवा नास्तिकाची भूमिका पंडितजींची नव्हती. त्यांची दृष्टी संशयवादी ( अॅग्नॉस्टिक ) होती. आणि त्याबरोबरच शांतता, सुबत्ता, विज्ञान व तंत्रविद्या यांचा ते हिरीरीने पुरस्कार करीत होते. या ऐहिक ध्येयवादावर लक्ष्य केंद्रित झाल्यास सामान्य माणूस अंधश्रद्धेपासून मुक्त होईल, व फुटीर प्रवृत्तींवर मात करू शकेल ही आशा या सर्वांच्या मागे असावी हे उघड आहे. तात्पर्य, एकीकडे प्रचलित प्रवृत्तींच्या मुळाशी असलेला धोका स्पष्ट करीत राहायचे आणि दुसरीकडे नवा ध्येयवाद लोकांच्या मनात रुजवीत जायचे असा दुहेरी

उपक्रम पंडितजींनी चालू ठेवला होता. तथापि येथील जीवनात धार्मिकतेचे प्राबल्यच इतके आहे की त्यामुळे ऐहिकतेची ही कल्पना आमच्या जीवनाच्या केंद्रस्थानी येण्याऐवजी बाजूलाच राहिली; आणि ऐहिक राज्य म्हणजे निरनिराळ्या धर्मांच्या बाबतीत तटस्थ किंवा सर्वच धर्मांना समतेने वागवणारे राज्य असा उथळ व वरवरचा अर्थ तिला प्राप्त झाला.

आधुनिक ध्येये रुजवायची आणि लोकशाही-बद्दलचा विश्वास वाढवून तिला स्थैर्य आणायचे म्हणजे आर्थिक विकासाचे काम झपाट्याने पुढे नेले पाहिजे ही गोष्ट पंडितजी जाणत होते. तथापि या क्षेत्रात एक मोठीच शृंगापत्ती होती. हा प्रश्न दुर्लक्षिण्यात जसा धोका होता तसाच त्याला हात घालण्यातही होता. पहिल्या प्रकारचा धोका उघड आहे. परंतु पंडितजींची खरी मोलाची कामगिरी म्हणजे दुसऱ्या प्रकारचा धोका ओळखून झपाट्याने आर्थिक विकास घडवून आणण्यासाठी नियोजन मार्गाचा अवलंब करीत असताना त्या धोक्यापासून दूर राहण्याचा त्यांचा प्रयत्न ही होय. आर्थिक नियोजनाची कल्पना साम्यवादाशी इतकी निगडीत झालेली होती की तिचा स्वीकार केल्याबरोबर सामाजिक जीवनाचा कल त्या दिशेने झुकू लागणार अशी भीती अनेकाना वाटणे स्वाभाविक होते. योजनांचे प्रत्यक्ष स्वरूप पाहून ही भीती साधार असल्याचाही अनेकांचा ग्रह होऊ लागला होता. झपाट्याने विकास घडवून आणायचा म्हणजे विकासश्रेणीविषयक निर्णयात काही प्रमाणात का होईना पण साम्यवादी नियोजनाचे प्रतिबिंब पडणे स्वाभाविक होते. त्याबरोबरच समाजवादाचा पंडितजींनी केलेला पुरस्कार सर्वांच्या स्मरणात होता. केलेल्या घोषणांची प्रत्यक्ष अंमलबजावणी करण्याची कसोटीची वेळ आलेली होती. भारताला त्याच दिशेने गेले पाहिजे असे मानणारांना ही आयतीच सुवर्णसंधी चालून आली होती. कोणी आतून योजनेच्या स्वरूपाला नवे वळण देण्याची धडपड करीत होते; तर कोणी बाहेरून "हा कसला समाजवाद ?" असे हिणवीत प्रत्यही अधिकाधिक जहाल मागण्या पुढे मांडीत होते.

तिन्ही पंचवार्षिक योजनांचा विकासकार्यक्रम सर्वांना मान्य होईलच असे नाही. स्वतः पंडितजींना देखील दीर्घकालाने फलद्रूप होणाऱ्या मोठमोठ्या योजनांकडे अवास्तव लक्ष देण्याची चूक तर आपण केली नाहीना असा शेवटी शेवटी संशय येऊ लागला होता असे म्हणतात. तथापि येथे त्याविषयी विस्ताराने विचार करण्याची गरज नाही. येथे दोनच मुद्यांचा प्रामुख्याने उल्लेख करणे जरूर आहे. आपल्या नियोजनाचा प्रयोग हा जगात अभूतपूर्व प्रयोग आहे असे त्यांचे आग्रहाचे म्हणणे. आणि याचे कारण म्हणजे ते लोकशाहीच्या मर्यादा पूर्णपणे सांभाळून केले जात आहे असे सांगत. यामुळे त्यासाठी जगात इतरत्र आलेला अनुभव मार्गदर्शक होण्याचा मुळीच संभव नव्हता; फारतर त्यापासून थोडाफार बोध घेता येतील इतकेच. तात्पर्य, येथे महत्त्व लोकशाहीला आणि ती मजबूत व्हावी यासाठी आर्थिक विकासाला. हा विकास ही लोकशाहीची मौलिक गरज आहे म्हणून. आणि एका अर्थाने याच भूमिकेतून निघणारी दुसरीही एक गोष्ट ते पुनः पुनः हिरीरीने सांगत: "मी कोणत्याही पोथीनिष्ठ समाजवादाचा पुरस्कर्ता नाही," समाजवाद म्हटला की अमूक एक गोष्टी केल्याच पाहिजेत या ठोकळेबाज विचारांचा त्यांनी सतत विरोध केला. विषमता नाहीशी करून अधिकाधिक प्रमाणात समाजाचे कल्याण साधणारी गतिमान विचारसरणी यादृष्टीने ते समाजवादाचा पुरस्कार करीत. मार्क्सचा विचार आता जुना झाला असून आजच्या बदललेल्या परिस्थितीत त्यांतील कित्येक भाग त्याज्य ठरले आहेत असे त्यांनी म्हटल्याचे प्रसिद्ध आहे. मार्क्सच्या विश्लेषणात प्रतिबिंबित झालेल्या भांडवलशाहीच्या मानाने आजची अर्थव्यवस्था कितीतरी भिन्न व गुंतागुंतीची झाली आहे याची जाणीव त्यांना होती. ही बदललेली भांडवलशाही कायम राहू शकेल असे त्यांना कधीच वाटले नाही; पण त्या बरोबरच ती बदलण्याच्या बाबतीत त्यांनी कसलीही पोथीनिष्ठ भूमिकाही स्वीकारली नाही. यामुळे नियोजित अर्थव्यवस्थेचा स्वीकार करूनही तिची हुकूमशाहीत होणारी परिणती टाळता येणे शक्य झाले. आर्थिक जीवनात यामुळे एक प्रकारची अनिश्चितता आली असे म्हणता येईल. लोकशाही व समाजवाद ही एकत्र जाऊ शकतील की नाही याबद्दल काही दोहोंचा पुरस्कार करणारांनीही संशय व्यक्त केले. परंतु हा प्रश्न तात्विक भूमिकेवरून सोडविण्याचा प्रयत्न पंडितजी करीत नव्हते. त्यांनी ते एकमेकाशी जुळते करून घेण्याचा एक प्रचंड सामाजिक प्रयोग आरंभिला होता. त्यातील अडचणी वा आंतर्विरोधांनी ते अडखळले नाहीत. तथापि त्याच्या परिणामांविषयी मात्र ते चिंतनशील असावेत असे दिसते.





अनुक्रमणिका

अंतर्गत जीवनातील या भूमिकेचाच आविष्कार त्यांच्या परराष्ट्रविषयक धोरणातही झाला होता असे म्हणता येईल. पंडितजींची शीतयुद्धातील तटस्थतेची भूमिका येथे विचारात घेणे जरूर आहे. पूर्व किंवा पश्चिम, रशिया वा अमेरिका यातील कोणतीही बाजू न घेण्याची भूमिका ही एका अर्थाने दोन्ही पर्याय त्याज्य समजणारीच भूमिका होती. आणि ते त्याज्य मानावयाचे म्हटले की तिसरा मार्ग शोधून काढण्याची नैतिक जबाबदारी तिच्यातून आपो-आपच उद्भवत होती. या जबाबदारीची अभावात्मक पूर्तता शांततेच्या पुरस्कारातून होत होती. अण्वस्त्रांच्या युगातील युद्धाचा धोका पंडितजींना स्पष्ट दिसत होता. गांधींचा शांततेचा संदेश तंत्रविद्येच्या आत्यंतिक विकासावस्थेत नव्याने अर्थपूर्ण बनला होता. आपल्या 'गुरूचे' म्हणणे अजूनही महत्वपूर्ण आहे; जगाला त्यावाचून दुसरा तरणोपाय नाही ही कल्पना एक प्रकारचा नवा आत्मविश्वास निर्माण करण्यास समर्थ होती. यामुळे पंडितजींनी त्या संदेशाचा पाठपुरावा करावा यात आश्चर्य नाही. आणि या आत्मविश्वासातूनच पंचशील जन्मास आले. जागतिक पार्श्वभूमीवरील पंडितजींच्या कर्तृत्वाचा तो एक उच्च बिंदू होता असे मला वाटते.

परंतु भावी अडचणींची व धोक्याची बीजेही त्यांतच होती. आणि त्या अडचणींचा प्रत्यक्षात प्रत्यय येण्याला काही अंशी पंडितजींचा एकाकीपणाही कारणीभूत झाला. त्यांचे स्थानच असे होते की कोणी फारसा त्यांच्यापर्यंत पोहोचतच नसे. आणि पोहोचणारे मोकळेपणाने बोलत नसत. जसजसा काळ लोटत होता तसतशी पंडितजींची उंची वाढत होती व सभोवतालच्या माणसांनी कमी होत होती, यामुळे निश्चित व मोकळेपणाने बोलू शकतील असे सल्लागार जवळ जवळ नाहीसेच होत होते. उलट, तटस्थतेची भूमिकाच अशी होती की तिच्यात साम्यवादाचे फावावे. पाश्चात्य राष्ट्रांच्या बाबतीत मोठी तक्रार वसाहतवादाची. ही तक्रार दिवसेंदिवस नाहीशी होत जाणारी तक्रार होती. उलट पंडितजींच्या लोकशाही निष्ठेविषयी त्यांना विश्वास असल्यास संबंधात मौलिक बिघाड होण्याचा संभव त्याना फारसा दिसत नव्हता. हे संबंध मोठे समाधानकारक होते असे नव्हे; पण ते विशेष वाईट होण्याचेही कारण नव्हते. तटस्थतेची भूमिका पंडितजींनी घेतली; संरक्षणकरारावर कडाडून हल्लाही चढविला; पण त्याबरोबरच राष्ट्रकुलामध्ये ( कॉमनवेल्थ ) राहाण्याचा निर्णय घेऊन राष्ट्रकुलाची प्रतिष्ठाही वाढवली. आपण काही एक नैतिक भूमिका घेऊन आंतरराष्ट्रीय क्षेत्रात आलो आहोत असे वातावरणही त्यानी निर्माण केले. नैतिकतेविषयी शंका येईल असे उदाहरण फक्त काश्मीरचेच. आणि त्याबाबतीत आरंभी पाच सात वर्षे हा प्रश्न तेथील जनतेच्या सार्वमतानेच सोडवण्यात येईल अशी निश्चित भूमिका घेऊन त्यानी आपले वजन कायम राखले. आणि हीच नैतिक भूमिका चीनच्या मनावर ठसावी यामुळे तिबेटची देणगी चीनला बहाल करण्यात आली. पंचशील मान्य करून आपणही उदारमताच्या शांततामय भूमिकेवरच आहोत असा आभास चीनने निर्माण करताच भारत-चीन प्रेमाचे संबंध वाढीस लागले.

साम्यवाद हा प्रगमनशीलतेवर ठेकेदारी सांगणारा विचार आहे. तो त्याज्य आहे ही तटस्थतेच्या भूमिकेत अंतर्भूत होणारी कल्पना त्याला मान्य होणे अशक्यच म्हटले पाहिजे. परंतु तटस्थतेला विरोध करणारी भूमिका घेणे साम्यवादाच्या हिताचे नव्हते. शांतता राखण्याचा, युद्ध टाळण्याचा या भूमिकेमागील उद्देशही विकासकर्त्यांच्या दृष्टीने मागस राष्ट्रांची एक महत्त्वाची राष्ट्रीय गरज होती. यामुळे तटस्थतेचे स्वागत करीत हे उदारमतवादी सावज केव्हा जाळ्यात सापडते याची वाट पाहाणेच क्रमप्राप्त होते. आणि अमेरिकेने पाकिस्तानला लष्करी साहाय्य देण्याचा करार करताच ही संधी आयतीच चालून आली. परिस्थिती बदलली आहे असे म्हणून पंडितजी काश्मीरबाबत ताठर बनले. काश्मीरच्या जनतेने निर्णय दिला आहे हा विचार पुढे आला. अमेरिकेचे पाकिस्तानला साहाय्य होत आहेसे पाहून काश्मीर हा भारताचाच घटक प्रदेश होय अशी क्रुश्चेव्हने घोषणा केली. तटस्थता एका बाजूकडे कलू लागली. चीनने याचा पुरेपूर फायदा घेण्यास आरंभ केला. हा प्रश्न विचारविनिमयाने व शांततेने सुटेल, खरा शत्रू पाकिस्तानच होय, या दुर्दम्य आशावादाने प्रेरित होऊन पंडितजी खलिते लिहू लागले. आणि त्याबरोबरच चीनशी प्रत्यक्ष युद्ध करण्याचे सामर्थ्य आमच्यात नाही व निर्माण होणेही शक्य








नाही हा सर्व राष्ट्राचे नैतिक मनोधैर्य खच्ची करणारा प्रचारही पद्धतशीर रीतीने सुरू झाला. पाकिस्तानच्या संबंधात काश्मीर प्रश्नाबाबत बदललेली भूमिका व साम्यवादाशी सुरू झालेला वाढता अनुनय यामुळे पाश्चात्य राष्ट्रातील संशयाचे वातावरण वाढू लागले. आणि गोवा प्रकरणामुळे नैतिकतेचा बुरखाही फाटला गेला असाच समज त्या गोटात पसरला. आणि अखेरीस चीनच्या आक्रमणाचा धोका प्रत्यक्षात प्रत्ययास आला.

पाश्चात्य वसाहतवादाकडे त्यांचे लक्ष गेले तसे ते लाल नेपोलियनवादाकडे किंवा चिनी विस्तारवादाकडे कधीच गेले नाही. आणि यामुळेच काश्मीरबाबत भक्कम बनलेले पंडितजी उत्तर सीमेबाबत लवचिक व काहीसे गाफीलच राहिले. अंतर्गत राजकारणात निरनिराळ्या गटांना सहज लीलेने खेळवीत आपापल्या स्थानी कायम ठेवून एकूण कार्याचा गाडा यशस्वी रीतीने पुढे नेण्यात पंडितजी यशस्वी झाले. राजकीय डावपेचात एकाद्या कसलेल्या राजकारणी पुरुषाचे कसब त्यांच्या ठिकाणी होते, असे म्हणतात. पण या सर्वांचा आधार त्यांची अलोट लोकप्रियता हाच होता. आणि कोणत्याही मर्यादेपर्यंत पोहोचला तरी तो एक चंचल स्वरूपाचाच आधार म्हटला पाहिजे. याच स्वरूपाचे स्थान जागतिक राजकारणातही त्यांना काही काळ लाभले. पूर्व, पश्चिम, तटस्थ राष्ट्रे, मागस राष्ट्रे, सारे जगच भारत व भारताचे नेहरू काय म्हणतात हे काळजीपूर्वक पाहू लागले. दलित जनता; दास्यात असलेली राष्ट्रे; युद्धाने भयग्रस्त झालेले जग; सर्वांना नेहरू हा आधार वाटू लागला. परंतु नेमक्या त्याच क्षणाला— जेव्हा उद्दिष्ट व व्यवहार या दोहोंचाही अत्यंत दक्षतेने व वास्तवतेने अंदाज घेऊन पावले टाकणे आवश्यक होते तेव्हाच— पंडितजी एका बाजूस घसरू लागले. उदारमतवादाच्या दीर्घकालीन परंपरेने पुनीत झालेल्यांशी व्यवहार करताना उपयुक्त ठरलेली सज्जनता विस्तारवादाच्या प्रेरणेने पुढे सरकणाऱ्या हुकूमशाहीपुढे निरुपयोगी ठरली. आणि तिच्याशी मुकाबला करताना हातचे काहीही राखून न ठेवलेला हा नेता अत्यंत भयावह संकटात सांपडला. ही एक अत्यंत मोठी शोकांतिका होती. हा प्रश्नही आपण शांततेने सोडवू शकू हा आत्मविश्वास ढासळला. एकाकी माणसाचा आत्मविश्वास नाहीसा होणे याहून अधिक भयावह काहीच असू शकत नाही; आणि याचाच प्रत्यय पंडितजींच्या जीवनात अखेरच्या एक दोन वर्षांत येऊ लागला. कोणीही चिमटे काढावेत. सर्वांनीच उपदेश करावा अशी अवस्था होऊ लागली. पंडितजींची कारकीर्द ही परिस्थितीची राजवट बनली. ॲटली यांनी श्रेष्ठ पण शोकमय जीवन असे त्यांच्या चरित्राचे वर्णन केले आहे. तो म्हणतो : " जवाहरलाल नेहरूंना 'सत्ता' वा 'सामर्थ्य' म्हणजे काय याचे आकलन होते; आणि तसेच काव्यही त्यांना समजत असे. परंतु एक संपते कुठे आणि दुसरे सुरू कुठे होते हे मात्र त्यांना समजले नाही." आणि यातच या शोकांतिकेची बीजे आढळतात.

लोकशाही, ऐहिकता, सुबत्ता ही श्रेष्ठ व मंगल व चिरंतन मूल्ये सामान्य भारतीय माणसाच्या जीवनात प्रत्यक्षात आणण्याचा त्यांचा प्रयत्न होता. आणि राष्ट्राराष्ट्रांच्या संबंधात ते शांतीचे अधिष्ठान प्रस्थापित करू पाहात होते. यात काव्य बरेच होते; 'सामर्थ्य' मात्र मर्यादित प्रमाणातच निर्माण होऊ शकले, ही वस्तुस्थिती आहे. तथापि नेहरूंचे नाव या मूल्यांशीच संबंधित राहील यात मात्र तिळमात्र संदेह नाही. त्यांच्या निधनाने 'काव्य' संपले आहे. तथापि त्यातून मिळणारी प्रेरणा मात्र अवश्य व सातत्याने कायम राहील व त्याबरोबरच या ध्येयाकडे सतत प्रवास करण्याची जबाबदारी देखील. त्यांनी दर्शवलेल्या या मार्गात अनेक अडचणी, खाचखळगे व धोके आहेत याची उत्तम साक्ष त्यांचे जीवनच देत आहे. तथापि त्यामुळे निराश होऊन वा बावरून जाऊन त्या मार्गापासून व त्यात अभिप्रेत असलेल्या खडतर तपश्चर्येपासून परावृत्त होणाराला नेहरूंचे नाव घेता येणार नाही. ही तपश्चर्या हाच त्यांचा खरा वारसा; आणि अनंत काळपर्यंत प्रेरणा व स्फूर्ति देऊ शकणाऱ्या ध्येयांसाठी ती सतत करीत राहाणे ही वारसदारांची जबाबदारी. नेहरू युग म्हणजे भारतीय लोकशाहीचे युग होय. लोकशाही हे एका अर्थी ध्येय नसून हा एक अत्यंत खडतर असा मार्ग आहे. सर्व प्रकारच्या अडीअडचणींतून वाट काढीत, त्या मार्गाने पुढे जात असताना एका टप्प्यावर पडलेला, पहुडलेला हा नेता. असे इतरही या पुढे ठेचा खातील, पडतील, पहुडतील. पण प्रवास मात्र सतत चालूच राहील, राहिलाच पाहिजे, हा प्रवास हीच नेहरूंना खरी श्रद्धांजली होय.

प्रा. ग. प्र. प्रधान

# ' पंडित नेहरूंच्या मनातील काही द्वंद्वे '

" आधुनिक कालातील माणसांच्या मनात सतत द्वंद्व चालू असते आणि त्यामुळे एकाच निष्ठेवर आधारलेल्या आयुष्यामुळे पूर्वीच्या काळच्या माणसांना जी आंतरिक शांति लाभत असे ती त्यांना मिळू शकत नाही. " एका इंग्रज निबंधकाराने लिहिलेले हे वाक्य आकर्षक वाटत असले तरी थोडा विचार केल्यावर त्यात सत्य ग्रथित केलेले नसून सत्याचा केवळ आभास आहे असे आढळून येईल. पूर्वी काय किंवा आज काय ज्या व्यक्तींना चाकोरीपलीकडे जाण्याचे सामर्थ्य नसते आणि त्यामुळे ज्या व्यक्ती अस्वस्थ करणाऱ्या गोष्टींकडे मुद्दाम डोळेझाक करतात त्यांच्या आयुष्यात प्रक्षोभ सहसा आढळून येत नाही. परंतु मळलेली वाट सोडून जीवनात नवे मार्ग शोधणाऱ्या व्यक्तींना पूर्वी अगर आज कधीच शांतता लाभू शकत नाही. त्यांच्या मनाच्या समरभूमीवर सतत कोणते ना कोणते समर चालू असते. काहींच्या मनातील ही वादळे इतरांना समजून येतात. काहींच्या वागण्याच्या विशिष्ट पद्धतीमुळे त्यांच्या मनात कधी द्वंद्व निर्माण होत नसावे असे इतरांना वाटते पण ते खरे नसते.

लोकमान्य टिळकांच्या मनातील समरप्रसंगाचा कोलाहल बाहेरच्या जगाला कधी फारसा ऐकू आला नाही यावरून त्यांच्या मनात परस्परविरोधी विचार वा निष्ठा यांचा संग्राम होत नसेल असे अनुमान कोणी काढले तर ते चूक ठरेल. त्याचप्रमाणे पंडित नेहरूंच्या मनातील प्रक्षोभ उघडपणे व्यक्त होत असे त्यावरून त्यांचे व्यक्तिमत्त्व दुभंगलेले होते असा निष्कर्ष कोणी काढू लागला तर ते बरोबर ठरणार नाही. जीवनाकडे डोळसपणे पाहून समर्थपणे जीवनाचा स्वीकार करताना काही वेळा जरी मन संभ्रमित झाले तरी पंडित जवाहरलाल नेहरू यांचे व्यक्तिमत्त्व कधी दुभंगले नाही.

पंडित नेहरूंच्या मनात जो प्रक्षोभ निर्माण होई त्याला तात्कालिक कारण बहुधा कोणतातरी राजकीय प्रश्न असे. अशा वेगवेगळ्या वेळी उपस्थित झालेल्या राजकीय वा आर्थिक समस्यांच्या वेळी पंडित नेहरूंना दोन्ही बाजूंचा विचार करावासा वाटे. परंतु या समस्यांचे स्वरूप बव्हंशी तात्कालिक असे, आणि पंडितजींच्या मनातील समरप्रसंग मात्र केवळ प्रासंगिक वा तात्कालिक नसे. सर्वकाली असीम सहृदयता असणाऱ्या आणि व्यापक विचार करणाऱ्या थोर व्यक्तींच्या मनात जी मूलभूत द्वंद्वे ( Fundamental conflicts ) निर्माण झाली तीच द्वंद्वे पंडित नेहरूंच्या मनातही झाली. त्यांच्या मनातील या द्वंद्वांचा थोडासा विचार करणे हा या लेखाचा उद्देश आहे.

पंडित नेहरू संस्कारक्षम वयात असताना इंग्लंडमध्ये शिकत होते. इंग्लंडमधील उदारमतवादी विचारसरणीचा त्यांच्या मनावर स्वाभाविकपणेच परिणाम झाला. तेथील संसदीय लोकशाहीत महत्वाचे सामाजिक व राजकीय बदल शांततेच्या मार्गाने कसे घडून येतात हे पाहून नेहरूंना लोकशाहीबद्दल तीव्र आकर्षण वाटू लागले. परंतु अंतर्गत कारभारात लोकशाहीची जोपासना करणारे इंग्लंड आणि भारताचे शोषण करणारे साम्राज्यवादी इंग्लंड ही एकाच राष्ट्राची दोन रूपे पाहून पंडित नेहरूंच्या मनात वादळ निर्माण होणे अपरिहार्य होते. मनाच्या या अस्वस्थ अवस्थेत ते ज्यावेळी अधिकाधिक विचार करू लागले तेव्हा जगामध्ये शोषण करणाऱ्यांचा एक वर्ग, आपले हितसंबंध टिकविण्यासाठी समाजाच्या व अन्य राष्ट्रांच्या राजकीय, आर्थिक व सामाजिक जीवनावर सतत बळकट पकड ठेवतो आणि या मगरमिठीतून सुटण्यासाठी वर्गसंघर्ष हा अटळ आहे, असे त्याना वाटू लागले. रशिअन राज्यक्रांतीतील लेनिनच्या नेतृत्वामुळे जगाच्या इतिहासाला एक नवे वळण लागले आणि नव्या विचारांचे उत्सुकतेने स्वागत करणाऱ्या पं. नेहरूंना रशिअन राज्यक्रांतीला प्रेरक ठरलेल्या मार्क्सवादाबद्दल आकर्षण वाटू लागले. श्रमिकांची संघटना केली पाहिजे आणि शोषणाधिष्ठित समाज नष्ट झाला पाहिजे ही पंडितजींची मनोमन खात्री पटली.

परंतु रक्तपाती क्रांतीचा मार्ग त्यांच्या स्वभावाला कधीच मानवला नाही. या क्रांतीतून खरे खुरे श्रमिकांचे राज्य निर्माण न होता ज्यावेळी स्टालीनची हुकूमशाहीच स्थिरावली आणि स्टालीनने आपल्या सहकाऱ्यांचे शिरकाण केले, त्यावेळी पंडितजींच्या संवेदनाक्षम मनाला मोठा धक्का बसला. आर्थिक जीवनातील अन्याय व विषमता नष्ट झाल्याशिवाय अन्य उदात्त कल्पनांचे बीजारोपण होऊ शकणार नाही; विषमता असलेल्या समाजातील व्यक्तिस्वातंत्र्य हे तकलुबी असते या गोष्टीबाबत पंडित नेहरूंच्या मनाचा निर्णय झाला होता आणि त्यामुळे रशियाच्या नवसमाज निर्माण करण्याच्या प्रयोगातील उणीवा माहीत असूनही पंडित नेहरूंच्या मनाचा काटा रशियाकडे झुकलेला होता. परंतु त्याचबरोबर समाजजीवनात अन्याय कमी होत जाण्यासाठी सर्वसामान्य माणसाच्या हातात सत्तेचा अंश असला पाहिजे ही त्यांची निष्ठाही अढळ होती. लोकांनी त्याच्या विकासाचे मार्ग स्वतःच शोधले पाहिजेत, त्या बाबतीत एखाद्या व्यक्तीने अगर संघटित गटाने समाजावर कोणतीही गोष्ट लादून चालणार नाही असा त्यांचा सतत आग्रह असे.

पंडित नेहरूंच्या मनातील या द्वंद्वामुळे ते कधी निष्क्रिय झाले नाहीत. नवा मार्ग शोधावा या जिद्दीने त्यांनी लोकशाही समाजवादाचा पुरस्कार केला. पंडितजींच्या मनात अन्यायाबद्दल जी चीड होती त्यामुळे विषमता शक्य तितक्या लवकर नष्ट करावी ही त्यांच्या मनाला लागलेली ओढ आणि समाजपरिवर्तन सावकाश झाले तरी चिरस्थायी होण्यासाठी लोकशाही मार्गाची आवश्यकता या दोहोंचे द्वंद्व दीर्घकालपर्यंत कसे चालू होते हे त्यांच्या जीवनाचा अभ्यास करताना सतत दृष्टोत्पत्तीस येते.

पंडित नेहरूंचा पाश्चात्य जगाशी परिचय झाल्यावर त्यांच्या मनाला तेथील औद्योगिक प्रगतीचे आकर्षण वाटले. भारतातील शेतकऱ्यांचे गतिशून्य, दारिद्र्य व अज्ञान यांनी ग्रासलेले जीवन आणि औद्योगीकरण झालेल्या देशातील समृद्धि यातील तीव्र विरोध पाहिल्यावर औद्योगीकरणाशिवाय भारताला तरणोपाय नाही अशी खूणगाठ त्यांनी मनाशी बांधली; परंतु पंडित नेहरूंचे मन केवळ बाह्य प्रगतीने भुलणारे नव्हते. पाश्चात्यांच्या औद्योगिक प्रगतीमागच्या तंत्र-विज्ञानाचे सामर्थ्य आणि या तंत्र-विज्ञानाच्या विकासासाठी पाश्चात्य शास्त्रज्ञांनी अनेक वर्षे केलेली शास्त्रीय ज्ञानाची उपासना याचा विचार ते करू लागले, आणि शास्त्रीय दृष्टिकोनाची आवश्यकता त्यांना तीव्रतेने जाणवली. भारतातील मध्ययुगीन समाजजीवनाचा पंडित नेहरूंना कमालीचा तिटकारा वाटू लागला आणि आपल्या समाजाला जखडून टाकणाऱ्या शृंखला तोडण्यासाठी शास्त्राकडेच आपण वळले पाहिजे असे त्यांनी आग्रहाने प्रतिपादन केले. त्यांची ही भूमिका घडत असताना एच्. जी. वेल्स या इंग्लिश विचारवंताच्या लेखनाचा फार मोठा परिणाम त्यांच्या मनावर झाला होता. परंतु भारतीय राजकारणात लढाऊ भूमिका घेताना त्यांना नेतृत्व स्वीकारावे लागले ते महात्मा गांधींचे. महात्माजींच्या राजकारणाचे अध्यात्मिक अधिष्ठान पंडित नेहरूंना मान्य नव्हते. महात्मा गांधींचा यंत्राला असलेला विरोध त्यांना आक्षेपार्ह वाटत होता. म. गांधींच्या आतल्या आवाजासंबंधी पंडित नेहरूंनी व्यक्त केलेला विरोध सुप्रसिद्ध आहे. परंतु स्वातंत्र्यलढा तीव्र होण्यासाठी म. गांधींचेच नेतृत्व प्रभावी ठरेल हे त्यांना समजत होते. म. गांधींच्या नेतृत्वाचा स्वीकार परंतु गांधीवादाला विरोध अशी भूमिका पंडित नेहरूंनी स्वीकारली. म. गांधी आपण भारतीय संस्कृतीचे वारस आहोत हे सतत सांगत असत; राजकारण आणि धर्मांची तत्वे यांची फारकत होऊन चालणार नाही ही त्यांची शिकवण होती. या उलट, धर्मांची तत्वे उदात्त असली तरी धर्मांच्या कर्मकांडातून निर्माण होणाऱ्या दांभिकतेला पंडित नेहरूंचा विरोध होता. राजकरण आणि धर्म यांची गल्लत केल्याने भयंकर घोटाळे होतील असे त्यांना मनोमन वाटत होते. पं. नेहरूंनी आपली मते निर्भीडपणे बोलून दाखविली. परंतु राजकीय कृती करताना जनतेचा बुद्धिभेद होऊ नये म्हणून त्यांनी स्वतःला मान्य नसलेल्या गांधीजींच्या अनेक तऱ्हेवाईक गोष्टींबाबत मौन पतकरले. स्वातंत्र्यसमराच्या या कालखंडात त्यांच्या मनात चाललेले हे द्वंद्व चटकन् लक्षात येते. स्वातंत्र्योत्तर कालात जो पुरोगामी समाज घडविण्यासाठी पंडित नेहरूंनी धडपड केली. त्यासाठी स्वातंत्र्य चळवळ ही शास्त्रीय दृष्टिकोनावर आधारलेली आणि सामाजिक, राजकीय व आर्थिक प्रश्नांबाबत पुरोगामी भूमिका स्वीकारणारी असावयास हवी होती. परंतु साम्राज्यविरोध आणि







## 'पंडित नेहरूंच्या मनातील काही द्वंद्वे'

स्वातंत्र्याची प्रबल आकांक्षा यामुळे हे विचार अंधुक होत गेले आणि पंडित नेहरूंनी वारंवार स्वतःची मते स्पष्टपणे मांडली. तरी स्वातंत्र्यलढ्यात या मतांवर गांधीवादाने मात केली हे मान्य करावे लागेल. म. गांधींपासून वेगळे होऊन स्वातंत्र्य लढा आधुनिक दृष्टीकोन घेऊन चालवावयाचा की स्वातंत्र्य मिळेपर्यंत स्वतःच्या मतांचा आग्रह बाजूस ठेवावयाचा हा विचारांचा प्रक्षोभ पंडित नेहरूंच्या मनात चालू असताना त्यांनी पहिला मार्ग स्वीकारला. परंतु हे त्यांचे मानसिक द्वंद्व केवळ राजकीय प्रश्नातून निर्माण झाले होते असे म्हणता येणार नाही. भारतीय जीवनातील अंधश्रद्धेचा पंडित नेहरूंच्या मनाला उबग आला होता आणि आधुनिक शास्त्रीय दृष्टिकोणातच प्रगतीचा मार्ग आहे हे त्यांच्या बुद्धीला पुरेपूर पटले होते. पण प्रत्यक्ष कार्य करताना, येथील दुबळ्या जीवनातही काही सामर्थ्य दडलेले आहे आणि या सामर्थ्याचा उगम भारतीय संस्कृतीच्या परंपरेत आहे असे त्यांना अनेकदा जाणवले. त्याचप्रमाणे शास्त्रीय दृष्टीकोन स्वीकारून प्रगतीच्या मार्गावर घोडदौड करणाऱ्या अत्याधुनिक संपन्न पाश्चात्य राष्ट्रातील मानसिक अस्वास्थ्यही त्यांनी पाहिले. भूतकालापासून आपल्याला संपूर्ण तुटून निघता येईल का असा प्रश्न पंडितजींनी अनेकदा स्वतःला विचारला आणि राष्ट्राच्या जीवनात हे शक्य नाही असेच उत्तर त्यांनी दिले. भारतीय संस्कृतीतील जीवनदृष्टि आणि शास्त्रीय दृष्टिकोन या दोहोंच्या सामर्थ्याचा वेगवेगळ्या संदर्भात वेगवेगळा प्रत्यय पंडित नेहरूंना आला आणि या त्यांच्या मनोभूमिकेचे उत्कृष्ट प्रतिबिंब त्यांनी मृत्यूपूर्वी काही दिवस लिहून ठेवलेल्या मृत्युपत्रात उमटलेले दिसते. अखेरच्या इच्छा व्यक्त करताना पंडितजींनी गंगेसंबंधी जी भावना व्यक्त केली आहे त्यात त्यांच्या मनावरील भारतीय सांस्कृतिक जीवनाच्या संस्काराचे दर्शन घडते हे कोणीही मान्य करील. परंपरा आणि आधुनिकता यांच्यापैकी एकाच गोष्टीचा स्वीकार ही सोपी गोष्ट नाही.

पंडित नेहरूंनी केवळ वैचारिक भूमिकेवर या गोष्टीचा निर्णय करता येणार नाही हे ओळखले होते. जीवनातील विविध अनुभवातून जाताना यासंबंधी त्यांनी सतत चिंतन केले आणि त्यांच्या मनात त्यामुळे निर्माण झालेल्या वादळाचे पडसाद त्यांच्या लेखनातून व भाषणातून सतत उमटले. त्यांनी लिहिलेला पुढील उतारा या दृष्टीने फार महत्वाचा आहे. ते म्हणतात— "खरोखर माझ्या जीवनाचे तत्वज्ञान कोणते ? काही वर्षांपूर्वी जर असा प्रश्न मला कोणी विचारला असता तर मी त्याबाबत एवढा अनुत्साह दाखविला नसता. त्यावेळी माझ्या विचारात एक निश्चित बांधेसूदपणा होता. पण आता तो मावळला आहे. चीन, युरोप आणि जगात इतरत्रही ज्या घटना घडल्या त्या गोंधळात पाडणाऱ्या, भांबावून टाकणाऱ्या आहेत. तशाच त्या विषाद आणणाऱ्याही आहेत. भविष्यकाळ आता अनिश्चित आणि धूसर झाला आहे. ... पूर्वी जे आदर्श आणि ध्येये मी मनाशी बाळगली, त्यांच्या भोवतीचे तेजोवलय आता बरेच फिके पडले आहे.

एक प्रकारचा संदिग्ध मानवतावाद माझ्या मनाची पकड घेत होता. जो धर्माचा आचार मी पहात होतो त्याचे मला काहीच आकर्षण नव्हते. तो धर्म म्हणजे जणू भोळसट आचार आणि अंध विश्वास ! जीवनाकडे पाहण्याचा धर्माचा दृष्टिकोन सर्वस्वी विज्ञानविरोधी. शिवाय धर्मात काही प्रमाणात शिरलेली बुद्धिहीन अंधता आणि दैवी शक्तीवर विसंबून राहणे हेही मला रुचण्यासारखे नव्हते.

गांधीजींचा साधनशुचितेचा विचार मला महत्वाचा वाटतो, आणि साधनशुचितेवरचा त्यांचा भर ही त्यांनी आपल्या सामाजिक जीवनाला दिलेली सर्वात मोठी देणगी आहे. ...... मार्क्स व लेनिनच्या विचारांचा माझ्या मनावर खोल ठसा उमटला आहे ... पण व्यक्तिवादाकडे माझा विशेष ओढा आहे मतांधता मला मानवत नाही आणि व्यक्तिस्वातंत्र्यावर माझा विश्वास आहे. समाजवादाची मूलतत्त्वे मला मान्य आहेत ... जीवन अतिशय गुंतागुंतीचे आहे कुठल्याही विशिष्ट वादाच्या चार भिंतीत कोंडता येण्याइतके सरळसोट ते कधीच नसते."

पंडित नेहरूंच्या आयुष्यातील आणखी एक द्वंद्व अगदी वेगळ्या तऱ्हेचे होते. पंडित नेहरूंना सौंदर्याबद्दल मोठे आकर्षण वाटे. हिमशिखराचे भव्य सौंदर्य, गुलाब पुष्पाचे नाजुक सौंदर्य, लहान मुलांच्या निरागस हास्यातील निर्मळ सौंदर्य, हसत हसत मृत्यूशी झुंज देणाऱ्या वीर पुरुषांच्या जीवनातील उदात्त सौंदर्य, ब्रह्मपुत्रानदीच्या तुफान पात्राला अडविण्याची शर्थ करणाऱ्या दिब्रुगडच्या नागरिकांच्या शक्तिशाली प्रयत्नातील पौरुषयुक्त सौंदर्य— या आणि अशा विविध तऱ्हेच्या








सौंदर्याने त्यांचे मन उचंबळून येई. कित्येकदा या सौंदर्याच्या चिंतनात त्यांचे मन गुंतून पडे आणि मग त्यांच्यातील कलावंताला राजकारणातील क्षुद्र हेवेदावे, माणसामाणसातील भांडणे यांचा तीव्र तिटकारा वाटे. अशा क्षणी त्यांना वाटे की मनाला शांततेचा अनुभव देणाऱ्या या सौंदर्यासंन्निध सतत रहावे आणि सामान्य आयुष्याकडे पाठ फिरवावी. पण असे आत्मनिष्ठ जीवन जगावे असे तीव्रतेने वाटले तरी त्याचसमयी त्यांच्यातील सामाजिक जाणीव उफाळून येई. गोरगरीब जनतेच्या दुःखाच्या आठवणीने त्यांचे मन व्याकुळ होई. पाशवी शक्तीचे मदोन्मत्त तांडव पाहून त्यांच्या मनातून संतापाचे स्फुल्लिंग बाहेर पडत. आत्मनिष्ठ जीवन कितीही समाधानाचे असले तरी त्याकडे पाठ फिरवून समाजजीवनातील कोलाहलात ते मिसळून जात. न्यायासाठी लढत असताना, अनेक जवळच्या व्यक्तींची तत्त्वभ्रष्टता जेव्हा त्यांना दिसे, पराक्रमाची अपेक्षा केली असता दुबळा लाचारपणा जेव्हा त्यांच्या अनुभवास येई, प्रामाणिकपणावर दांभिकता मात करीत असल्याचे जेव्हा ते पहात, तेव्हा सत्य आणि सौंदर्य यांच्या उपासनेत रंगणारे त्यांचे मन विषादाने भरून येई. या जीवनाचा त्याग करावा असे त्यांना काही काल वाटे. पण या द्वंद्वामध्ये त्यांच्यातील सामाजिक कर्तव्याची जाणीवच विजयी होई. १९३९ साली दुसऱ्या महायुद्धाच्या सुरवातीपूर्वी पंडित नेहरू हिमालयात खाली या ठिकाणी गेले होते. त्यावेळी त्यांनी लिहिलेल्या पुढील उताऱ्यात त्यांच्या मनातील समराचे सुंदर चित्रण आढळून येते. ते लिहितात : "गेली दोन वर्षे खालीला जावे असे मला वाटत होते आणि आज मी खालीला आलो होतो. किती सुखद होते इथे राहणे !...

दिवसामागून दिवस जात होते. डोंगरावरचा शीतल वारा मी मनमुराद उपभोगत होतो. हिमवृष्टि आणि दऱ्या-खोरी डोळे भरून पहात होतो. सगळीकडे नीरव शांतता भरून राहिली होती आणि सौंदर्याचे साम्राज्य पसरले होते. जगातील दुःखे ही किती तरी दूरची, आभासमय वाटत होती. रुद्रभीषण कडे एकदम खोलवर गेलेले होते, आणि डोंगराचे उंचवटे स्त्रीच्या वक्षस्थलासारखे गोलाकार आणि मृदु वाटत होते. पहाटेच्या वेळी मी उघडाच बाहेर पडून रहात असे आणि डोंगरावरचा सौम्य सूर्य मला प्रेमाने कवटाळून घेई. काही वेळा मी पाईन वृक्षाखाली पडून राहून भटकणाऱ्या वाऱ्याचा आवाज ऐकत राही. तो वारा कितीतरी कानगोष्टी माझ्याशी करीत असे आणि त्यामुळे माझी गात्रे सुखावून जात, डोक्यातला सारा शीण नाहीसा होई. माझ्या बेसावध मनःस्थितीचा फायदा घेऊन तो धूर्त वारा मला जगातील माणसांच्या मूर्खपणाची जाणीव करून देई. माणसांची कधीही न संपणारी भांडणे, त्यांचे हेवेदावे, राग, संताप, धर्माच्या नावाखाली त्यांनी चालविलेला अनाचार, त्यांचा राजकारणातील अधःपात आणि त्यांच्या ध्येयाचे विकृत स्वरूप हे सारे तो वारा मला सांगत असे ! अशा माणसांच्यात परत जाणे आणि त्यांच्या बरोबरच्या व्यवहारात स्वतःचे आयुष्य फुकट दवडणे हे इष्ट होते का ? इथे शांतता होती, समाधान होते, बर्फ, डोंगर विविध वनराजींनी भरलेल्या टेकड्या, रंगीबेरंगी फुले आणि कूजन, पक्षी हे माझे सोबती होते वारा एकसारखा माझ्याशी हितगुज करीत होता आणि मी त्यालाही कुजबूज करू देत होतो.... परंतु एकदम मनाला धक्का बसला. हिटलर आस्ट्रियावर चालून गेला होता. मी आता इथले डोंगर, इथले हिमतुषार विसरलो. माझे शरीर एकदम आकसून गेले आणि मन प्रक्षुब्ध झाले...माझ्या हे लक्षात आले की आपल्याला जगाच्या विकाराना तोंड द्यावयाचे आहे. जगाचे दुःख सोसावयाचे आहे हे करतानाच जगाच्या मुक्तीचे स्वप्न पहावयाचे आहे."

पंडित नेहरूंच्या मनाच्या समरभूमीवरील द्वंद्वातून त्यांच्या संपन्न व्यक्तिमत्त्वाची आणि सत्य आणि सौंदर्य यांच्या शोधासाठी त्यांनी जी अविश्रांत धडपड केली तिची कल्पना येऊ शकेल.



अनुक्रमणिका

श्री. पु. ह. पटवर्धन

# म. गांधी आणि पं. नेहरू

## भारतीय स्वातंत्र्य-संग्रामाला जागतिक संदर्भ

इतिहासाची जडण-घडण करणारे जे प्रतिभाशाली क्रांतिकारक लोक-नायक विसाव्या शतकात जगाच्या रंगभूमीवर चमकले, गाजले त्यात म. गांधी व पं. नेहरू यांची गणना आहे. आधुनिक भारताचे थोर शिल्पकार म्हणून त्यांची दिगंत कीर्ति आहे. राजा राममोहन रॉय यांच्यापासून गेली दोनशे वर्षे भारतीय पुनरुत्थानासाठी जो एक महान् यत्न या देशात सातत्त्याने चालला आहे त्यावर आपल्या अद्भुतरम्य पराक्रमाने या दोन वीर पुरुषांनी कळस चढविला. भारतीय स्वातंत्र्य-संग्राम हा जगभर चालू असलेल्या मानव-दास्य-विमोचन-आंदोलनाचा एक घटकावयव आहे, साम्राज्यविरोधी जागतिक झगडयातील ते एक महत्वाचे रणक्षेत्र आहे, ही जाणीव या नेत्यांनी भारताला व जगाला करून दिली. भारताच्या स्वातंत्र्य-आंदोलनाला त्यामुळे सहजच जागतिक संदर्भ प्राप्त झाला. भारताचा राष्ट्रवाद सर्जनशील व विधायक आहे या गोष्टीवर भर दिला गेला. भारताचा राष्ट्रवाद म्हणजे सर्वांगीण समाज-स्थित्यंतराची तुतारी आहे ही जाणीव जनतेमध्ये निर्माण व्हावी असा त्यांनी कटाक्षाने यत्न केला. राष्ट्रीय भावनेला वर्णद्वेषाचा रंग येऊ नये अशी त्यांनी सतत खबरदारी घेतली. सारे राष्ट्रीय आंदोलन नैतिक पातळीवर न्यावे व नैतिकतेच्या बलावर प्रामुख्याने लढले जावे असा म. गांधींचा यत्न होता. धर्मभेद,-जातिभेद, वर्णभेद –अर्थभेदांनी छिन्नविच्छिन्न झालेल्या समाजात राष्ट्रीय भावना म्हणजे एकात्मकता निर्माण करणे किती कठीण आहे याची या नेत्यांना पूर्ण जाणीव होती. आपल्या वैयक्तिक व सामाजिक उणिवांमुळे आपला समाज परतंत्र बनला आहे हे सत्य जनतेच्या गळी उतरविण्याचा या नेत्यांनी अनेक प्रकारे अविरत यत्न केला. भारताच्या उज्वल तत्वज्ञानाला शोभेल, गीता –उपनिषदे यांची शिकवणूक सामाजिक आचारात नित्य व्यक्त होईल, अशी नवीन समाज-व्यवस्था समंजसपणे व सर्व-संमतीने येथे निर्माण करता आली तरच भारतीय स्वातंत्र्य कृतार्थ होईल असे या नेत्यांनी आपल्या अधिकारवाणीने पदोपदी सांगितले. भारतीय राष्ट्रवाद म्हणजे स्वातंत्र्य-समता-न्याय बंधुता या तत्वांवर आधारलेल्या नव समाजाचे दर्शन आहे असे त्यांनी स्पष्ट केले.

आचार्य जावडेकरांनी 'आधुनिक भारत' नावाचा राज्यशास्त्रावर जो अमोल ग्रंथ लिहिला आहे त्याची स्फूर्ति याच दर्शनातून त्यांना मिळाली आहे. म. गांधी व पं. नेहरू यांच्या नेतृत्वाखाली सत्याग्रही समाजवादी लोकशाहीचे जे दर्शन विकसित होत होते ते मार्क्सवादापेक्षा श्रेष्ठ व विज्ञानाच्या या युगामध्ये अधिक श्रेयस्कर ठरेल असे त्यांनी मोठ्या विद्वत्तापूर्ण रीतीने प्रतिपादन केले आहे. म. गांधी-नेहरूंच्या नेतृत्वाचे हे ऋण श्री. एस्. एम्. जोशी यांच्या सारखे कट्टर समाजवादी नेते आजही मुक्तकंठाने मान्य करतात. राष्ट्रवाद म्हणजे समतेवर, न्यायावर आधारलेला नव-समाज निर्मितीची अपरिहार्यता व निकड, ही वस्तुस्थिती भारतातील रूढिप्रिय व जड समाजाच्या ध्यानात आणून देण्याचा या नेत्यांनी तळमळीने अविरत यत्न केला. अस्पृश्यतानिवारण व हिंदु-मुसलमान ऐक्य व चरखा या व अशा कार्यक्रमांना स्वराज्याच्या चतुःसूत्रीमध्ये स्थान मिळावे हे आश्चर्य नव्हे का? या देशाचा सामाजिक, आर्थिक व सांस्कृतिक कायापालट म्हणजे स्वराज्य असे म. गांधींनी व पं. नेहरूंनी जनतेला आर्जवून पुनः पुनः सांगितले.

## परस्परपूरक नेतृत्व

सन १९२० व १९३० सालच्या स्वातंत्र्य-आंदोलनात समाजाच्या सर्व स्तरांतून हजारो तरुण स्त्री-पुरुष सामील झाले. राष्ट्रीय काँग्रेसची संघटना व












प्रमाणे खादी हा राष्ट्रीय आंदोलनातील सैनिकांचा गणवेष बनला. म. गांधींच्यामध्ये अलौकिक लोकसंग्रह-चातुर्य होते. पं. मोतीलाल नेहरू, सरदार वल्लभभाई पटेल, देशबंधु दास, श्री राजगोपालाचारी असे अव्वल दर्जाचे साथी सहकारी त्यांना प्राप्त झाले. देशाच्या कोनाकोपऱ्यात निदान तालुक्याच्या गावापर्यंत काँग्रेससंस्थेची संघटना जाऊन पोहोचली. चंपारण-खेडा व नंतर बार्डोली येथे सत्याग्रहाचे जे प्रात्यक्षिक म. गांधींनी व सरदार पटेल प्रभृति त्यांच्या सहकाऱ्यांनी करून दाखविले त्यामुळे खेडयापाडयात शेतकरी वर्गात अभूतपूर्व जागृति निर्माण झाली. या क्रांतिकालात जे तरुण स्वातंत्र्य आंदोलनात सामील झाले त्यांना त्या दिवसांचे स्मरण झाले की आजही असे वाटते की "त्या कालात जिवंत असणे हे भाग्य होते. तरुण असून अल्प स्वल्प सेवा बजावण्याची संधि सापडणे हा तर स्वर्गसोहळाच होता!" ग्यानबा-तुकारामाप्रमाणे म. गांधी-नेहरू हा घोष-मंत्र देशभर घरोघर कानी येऊ लागला. अशी उत्स्फूर्त व अभिजात भक्ति जनतेकडून क्वचितच कोणा राष्ट्रनेत्याला मिळाली असेल. हे दोन नेते भारतीय जनतेचे अनभिषिक्त हृदयसम्राट बनले. म. गांधी व पं. नेहरू यांचे नेतृत्व परस्परपूरक असल्यामुळे त्या दोघांच्या वैचारिक बैठकीमधील, कृतींमधील, कार्यपद्धतीमधील मूलभूत भेद स्वातंत्र्य-आंदोलनातील आम सैनिकांना रेखीवपणे लक्षात येण्यास काही वर्षे लोटावी लागली.

श्री. प्यारेलाल यांनी लिहिलेल्या अखेरच्या चरणातील (दि लास्ट फेज) गांधी चरित्राच्या दोन भागांपैकी पहिल्या भागाच्या प्रस्तावनेत म्हटले आहे की "लोकसत्ताक भारतात परदेशातून येणारे सन्मान्य पाहुणे दिल्लीस आल्यावर राजघाटला जाऊन म. गांधींच्या समाधीला श्रद्धांजली अर्पण करण्यास चुकत नाहीत. पण भारताचा दौरा संपवून येथे सुरू झालेली प्रचंड कार्ये पाहून ते परत निघाले की त्यांच्या मनात असा प्रश्न सहज निर्माण होतो की "where is Gandhi in the India of today" स्वतंत्र भारतात 'गांधी' कुठे दिसतो? ज्या भारतासाठी गांधींनी जन्मभर एवढे खडतर कष्ट सोसले व आपले प्राण अर्पण केले त्या भारतात गांधींचा वारसा इतक्या अल्पकाळात दिसेनासा व्हावा ही केवढी विचित्र व खेदजनक घटना आहे? म. गांधींचे मित्र पोलाक, ब्रेलस्फर्ड व सत्तांतराचे कालातील ब्रिटनमधील सेक्रेटरी ऑफ स्टेट लॉर्ड पेथिक लॉरेन्स यांनी तिघांनी एक गांधी-चरित्र लिहिले आहे. त्यात त्यांनी म्हटले आहे की भारताचे राजकीय स्वातंत्र्य हे गांधींचे जीवन उद्दिष्ट होते असे मानणे चुकीचे आहे. धर्मभेद, जातिभेद, वर्णभेद, अर्थभेद, शांततेच्या मार्गांनी नष्ट करावे व न्याय-समतेवर आधारलेला मानवसमाज भूतलावर निर्माण करावा हे गांधींचे मुख्य उद्दिष्ट होते. भारतीय स्वातंत्र्य हा एक दुय्यम व तात्कालिक टप्पा होता. भारतातील स्वातंत्र्यवादी जनतेने "अल्पस्य हेतोः बहु हातुमिच्छन्" अशा वृत्तीने अल्पासाठी बहुमोल चीज दुर्लक्षिली किंवा खर्ची घातली, हे नाकबूल करता येणार नाही. शाब्दिक गौरव करून विभूतींची शिकवणूक निर्माल्यवत् करून ठेवण्याची रूढि भारतामध्ये हजार वर्षे तरी दृढमूल झाली आहे. खुद्द गांधीजींनी म्हटले आहे की "महात्मा म्हणून माझा खोटा गौरव करण्याऐवजी लोक मला दगड मारतील तर ते एक प्रामाणिक कृत्य आहे असे मानीन व मला अधिक समाधान वाटेल. त्यांचेकडून होणारा शाब्दिक गौरव मला दुःसह वाटतो."

पंतप्रधान नेहरूंच्या नेतृत्वाखाली चाललेल्या लोकशाही कारभारात गांधींचा आत्मा प्रगट झालेला कोठे दिसत नसला तर त्यात पं. नेहरूंचा दोष किती? व जनतेचा किती? हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे.

## 'आंतर: कोऽपि हेतुः'

म. गांधी व पं. नेहरू यांची वैचारिक बैठक, दृष्टिकोण, व कार्यपद्धती भिन्न होती. पण या दोघांना 'आंतरः कोऽपि हेतुः' म्हणतात त्याप्रमाणे परस्परांबद्दल एक गूढ आत्मीयता व आकर्षण होते. श्री रामकृष्ण परमहंसांनी नरेंद्रनाथाला पाहाताच त्या तेजस्वी बुद्धिसंपन्न युवकावर अनुग्रह केला तसाच कांहीसा प्रकार म. गांधी व पं. नेहरू यांच्या परस्पर-संबंधात घडून आला होता. 'माझे सत्याचे प्रयोग' या आपल्या आत्मचरित्रामध्ये म्हणजे साधा-

रणपणे सन १९२४-२५ पर्यंतच्या कालात या उभयतांमध्ये खास ऋणानुबंध निर्माण झालेला दिसत नाही. पण पुढे सन १९२७ पासून म्हणजे ब्रुसेलस येथे भरलेल्या साम्राज्य-विरोधी जागतिक परिषदेत भाग घेऊन मद्रास काँग्रेस अधिवेशनास हजर राहून काही नवे ठराव पंडित नेहरूंनी मांडल्यापासून गांधीजींनी त्यांच्याकडे खास दृष्टि वळविली व त्यांच्यावर संस्कार घडविण्याचा प्रयत्न केला.

## गांधीजींशी मतभेद

पं. नेहरूंचे 'आत्मचरित्र' ही एक उच्च साहित्यिक कलाकृति आहे. भारतीय स्वातंत्र्य-आंदोलनाचे हृदयस्पर्शी चित्र या ग्रंथामधून अनेक पाश्चिमात्य वाचकांच्या प्रथम दृष्टीस पडले. इंग्रजी साहित्यात या ग्रंथाचा खूप गौरव झाला आहे. पं. नेहरूंचा पिंड कलावंताचा, तटस्थ चिंतकाचा आहे; त्यांची प्रकृति क्षत्रियाची आहे हे या आत्मचरित्राच्या पाना-पानामध्ये प्रतीत होते. म. गांधींच्या बद्दल त्यांना वाटणारा अपार जिव्हाळा, आकर्षण व नितांत आदर यांनी मोठ्या भावभक्तीने व्यक्त केला आहे. पण त्याबरोबरच म. गांधींच्या कार्यपद्धतीसंबंधी, समाजशास्त्रासंबंधी, अंतःकरण-प्रवृत्तीला प्रमाण मानून तर्काची उपेक्षा करणाऱ्या कार्यपद्धतीवर प्रांजल व सडेतोड टीका केली आहे. कलकत्त्याच्या सिगनेट प्रेसने पं. नेहरूंच्या शब्दात म. गांधी' म्हणून एक पुस्तक प्रसिद्ध केले आहे. म. गांधींनी सन १९२० सालपासून भारतात केवढी क्रांति घडवून आणली आहे, त्यांच्या नेतृत्वाच्या जादूने भारतीय जनतेमध्ये पूर्वी कधी नव्हती अशी निर्भयता व जागृति निर्माण झाली आहे. याचे काव्यमय वर्णन केले आहे. म. गांधींचे ऋण त्यांनी प्रांजलपणे मान्य केले आहे. पण त्याच बरोबर "गांधी-विचार" किंवा गांधीदर्शनातील कांही मुद्यांवर त्यांनी सडेतोड टीका केली आहे. आपल्या आत्मचरित्राची अखेरची तीन प्रकरणे म. गांधींशी असलेल्या आपल्या तात्विक मतभेदांचा ऊहापोह करण्यासाठी त्यांनी खर्ची घातली आहेत. पं. नेहरू कट्टर मार्क्सवादी नव्हते. पण इतिहाससंबंधी म्हणजे इतिहासात घडून येणारी स्थित्यंतरे का होतात यासंबंधी मार्क्सने केलेले स्पष्टीकरण त्यांना पटले होते. त्यांच्या 'आत्मचरित्रा'त व 'जागतिक इतिहासाचा झलक' या त्यांच्या ग्रंथात इतिहाससंबंधी मार्क्सप्रणीत दृष्टिकोण त्यांनी स्वीकारला होता हे उघड दिसते. भारतीय कम्युनिस्ट गांधींना भांडवलशाहीचे हस्तक समजत. ( Gandhi is the mascot of Indian Courgeoisie) संचितधनवाल्या वर्गाला गांधींचा वरदहस्त आहे असे कम्युनिस्ट ठामपणे मानीत. गांधीजींच्या अंतःकरणात शोषित व पददलित जनतेबद्दल केवढा कळवळा, कणव व कैवार आहे याची पं. नेहरूंना प्रचीति होती. पण जुन्या भांडवलशाही अर्थ-व्यवस्थेविरुद्ध गांधीजी कडाडून हल्ला चढवीत नाहीत याचे पं. नेहरूंना सखेद आश्चर्य वाटे. गांधीजींची थोरवी मान्य असली म्हणजे त्यांचे सर्व विचार मान्य असले पाहिजेत असे मुळीच समजण्याचे कारण नाही. गांधीजी आपली उद्दिष्टे स्पष्टपणे नमूद करीत नाहीत. एका पावलाइतकेच मला पुढचे दिसते असे सांगून वेळ मारून नेतात याची पं. नेहरूंना चीड येई. चारित्र्यावर व व्यक्तीच्या शीलावर गांधीजींचा सर्व भर असतो. पण चारित्र्याला बुद्धीची जोड नको का? मध्ययुगीन संतांप्रमाणे काम-लोभ-मद-मत्सर यांतून मुक्त होणे हाच श्रेष्ठ पुरुषार्थ आहे असे गांधीजी मानतात. सामाजिक उद्दिष्टे स्पष्ट असतील तरच त्यांचे साठी सामुदायिक चळवळ उभी करता येईल. "दरिद्रीनारायण" हा शब्दप्रयोग करताना दारिद्र्याचा गौरव केला जातो. दारिद्र्य नाहीसे करणे हे आपले उद्दिष्ट आहे तर मग सध्या सर्वत्र दिसणाऱ्या दारिद्र्याचा गौरव कशासाठी करावयाचा? "उपाशी मरणाऱ्या लोकांसमोर परमेश्वर उभा राहिला तर रोजगार व भाकर यांचे रूप घेऊन त्याला सामोरे यावे लागेल. "तैर्दत्तान् अप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव स" समाजासाठी कष्ट न करता जो भोग भोगतो तो 'स्तेन' आहे." असे गांधीजी म्हणतात. पण ही सामाजिक वस्तुस्थिति अशा गूढ व सांप्रदायिक धर्माच्या भाषेत काय म्हणून वर्णन करावयाची? व्यक्तीची आंतरिक सुधारणा झाली की समाजस्थिति पालटेल असा गांधीजींचा सिद्धांत आहे. तसेच खादी व ग्रामोद्योगाचा








कार्यक्रम प्रथम उपचार म्हणून काही काल उपयुक्त असला तरी अंतिमदृष्टच्या दारिद्र्यविनाशाच्या नवीन योजनेत अशा कार्यक्रमांना स्थान देणे शक्य होणार नाही. शेवटी हिंसा अहिंसेच्या तत्वज्ञानाची त्यांनी सविस्तर चर्चा केली आहे. त्यातील गुण-दोषांची, व्यवहार-अव्यवहारतेची छाननी केली आहे. पं. नेहरू आधुनिक होते. विज्ञान, यांत्रिक-सुधारणा म्हणजे यच्चयावत टेकनॉलॉजी व नियोजित समाजवादी अर्थव्यवस्था यांवर त्यांची पूर्ण श्रद्धा होती.

### 'पार्थ द्रोणाचा केला'

पं. नेहरूंचे हे विचार म. गांधींना अपरिचित नव्हते. असे असून सन १९२९ साली त्यांचे स्वतःचे नांव काँग्रेसच्या अध्यक्षपदासाठी सुचविले गेले असता, स्वतः माघार घेऊन व सरदार वल्लभभाईंना बाजूस सारून त्यांनी पं. जवाहरलाल नेहरूंचे नांव पुढे केले व त्यांना निवडून आणले. "आमचे काहीही बौद्धिक मतभेद झाले तरी आमचे अंतःकरणाचे अद्वैत भंग पावणार नाही. पं. नेहरूंच्या मध्ये अशी सचोटी व शिस्त आहे की त्यांच्यासारखा सहकारी क्वचितच मिळतो." सन १९३८ साली ते म्हणाले की, मी माझ्या मनाशी अशी खूणगांठ बांधून ठेवली आहे की काँग्रेस-अंतर्गत घडामोडीत माझ्यात व पं. नेहरूंच्या मध्ये कांही मतभेद झाला तर त्यांचे म्हणणे मान्य केले जावे. कारण ते काँग्रेसमध्ये आहेत तर मी काँग्रेसच्या बाहेर आहे." म्हणूनच काँग्रेसचे अध्यक्षपद भूषविण्याचा पं. नेहरूंना चार वेळा मान मिळाला. 'पार्थ द्रोणाचा केला' तसे पं. नेहरूंचे भारताच्या राष्ट्रीय आंदोलनातील मानाचे स्थान त्यांना म. गांधींच्या वरदहस्तामुळेच इतक्या सहज रीतीने प्राप्त होऊ शकले.

पं. नेहरूंच्या बद्दल म. गांधी जो उघड पक्षपात दाखवीत तो सरदार पटेल प्रभृति काँग्रेस वर्किंग कमिटीच्या गांधीवादी म्हणविणारांना कधी कधी स्वाभाविकच दुःसह वाटे. काँग्रेस-संघटनेची सूत्रे सरदार वल्लभभाईंच्या हातात होती. आरंभी अ. भा. काँग्रेस कमेटीच्या कचेरीचे सरचिटणीस म्हणून पं. नेहरूंनी थोडे फार संघटनात्मक कार्य केले असले व काही होतकरू तरुण हाताशी घेऊन त्यांचेकडून काँग्रेस कचेरीमध्ये त्यांनी उमेदवारी करून घेतली असली, तरी काँग्रेस संघटनेमध्ये हुकमी बहुमत पाठीशी उभे करण्याचा खटाटोप त्यांनी कधीच केला नाही. अलाहाबादमधील अ. भा. काँग्रेस कचेरीमध्ये श्री. जयप्रकाश नारायण, डॉ. लोहिया, झेड्. अहमद, अश्रफ वगैरे परदेशातून पदव्या घेऊन आलेले पदवीधर तरुण अल्पकाल पं. नेहरूंच्या मार्गदर्शनाखाली उमेदवारी केलेल्या पैकी आहेत. दुर्दैवाने या तरुण बुद्धिवंतांपैकी एकादाही पुढे पं. नेहरूंच्या छत्र-छायेत राहिला नाही. गांधीजीना माणसे बनविण्याची व जोडण्याची अलौकिक शक्ती होती. पं. नेहरूंच्या अनेक-गुणसमुच्चयामध्ये या शक्तीचा पूर्ण अभाव होता.

### नेहरू आणि सुभाष

त्रिपुरी काँग्रेसच्या वेळी बाबू सुभाषचंद्र बोस व म. गांधी व त्यांचे साथी यांचेमध्ये जो अंतर्गत झगडा झाला त्यावेळी पं. नेहरू दोन्ही गटांपासून अलग राहिले. 'पत्रसंचय' म्हणून पं. नेहरूंच्या पत्र-व्यवहारापैकी जो भाग प्रसिद्ध झाला आहे त्यात बाबू सुभाषचंद्र बोस व पं. नेहरू यांचे दरम्यान या काळात व संदर्भात झालेला पत्रव्यवहार प्रसिद्ध झाला आहे. बुद्धिमत्ता, देशभक्ति, शौर्य, वगैरे गुणात पं. नेहरू व सुभाषबाबू यांचेमध्ये केवढे साम्य होते! पण हे झुंजार धीरोदात्त नेते, स्नेही व सहकारी म्हणून एकत्र नांदू शकले नाहीत! या मतभेदाचे मुख्य कारण या वेळी झालेल्या पत्र-व्यवहारात स्पष्ट झाले आहे. पं. नेहरूंनी सुभाषबाबूंना लिहिले आहे की "उजवा गट" "डावा गट" अशी नावे लावून राष्ट्रीय आंदोलनात या आणीबाणीच्या वेळी फूट पाडणे परिणामी हितावह होणार नाही. म. गांधींच्या नेतृत्वाशिवाय अखिल भारतीय संग्राम उभा करणे अशक्यप्राय आहे. काल्पनिक आरोप आपल्या सहकाऱ्यांवर आपण केले तर संघटना टिकणार नाही. म. गांधींची भाषा कितीही मृदु, आर्जवी व तडजोडीची असली तरी त्यांच्या अंतःकरणात धगधगणारी स्वातंत्र्यनिष्ठा शंभर नंबरी आहे." या श्रद्धेमुळे त्यांनी सुभाषबाबूंना साथ दिली नाही.

सप्टेंबर १९३९ मध्ये दुसरे महायुद्ध सुरू झाले तेव्हा पं. नेहरू रंगूनमध्ये होते. ते घाईघाईने तडक

वर्ध्यास आले. ते येण्यापूर्वी दोन दिवस काँग्रेस वर्किंग कमिटीची तांतडीची बैठक बोलावण्यात आली होती. महायुद्धासंबंधी काँग्रेसचे वतीने एक निवेदन प्रसिद्ध करावयाचे होते. पं. नेहरू वर्ध्यास पोहोचताच सर्वांकडून झालेल्या चर्चेचा वृत्तांत त्यांनी ऐकला. म. गांधींनी त्यांना दुसऱ्या दिवसाच्या चर्चेसाठी निवेदनाचा मसुदा तयार करण्यास सांगितला. ता. १४ सप्टेंबरला जे निवेदन काँग्रेसच्या वतीने प्रसिद्ध झाले त्याचा मसुदा पं. नेहरूंनी एका रात्रीत तयार केला होता. म. गांधींनी या निवेदनाचे विशेष कौतुक केले. या युद्धकालातच वर्धा येथे भरलेल्या अ. भा. काँग्रेस कमिटीच्या अधिवेशनात गांधीजी म्हणाले की, "पं. नेहरू हे माझे वारस आहेत. तेच माझे काम पुढे चालवतील. त्यांचा व माझा अनेक वेळा मतभेद होतो पण माझ्या मागे ते माझी भाषा बोलतील." त्यांच्या निस्पृह सत्यनिष्ठेमुळे व गुण-समुच्चयामुळे मी त्यांचा 'वंदिवान्' झालो आहे!"

## गांधीवाद व राज्यव्यवहार

कोणत्याही राजकीय संघटनेमध्ये असा निस्सीम सौहार्द विश्वास व गाढ स्नेह वरिष्ठ नेत्यांमध्ये क्वचितच दिसून येतो. म. गांधी व पं. नेहरू यांच्यामध्ये गाढ स्नेहादर होता. गुरु-शिष्य, सेनानी व दुय्यम मददगार, किंवा गाढ विश्वास असलेले सहकारी असे अत्यंत जिव्हाळ्याचे नाते या दोन वीर पुरुषांमध्ये निर्माण झाले होते. त्यांची साधनशुचिता, नैतिकता, व निर्भयता या तीन गोष्टींचा आपल्या मनावर खोल खोल परिणाम झाला आहे असे पं. नेहरू आदरपूर्वक सांगत. भारताच्या राज्यघटनेची जी प्रतिज्ञा आहे व जे आदेश आहेत त्यांत व्यक्त झालेला विचार व भावना भारताने व पं. नेहरू, सरदार पटेल प्रभृति म. गांधींच्या सहकाऱ्यांनी मान्य केलेला गांधी- वादाचा गाभा आहे असे मानावे. यापेक्षा निराळा असा गांधीवाद स्वतंत्र भारताच्या राज्यव्यवहारात समावू शकलेला नाही; म. गांधी हे विचाराने अराजकवादीच होते. आचार्य विनोबाजींनी सुरू ठेवलेली अखंड पदयात्रा व ग्रामदानाचे आंदोलन हीच गांधी-विचाराची परंपरा आहे. पण ती आज सर्वस्वी स्वतंत्र आहे. विधिमंडळातील काम-काजाचा व ग्रामदानी आंदोलनाचा प्रत्यक्ष असा काही संबंध नाही.

## युरोपातील समाजवादी राजवटीची छाप

सन १९२९ मध्ये रावी नदीच्या तीरावर काँग्रेसचे जे ऐतिहासिक अधिवेशन झाले त्यामध्ये भाषण करताना पं. नेहरूंनी असे स्पष्ट सांगितले होते की "मी असे स्पष्टपणे जाहीर करू इच्छितो की मी समाजवादी व लोकसत्ताकाचा भोक्ता आहे. अमीर उमराव व राजे यांचे युग समाप्त झाले आहे. तसेच सत्ता-संपत्तीचे केन्द्रीकरण करणारी उत्पादन पद्धति व समाजव्यवस्था आमूलाग्र बदलली पाहिजे असे मी मानतो". पुढे १९३७ साली नियोजन मंडळाची प्रथम स्थापना झाली तेव्हा ते म्हणाले "विज्ञान व यच्चयावत तंत्रविद्येची कास धरल्याशिवाय गत्यंतर नाही. औद्योगीकरण हाच दारिद्र्य निवारणाचा परिणामकारक मार्ग आहे. लोखंड, पोलाद, मोठमोठे कारखाने व वीज येथे तयार होईल व आपला देश स्वावलंबी बनेल असा आपण नेटाने यत्न केला पाहिजे."

म्हणजे म. गांधींच्या चरित्राचा व शिकवणुकीचा पं. नेहरूंच्यावर खोल परिणाम झाला असला तरी युरोप खंडातील लोक-कल्याण समाजवादी राजवटींचाच कित्ता पं. नेहरूंनी समोर ठेवला होता. सोव्हिएट रशियामध्ये अल्पकालात जे वैज्ञानिक व औद्योगिक स्थित्यंतर घडून आले आहे याचीही छाप त्यांच्या मनावर पडली होती.

## सहकारी सेवकसंघ-अभावी राज्ययंत्राचे दास्य

कम्युनिस्ट देशातील एक पक्षाची हुकूमशाही, राज्यकर्त्यांमधील स्पर्धा, व सर्वत्र निर्माण केले गेलेले भीतीचे वातावरण, पं. नेहरूंना तीव्रतेने नापसंत होते. याची त्यांच्यावर येवढी प्रतिक्रिया झाली की आपल्या राजवटीमध्ये कोणालाही जबर शासन करण्याचे किंवा जरब बसविण्याचे कटु कर्तव्य त्यांनी अंगावर घेतले नाही. स्वतःच्या ध्येयांशी समरस झालेल्या सहकारी सेवकांचा मिशनरी सेवासंघ उभा करण्याचा कधी प्रयत्न केला नाही; व नोकरशाहीवर पूर्णपणे भिस्त ठेवून समाज-परिवर्तन घडून आणण्याचा निकराने सतरा वर्षे श्रद्धेने यत्न केला. स्वतःप्रमाणे ध्येयधुंद, अठरा तास रोज राबणारा, लोककल्याणाची



अनुक्रमणिका






चित्तात तळमळ असणारा सहकाऱ्यांचा किंवा सेवकांचा संघ त्यांना निर्माण करता आला नाही. म्हणून या थोर नेत्याची स्वप्ने, आकांक्षा व प्रत्यक्ष कृति यामध्ये जमीन अस्मानाची तफावत पडली! स्वातंत्र्यपूर्व काळातील क्रांतिकारी नेता व स्वातंत्र्योत्तर काळातील लोकसत्ताकाचा पंतप्रधान या दोन भूमिका वठविताना त्यांची तडफ, कार्याचा उरक, ध्येयनिष्ठा, अंतःकरणाची तळमळ यांमध्ये बदल झाला नसला तरी हा थोर नेता स्वतः निर्माण केलेल्या राज्ययंत्राचा दास झाला होता ! औद्योगी- करणातून अपरिहार्यतेने निर्माण होणाऱ्या बिकट आर्थिक व सामाजिक समस्यांना समाधानकारक उत्तर शोधण्याचे चातुर्य राज्ययंत्रात नव्हते ! अशा आणीबाणीच्या वेळी उपयोगी पडेल अशी निष्णात सेवकांची राखीव तुकडी पाठीशी नव्हती ! नियतीवर भरवसा ठेवून अखेरच्या क्षणापर्यंत हा थोर नेता आपले कर्तव्य बजावीत राहिला. आपल्या मृत्युपत्रात जनतेने दिलेल्या अलोट प्रेमाबद्दल त्याने कृतज्ञता व्यक्त केली आहे !

म. गांधी-नेहरूंच्या या भारतात यांच्यामागे पंधरा-वीस वर्षांच्या काळात एक पोकळी निर्माण झालेली दिसावी, नाव समाजवादाचे अन् कृति भांडवलशाही द्रव्य संचयाची अशी सर्व क्षेत्रात स्थिती निर्माण व्हावी हे आश्चर्य आहे. असे का व्हावे ? जरब, शासन, भय यांचा उपयोग केल्याशिवाय संपत्तीने व समजुतीने समाजक्रांति होणे अशक्य आहे असा का याचा अर्थ लावायचा ?

आपल्या राज्यघटनेमध्ये उद्घोषित केलेल्या तत्वांवर आधारलेला एकरस समाज भारतात निर्माण झाल्याशिवाय आपली लोकशाही राज्यावर सुस्थिर होणार नाही. असा समाज अल्पकाळात येथे निर्माण होईल असा सामुदायिक यत्न करणे व चालू ठेवणे हेच या दोन पुण्यश्लोक क्रांतिकारी नेत्यांचे खरे स्मारक आहे.

---





अनुक्रमणिका








श्री. व. भ. कर्णिक

# पं. नेहरू आणि चीन

पं. नेहरूंचे जीवन एकंदरीने ऊर्जस्वल खरे; पण त्या जीवनामध्ये एक अत्यंत अपेशी असा परिच्छेद होता. भारत आणि चीन यांच्यामधील संबंध आणि त्या संबंधांविषयी त्यांनी बांधलेली धोरणे हाच तो अत्यंत अयशस्वी असा परिच्छेद. चीनबद्दल त्यानी मनाशी बांधलेल्या कल्पना, त्याच्या राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय धोरणाविषयी त्यानी केलेली अनुमाने, भारताकडे पहावयाच्या त्याच्या दृष्टीकोनाविषयी त्यानी स्वीकारलेली धोरणे—ही सारी इतकी मिथ्या ठरली की त्यांच्यासारख्या जाणकार माणसाच्या हातून इतकी ढोबळ चूक कशी झाली याचेच पुष्कळ वेळा खूप नवल वाटते. १९६२ साली भारतावर आक्रमण करुन चीनने जे विश्वास घातकी वर्तन केले त्यामुळे भारत आणि चीन यांच्या परस्परसंबंधाबद्दल पं. नेहरू यानी आपल्या मनामध्ये जे एक स्वप्न उभे केले होते त्याचा चक्काचूर झाला आणि या भीषण आघाताचा त्यांच्या संवेदनशील मनावर फार वाईट परिणाम झाला. अखेरीच्या वर्ष दीड वर्षामध्ये त्यांच्या मनाला सतत जर कोणची गोष्ट बोचत असेल तर ती हीच चीनची दगाबाजी असावी, आणि तिनेच त्यांचे मरण जवळ आणले असावे असे म्हणावयास हरकत नसावी.

भारत आणि चीन ही दोन्ही आशियाई राष्ट्रे, भौगोलिक दृष्ट्या एकमेकांना बिलगून उभी राहिलेली, ऐतिहासिक काळामध्ये दोघांमध्ये प्रेमाचे आणि सलोख्याचे संबंध होते, आणि नुकतीच कुठे साम्राज्यशाहीच्या जोखडाखालून दोघेही मुक्त झालेली, आणि दोन्ही देश इतके विस्तीर्ण की दोघानाही दुसऱ्याच्या मुलुखाची अभिलाषा नसावी—अशीही दोन आशियाई राष्ट्रे आशियामध्ये गुण्यागोविंदाने नांदतील आणि जगाला आंतरराष्ट्रीय शांततेचे व सहकार्याचे एक नवीन उदाहरण घालून देतील अशीच पं. नेहरूंची कल्पना होती. आशियाई राष्ट्र म्हणून त्याना चीनबद्दल जिव्हाळा वाटत होता. त्यात शंभर दीडशे वर्षे युरोपियन राष्ट्रांच्या हाती चीनला जे हाल सहन करावे लागले त्यामुळे वाटणाऱ्या करुणेची भर पडली; शिवाय या युगात आशियाने युरोपला घालून दिला पाहिजे ही महत्वाकांक्षा. त्यामुळे पं. नेहरूंच्या डोळ्यासमोर चीनचे असे लोभसवाणे चित्र उभे राहिले, की त्या चित्राच्या चिंतनात त्यांचा विवेक लुळा पडला. रामायणातील सुवर्णमृगाची या ठिकाणी आठवण होते. पं. नेहरूंची पुढील काही वर्षे त्या चीनरूपी सुवर्णमृगाचा पाठलाग करण्यात गेली.

पं. नेहरूंना दुसरे आकर्षण वाटत होते ते चीनमधील साम्यवादी राजवटीचे. पं. नेहरू साम्यवादी नव्हते; साम्यवादाशी त्यांचे अनेक मूलभूत स्वरूपाचे मतभेद होते. विशेषेकरुन साम्यवादाचे हिंसक मार्ग त्याना मुळीच पसंत नव्हते. तरीदेखील साम्यवादाच्या उद्दिष्टाबद्दल त्याना एक प्रकारचे प्रेम होते. साम्यवाद ही प्रगतीची खूण आहे अशी त्यांची निष्ठा होती. त्यामुळे साम्यवादी राष्ट्रांकडे त्यांचे मन आपसूकच ओढ घेत असे. विशेषेकरून चीनमध्ये पारतंत्र्य संपताच कामगार-शेतकऱ्यांचे राज्य स्थापन झाले याबद्दल त्याना खूप बरे वाटत होते. साम्यवादातील व साम्यवादी कामगार-शेतकऱ्यांच्या राजवटीतील अन्याय व जुलूम जबरदस्ती त्यांच्या डोळ्यात खुपत नव्हती असे नाही; पण हे प्राथमिक अवस्थेतील दोष आहेत असे मानून ते त्यांच्याकडे कानाडोळा करीत असत. चीनमधील साम्यवादी राज्य देशातील दैन्य व दारिद्र्य नष्ट करील, एवढेच नव्हे तर जागतिक शांततेचा पुरस्कार करील अशी त्यांची अपेक्षा होती. राष्ट्रवादी चीनपेक्षा साम्यवादी चीन त्यांना जवळचा वाटे आणि याच मापाने आशियातील इतर सर्व राष्ट्रांना मापून चीनच भारताला सर्वापेक्षा








अधिक जवळचा आहे असा त्यांचा विश्वास होता. हा विश्वास निष्ठा म्हणून स्वीकारताना साम्यवादाच्या आक्रमण-शीलतेकडे त्यांचे दुर्लक्ष झाले; आणि हीच चूक त्यांना शेवटी भोवली.

चीनबद्दल सल्ला देणारे जे सल्लागार त्या काळात पं. नेहरूंना लाभले ते स्पष्ट विचारसरणीचे व निर्भीडपणे खरे तेच बोलणारे नव्हते हे त्यांचे आणि देशाचेही दुर्दैव ठरले. बरेच जण होते ते पंडितजींच्या मनाचा कल पाहून बोलणारे होते. काही जण होते ते उगवत्या सूर्याचे उपासक होते. राजवट कोणतीही असो, प्रस्थापित राजवटीच्या बाजूने बोलणे हाच त्यांचा धर्म होता. आणखी काहीजण होते त्याना या ना त्या कारणामुळे साम्यवादाचे आकर्षण वाटत होते. मेलेल्या माणसाबद्दल वाईट बोलू नये, असा प्रघात आहे. पण खरेच बोलायचे झाले तर पं. नेहरूंना साम्यवादी चीनविषयी चुकीची माहिती पुरविल्याबद्दल व त्याना अयोग्य सल्ला दिल्याबद्दल अधिकात अधिक दोष जर कुणाला देता येत असेल तर तो सरदार पनीकर यांना. ते त्या काळात भारताचे पेकिंग येथे वकील होते. त्यांच्याकडूनच भारत सरकारला नव्या साम्यवादी राजवटीबद्दल माहिती मिळत असे. ही माहिती साम्यवादी राजवटीची उजळ बाजूच अधिक दाखवीत असे. सरदार पनीकराना त्या राजवटीबद्दल एक प्रकारचे प्रेम होते. कुटुंबातील काही मंडळी साम्यवादी विचारसरणीची होती, हेदेखील त्याचे एक कारण असू शकेल. शिवाय त्या काळात चिनी साम्यवादी पक्ष, हा खरोखर साम्यवादाचा पुरस्कर्ता नसून, शेतकरी क्रांतीचा पाईक आहे असा एक विचारप्रवाह प्रचलित होता. त्याचा देखील सरदार पनीकर व इतर भारतीय मुत्सद्दी व अधिकारी यांच्या मनावर परिणाम झाला असेल. खेरीज साम्राज्यशाहीविरोधी, म्हणजेच इंग्लड-अमेरिकाविरोधी, मनोवृत्ती होतीच. त्यामुळे जनमत सर्वसाधारणपणे साम्यवादी चीनला अनुकूल असे होतेच. पं. नेहरूंच्या चीनविषयक धोरणावर या सर्व गोष्टींचा परिणाम झालेला असावा.

पं. नेहरूंच्या चीनविषयक धोरणाचे पहिले कडू फळ दृष्टीस पडले ते १९५० साली चीनने तिबेटवर स्वारी केली त्यावेळी. वास्तविकपणे यावेळी पं. नेहरूंचे स्वातंत्र्यवादी मन खळबळून उठायला हवे होते. इंग्रजानी स्वत:च्या धोरणासाठी तिबेटला चीनचे मांडलिक म्हणून लेखले असले, तरी प्रत्यक्षात तो देश स्वतंत्र होता आणि वेळोवेळी स्वातंत्र्यरक्षणासाठी त्याने चीनबरोबर निकराची युद्धे लढवली होती. शिवाय जुना इतिहास काहीही सांगत असला तरी तिबेटचे लोक चीनी लोकांपेक्षा वेगळे होते आणि, विसाव्या शतकात तरी निदान त्यांच्या स्वयंनिर्णयाच्या हक्काला मान्यता मिळायला हवी होती. कुणालाही सुचावे असे हे विचार. पण स्वातंत्र्याचा आणि स्वयंनिर्णयाचा निधड्या छातीने पुरस्कार करणाऱ्या पं नेहरूंना त्यावेळी हे विचार सुचले नाहीत. त्यानी चीनला तिबेटचे स्वातंत्र्य पायदळी तुडवू दिले, एवढेच नव्हे तर चीनला तिबेटवर अधिराज्य चालविण्याचा अधिकार आहे. हे देखील मान्य केले. पं. नेहरूंच्या या घोर चुकीचा आज भारताला दारुण परिणाम भोगावा लागत आहे.

तिबेटच्या स्वातंत्र्याचे तिबेटच्या दृष्टीनेच नव्हे तर भारताच्या दृष्टीने देखील हरप्रयत्नाने रक्षण करणे आवश्यक होते. तिबेट आज चीनच्या ताब्यात आहे यामुळेच हिमालयाचे रक्षण करणे आपल्याला फार कठीण झाले आहे. चीनला तिबेटच्या पठारांचा उपयोग करता येतो आणि मन मानेल तेव्हा हिमालयाच्या खिंडीतून भारतामध्ये सैन्य घुसवता येते. आपल्याला मात्र त्या नगाधिराजाच्या गिरिकुहरामध्ये आपल्या सैन्याची जमवाजमव करावी लागते. पर्वताच्या शिखरावरती सर्व तऱ्हेची तयारी करून नंतर टोळधाडीप्रमाणे खाली कोसळणाऱ्या आक्रमक सैन्याचा बंदोबस्त करणे फार कठीण असते हे कुणीही युद्धशास्त्रविशारद सांगू शकेल. तिबेट चीनच्या पदरात टाकल्यानंतर भारताला आज त्या कठीण परिस्थितीला तोंड द्यावे लागत आहे.

चीनने तिबेट गिळंकृत केला त्या वेळी भारताला ती आपत्ती टाळण्यासाठी काही करता आले नसते







# पं. नेहरू आणि चीन

असा एक युक्तिवाद लढवला जातो. या युक्तिवादामध्ये कितपत तथ्य आहे ते लष्करी तज्ञच सांगू शकतील. त्या काळात आपले लष्करी सामर्थ्य चीनला अटकाव करता येईल एवढे नव्हते, हे कदाचित् खरे असेल, पण चीनचे लष्करी सामर्थ्यही त्यावेळी मोठे नव्हते. शिवाय चीनची मोठी फौज त्या सुमारास कोरियातील युद्धात गुंतून पडली होती. म्हणून भारताला काहीच करता आले नसते हे मानणे बरेच कठीण वाटते. पण लष्करी प्रतिकाराचा हा प्रश्न बाजूस ठेवला तरी मुख्य प्रश्न उरतो तो हा की चीनच्या या पाशवी अतिक्रमणावर आपल्या संमतीचे शिक्कामोर्तब का केले ? तिबेट हे स्वतंत्र राष्ट्र आहे हा आग्रह आपण का धरला नाही? तसेच लष्करी बळाने काबीज केलेल्या मुलुखावरील चीनची सत्ता कायदेशीर नव्हे अशी भूमिका आपण का घेतली नाही ? निदानीला चीनविरुद्ध आणि तिबेटच्या बाजूने आपण आपला आवाज तरी घोषित करायला हवा होता. पण पं. नेहरूंना त्यावेळी चीनविषयी काय भुरळ पडली होती कुणास ठाऊक, त्यांनी चीनच्या या आक्रमक वृत्तीकडे दुर्लक्ष केले आणि तिबेटच्या स्वातंत्र्याला जे खग्रास ग्रहण लागले त्याच्याविरुद्ध चकार शब्द देखील काढला नाही.

नऊ वर्षानंतर तिबेटमध्ये चीनविरुद्ध बंड उभे राहिले, त्यावेळी मात्र पं. नेहरूंनी जरा वेगळी भूमिका घेतली. तिबेटमधून ज्याना ज्याना पळून यावे लागले त्या सर्वांना भारताने आश्रय दिला. दलाई लामांचेही मोठ्या प्रेमाने आणि आदराने स्वागत केले आणि त्याना इथे मानाने राहता येईल अशी सोय केली. पं. नेहरूंच्या धोरणात बदल झाला होता म्हणूनच या गोष्टी शक्य झाल्या. चीनला आपले वर्तन पसंत पडणार नाही याची त्याना पुरी कल्पना होती. पण एव्हाना त्यांचा बराचसा भ्रमनिरास झाला होता. त्यामुळे त्यानी रागाची पर्वा केली नाही. तिबेट स्वतंत्र राष्ट्र म्हणून पुन्हा नांदायला सुरवात झाली पाहिजे या गोष्टीचा पुकारा करायला मात्र त्यांची शेवटपर्यंत तयारी नव्हती. दहा वर्षापूर्वी घेतलेली भूमिका अयोग्य व अन्यायाची ठरली तरी ती सोडायला ते तयार झाले नाहीत.

तिबेटच्या स्वातंत्र्याच्या अपहरणानंतर साम्यवादी चीनने आपले आसन बळकट करून हलके हलके आशिया खंडातील सर्व राष्ट्रांभोवती आपले पाश टाकण्यास सुरवात केली. भारताने चीनचे हे आक्रमक धोरण ओळखून त्याला तोंड देण्यासाठी आशियातील लहानथोर राष्ट्रांची एकजूट बनवावयाला हवी होती. पण पं. नेहरूंना चीनचे हे विस्तारवादी धोरण मुळी दिसलेच नाही. साम्यवाद विस्तारवादी धोरण स्वीकारणेच शक्य नाही अशी त्यांची भावना होती. चीनला जगामध्ये मानाचे स्थान नाही, इंग्लंड अमेरिका आदि करून राष्ट्रे त्याला पाण्यात पाहतात, म्हणून ते थोडे-बहुत तऱ्हेवाईकपणाने वागते, बाकी ते अतिशय शांततावादी असे राष्ट्र आहे, असा युक्तिवाद मनाशी लढवून पं. नेहरूनी चीनचा पाठपुरावा करण्याचे ठरविले आणि जगभर त्याच्या वतीने वकीली केली. या धोरणाची परिसीमा बांडुंग परिषदेच्या वेळी घडली. त्यावेळी पं. नेहरूंनी चीनला आशियाई राष्ट्रामध्ये मानाचे स्थान मिळवून दिले. भारतापुरते बोलावयाचे तर तो काळ हिंदी चिनी भाई भाई युगाचा होता. भारत आणि चीन यांच्यामध्ये जणू प्रेमाचा पूर वहात होता. या प्रेमामध्ये मश्गुल राहून पं. नेहरूंनी उत्तर सीमेच्या संरक्षणाकडे दुर्लक्ष केले. तसेच आशियाई राष्ट्रांमध्ये मित्र जोडण्याऐवजी त्यांना बेफिकीरीने वागवले. त्या बेफिकीरीचा परिणाम एवढाच झाला की ती सारी राष्ट्रे क्रमाक्रमाने चीनच्या प्रभावळीत सामील झाली. १९६२ च्या ऑक्टोबरमध्ये चीनने जेव्हा भारतावर अचानक हल्ला चढविला त्यावेळी या गोष्टीचे स्पष्ट प्रत्यंतर मिळाले.

चीन आपल्यावर हल्ला करील असे पं. नेहरूंना कधी स्वप्नातही वाटले नव्हते. वास्तविकपणे ५६-५७ सालापासून चीनने कुरापती काढायला सुरवात केली होती. त्यामुळे भारत सरकारने सावध होऊन संरक्षणाची सिद्धता करायला हवी होती. पण पं. नेहरू व युद्धमंत्री श्री. मेनन यांच्यासारखे त्यांचे सहकारी यांचा चीनवर एवढा अपार विश्वास होता की त्याना त्या सिद्धतेची जरूरी भासली नाही. मेनन साहेबांचे तर कटाक्षाने सांगणे

होते की पाकिस्तान हाच भारताचा खरा आणि एक नंबरचा शत्रू आहे. त्यामुळे भारतीय सैन्य पाकिस्तानी सीमेवर सज्ज होऊन खडे होते; उत्तर सीमा मात्र जवळ जवळ मोकळी पडली होती. चीनने भारताच्या या बेसावधपणाचा फायदा घेतला. भारतीय सैन्याला त्या वेळी जो प्रचंड पराभव सहन करावा लागला त्याचे कारण राजकीय स्वरूपाचे होते. भारत सरकारची राजनीती त्याला जबाबदार होती. आणि भारत सरकारची राजनीती म्हणजे पं. नेहरूंची राजनीती.

चीनच्या आक्रमणानंतर मात्र पं. नेहरूंचा भ्रमनिरास झाला. तोवर ते, त्यांनी स्वतःच म्हटल्याप्रमाणे कल्पनानिर्मित अशा भ्रामक जगामध्ये वावरत होते. आक्रमण होताच त्यांचे तेज आणि त्वेष उफाळून बाहेर पडले. आपल्या चैतन्यमय वाणीने आणि कृतीने त्यानी सबंध देशाला जाग आणली आणि चीनशी मुकाबला करायला त्याला त्यानी तयार केले. अलिप्ततेचे धोरण तात्पुरते गुंडाळून ठेऊन त्यानी मिळेल तिथून मदत घेतली आणि देशाची संरक्षणसिद्धता वाढवली. आणीबाणीच्या त्या कालात पं. नेहरूनी जे कार्य केले त्यावद्दल देश त्यांचा सदैव ऋणी राहील. पण हे ऋण मान्य करून देखील हा विचार मनात आल्यावाचून राहत नाही की चीनच्या बाबतीत इतके आंधळ्या विश्वासाचे धोरण स्वीकारले गेले नसते तर कदाचित् ही आपत्ती ओढवली नसती, निदानीला आपत्तीला तांड देण्यासाठी आपण अधिक सज्ज राहिलो असतो.

पं. नेहरूंचे चीनविषयक धोरण काही पूर्वग्रहावर आधारलेले होते. आशियाई राष्ट्र म्हणजे ते आपल्याला अधिक जवळचे हा पहिला पूर्वग्रह नव्याने स्वतंत्र झालेले राष्ट्र, पारतंत्र्याचा स्वतःच अनुभव घेतल्याकारणाने, दुसऱ्यावर पारतंत्र्य लादण्याचा उद्योग करणार नाही हा दुसरा पूर्वग्रह. आणि तिसरा व अधिकात अधिक भयावह असा पूर्वग्रह तो हा की साम्यवाद ही प्रगतीची वाटचाल आहे आणि साम्यवादी राष्ट्र आक्रमणाचा आणि युद्धाचा मार्ग कधीही स्वीकारणार नाही, हे सर्व पूर्वग्रह पुन्हा परत तपासून पाहिले पाहिजेत. चीनने, अर्थात् आपल्या धोरणानी आणि कृतीनी त्यांचे वैयर्थ्य बरेचसे सिद्ध केले आहे. म्हणून परराष्ट्राविषयीचे धोरण हे नेहमी पूर्वग्रह अगर स्वप्नरंजन यांच्या ऐवजी प्रत्यक्ष परिस्थितीचा अभ्यास करूनच ठरविले पहिजे हे काय वेगळे सांगावयास हवे ?

चीनचे सामर्थ्य वाढत आहे. नुकताच त्याने अणुबाँबचा स्फोट केला. अण्वस्त्रे तयार करून अणुशक्तीसंपन्न असे प्रभावी राष्ट्र बनण्याची त्याची महत्वाकांक्षा आहे. चीनच्या या वाढत्या सामर्थ्याचा प्रभाव आशिया व आफ्रिका खंडातील नवोदित राष्ट्रावर पडू लागला आहे. या सर्व घटना भारताच्या दृष्टीने अत्यंत भयावह स्वरूपाच्या आहेत. भारतीय प्रदेशावरील आपला दावा चीनने अद्याप सोडलेला नाही. शिवाय लोकशाही मार्गाने आपल्या देशाची जी प्रगती होते आहे तिच्याबद्दलचा त्याच्या मनातील मत्सर आणि संताप अद्याप कमी झालेला नाही. म्हणून आपला देश आणि चीन यांच्यामध्ये मैत्रीऐवजी संघर्ष वाढण्याची जास्त शक्यता आहे हे लक्षात ठेवावयास हवे. चीन आणि रशिया यांच्यामधील वाढत्या दुराव्यामुळे जो दिलासा आपल्याला काही काळ लाभला होता, तो फार दिवस टिकणार नाही अशी धास्ती निर्माण करणाऱ्या काही घटना नुकत्याच रशियामध्ये घडून आल्या आहेत. या सर्व नव्याने घडणाऱ्या घटनांचा विचार केला की पं. नेहरूंच्या धोरणाचे, मग ते चीनविषयक असो किंवा एकंदर परराष्ट्राशी ठेवावयाच्या संबंधाविषयीचे असो, केवळ अंधानुकरण करण्याऐवजी स्वतंत्र प्रज्ञेने परिस्थितीला साजेसे नवे धोरण आखणे जरूरीचे आहे असे कोण म्हणणार नाही ?












# ही ज्योत सतत जागती ठेवा



ज्योत जागती ठेवण्यासाठीं
तेलाचा अखंड पुरवठा हवा;
तसेंच निष्ठायुक्त सेवेसाठीं
स्फूर्तीचा झरा वाहता हवा.
निरेपक्ष जनसेवेचें व्रत
चालू ठेवण्याची पुनर्प्रतिज्ञा
करण्यास शुभ-समय म्हणजे
ही महन् मंगल दिवाळी !

राष्ट्र सेवेंत सदैव मग्न




**मध्य आणि पश्चिम रेल्वे**
**यांजकडून प्रकाशित**





अनुक्रमणिका

श्री. वि. म. बेडेकर

# विज्ञान आणि अध्यात्म यांचा मनोज्ञ संगम

## गुणद्वंद्वांचा मधुर मिलाफ

जवाहरलाल नेहरूंच्या विभूतिमत्त्वात अनेक विरोधाभासी गुणद्वंद्वांचा मधुर मिलाफ झालेला आढळून येतो. बुद्धिवादी असूनही ते तरलभावनाशील होते, राजकारणी मुत्सद्दी असूनही संवेदनाशील कविहृदयी होते, भारतीय असूनही विश्वनागरिक होते, राष्ट्रभक्त असूनही आंतरराष्ट्रीय होते, सत्ताप्रेमी सत्ताधीश असूनही लोकशाहीवादी होते, विज्ञाननिष्ठ असूनही अध्यात्मवादी होते. या सर्व गुणांचा आविष्कार व मनोहर मेळ त्यांच्या जीवनातून व ग्रंथातून प्रतीत होतो. प्रस्तुत लेखात, त्यांच्या जीवनदर्शनात व जीवनात विज्ञान व अध्यात्म यांचा कसा मधुर मिलाफ घडून आला होता, याचेच दिग्दर्शन करावयाचे आहे.

## बुद्धिवादी, सडेतोड दृष्टिकोण

प्राचीन भारतीय संस्कृतीचे संस्कार नेहरूंच्या रक्तात साहजिकच भिनले होते. तरीपण पुढे शिक्षणाने, विचाराने व श्रद्धेने ते विज्ञाननिष्ठ मानवतावादी बनले त्यामुळे प्राचीन भारतीय संस्कृतीचे ते निःसीम उपासक असूनही त्यांची भारतीय संस्कृतीवरील श्रद्धा अंध राहिली नाही. भारतीय संस्कृतीची जी भारतीय जनमानसावर पकड आहे तिच्यात भिन्न भिन्न तऱ्हेच्या जनमानसाप्रमाणे अनेक कल्पनांचे बेरवाईट, उच्चनीच स्तर दिसून येतात. जादूटोणा, मंत्रतंत्र, अनेकदेवताविषयक भोळ्याभाबड्या अंधश्रद्धा यांपासून तो आत्म्याचे अमरत्व, पुनर्जन्म, परलोककल्पना, ईश्वरकल्पना, कर्मविपाक, जन्मनिष्ठ जाती इत्यादि कल्पनांचा पगडा भारतीय जनमनावर पडलेला दिसून येतो. या कल्पनाजालाबाबत नेहरूंचा दृष्टिकोण किती बुद्धिवादी व सडेतोड होता हे त्यांच्या 'डिस्कव्हरी ऑफ इंडिआ' या ग्रंथातील खालील उताऱ्यावरून दिसून येईल.

"धर्मांचे– त्याचे जे प्रत्यक्ष आचरण होत आहे ते पहाता– मला कधीच आकर्षण वाटले नाही. धर्मभोळ्या समजुती आणि 'बाबावाक्यं प्रमाणम्' यासारख्या गृहीत श्रद्धा यांच्याशीच धर्म निगडित झालेला दिसून येतो. जीवनविषयक प्रश्नांकडे पहावयाची धर्मांची दृष्टी विज्ञानदृष्टीपेक्षा अगदीच वेगळी आहे, जादूटोणा-मंत्रतंत्र, भोळीभाबडी अंधश्रद्धा आणि चमत्कारावर विश्वास यांचेच प्राबल्य धर्मांत दिसून येते." (पान ११)*

"माझा पिंड असा आहे की, मला या इहलोकाविषयीच, ऐहिक जीवनाविषयीच रस वाटतो, परलोकाविषयी किंवा मरणोत्तर जीवनाविषयी नाही. आत्मा आहे की नाही, मरणोत्तर आत्मा शिल्लक रहातो की काय, हे प्रश्न महत्त्वाचे असतीलही; पण मला त्यांची बिलकुल क्षिती नाही. ज्या सामाजिक परिसरात मी वाढलो, त्यात आत्मा, मरणोत्तर जीवन, कर्मसिद्धान्त आणि पुनर्जन्म या गोष्टी निःशंकपणे गृहीतच धरलेल्या असत. माझ्यावर या गोष्टींचा संस्कार अर्थातच झाला आहे आणि या गृहीत गोष्टी खऱ्याही असू शकतील असे मानण्याकडे एका दृष्टीने माझा कल आहे. आत्मा असेल व तो शरीरपातानंतर टिकूनही रहात असेल. जीवनातील आपल्या कर्मांना कार्यकारणभावाच्या साखळीत जखडून टाकणारा कर्मसिद्धान्त तर्कदृष्ट्या सुसंगतही असू शकेल. अर्थात् आदिकारणाचा विचार करू लागले तर कर्मसिद्धान्तातही विसंगती उभ्या रहातात, हे खरेच. जर आत्मा असेलच तर मग पुनर्जन्माचा सिद्धांतही सयुक्तिक वाटू लागतो. पण या सर्व गृहीत धरलेल्या गोष्टी असू शकतील असे मला वाटत असले तरी ते माझे वाटणे धार्मिक श्रद्धेच्या पोटी नाही. हे माझे विचार केवळ बौद्धिक तर्क आहेत आणि ते अशा अज्ञात क्षेत्रासंबंधी, की त्याच्याविषयी आपले

* पानांचे आकडे 'डिस्कव्हरी ऑफ इंडिआ' (लंडन १९५१) या आवृत्तीतील असून, प्रस्तुत लेखातील उतारे मूळ इंग्रजीवरून केलेले मुक्त अनुवाद आहेत.








ज्ञान नसल्यासारखेच आहे. या बौद्धिक तर्कांचा माझ्या जीवनावर काही परिणाम झालेला नाही. ते खरे-खोटे ठरले तरी मला त्याचे काही सोयरसुतक नाही. ''
– ( पान. १२–१३ )

## आधुनिक आस्तिक्यभावना

ईश्वरकल्पनेविषयी नेहरूंनी प्रकट केलेले चिंतन आधुनिक विज्ञाननिष्ठ मानवतावादी विचार त्यांनी किती तन्मयतेने आत्मसात् केले होते याची साक्ष देते. ईश्वर ही कल्पना त्यांना मान्य नसली तरी, मानव आपल्या विवेकशक्तीने व हृदयाने ज्या आशा-आकांक्षा, जी ध्येये बाळगतो, ती ध्येयेच मानवाचे देव कसे बनतात, व या देवाप्रीत्यर्थ मानवाने किती दिव्ये करून दाखविली आहेत, याचे त्यांनी मोठे सुरस वर्णन केले आहे. त्या दृष्टीने विचार करता, नेहरू हे ' आस्तिक 'च म्हटले पाहिजेत. मानवाच्या सृष्टीतील स्थानाविषयी व भवितव्याविषयी त्यांच्या मनात पावित्र्यबुद्धि व मांगल्यभावना कशी सदैव जागृत होती, याचे प्रत्यंतर पुढील उताऱ्यांवरून येईल.

'' परमेश्वर आहे असे धरून चालले तरी लाचारीने त्याच्या तोंडाकडे पहात बसणे वा त्याच्यावर विसंबून असणे केव्हाही इष्ट नाही. अतिमानवी किंवा दैवी शक्तीवर विसंबून राहिल्याने पुष्कळ वेळा माणसाचा आत्मविश्वासच नाहीसा होण्याचा व माणसामधील सामर्थ्य व सर्जनशक्तिच खुरटून जाण्याचा संभव असतो. तथापि ईश्वरावर विश्वास असो वा नसो, परंतु भौतिक जगाच्या पलीकडील असलेल्या आध्यात्मिक गोष्टींवर, नैतिक–आध्यात्मिक–ध्येयवादी कल्पनांवर काही श्रद्धा असणे आवश्यकच आहे; नाहीतर आपल्या जीवनाला काही उद्दिष्ट वा हेतूच रहाणार नाही व आपले जीवन नांगर तुटलेल्या गलबताप्रमाणे सैरावैरा धावून नष्ट होईल. आपणास त्याची जाणीव असो वा नसो, पण आपणापैकी बहुतेकांची श्रद्धा कशावर तरी असतेच असते. आपण एखाद्या अज्ञात देवाची मनोमन पूजा करीतच असतो. मग तो देव एखादे वैयक्तिक, राष्ट्रीय वा आन्तरराष्ट्रीय ध्येय असो वा एखाद्या आदर्श पुरुषाची व आदर्श जगाची कल्पना असो, तो पूर्ण आदर्श गाठणे आपणास अशक्यच असते, परंतु त्याकरिता आपली धडपड पिढ्यानुपिढ्या चालूच असते, आपणामधील चिच्छक्तीचा दुर्दम्य स्रोत आपणास स्वस्थ बसू देत नाही. '' ( पान ४८९ )

''मानवाची भावना-विचार-क्रियाशक्ति किती आश्चर्यकारक आहे ! युगानुयुगातून मानवाने एकाद्या ध्येयाकरिता, सत्याकरिता, श्रद्धास्थानाकरिता, देशाकरिता, स्वाभिमानरक्षणासाठी आपले सर्वस्व व प्राणही वेचले आहेत ! ध्येय बदलले पण मानवाची सर्वस्वत्यागाची जिद्द कायमच आहे. विनाश ' आ ' वासून उभा असताना देखील तो आपली प्रतिष्ठा वा स्वतः जतन केलेल्या मूल्यांवरील श्रद्धा विसरला नाही. निसर्गशक्तींच्या हातातील केवळ एक खेळणे, या अफाट विश्वातील एका धूलिकणाचीही ज्याला सर नाही असा हा मानव ! पण त्याने अचाट निसर्गशक्तींना आव्हान देऊन आपल्या विवेकशक्तीने– क्रान्तीची जन्मभूमी असलेल्या विवेकशक्तीने– त्यांना कह्यात आणण्याचा प्रयत्न केला आहे ! कोणी देव असोत वा नसोत, एवढे मात्र खरे की मानवातच असे काही तरी देवत्व वा दिव्यत्व वास करीत आहे ! '' – ( पान १७–१८ )

## विज्ञानाशी सुसंगत असे अध्यात्म

आधुनिक बाह्यविश्वविषयक शास्त्रीय संशोधनाने जो विज्ञाननिष्ठ दृष्टिकोन विकसित झाला आहे त्यातूनच मानवी मनातील अंतर्विश्वाकडे पहाणारे, त्यांतील घटनांचा शोध घेणारे एक नवीनच मानवतावादी अध्यात्म उदयास येत आहे. या मानवतावादी अध्यात्माला मानवी मनातील नैतिक, कलाविषयक, सांस्कृतिक भावभावनांचे अभिनव दर्शन होत असून मानवाच्या उज्ज्वल भवितव्याबद्दल, मानवतावादी शास्त्रज्ञ अत्यंत आशादायक श्रद्धा बाळगून आहेत व विश्वातील चिच्छक्तीच्या एकतेच्या साक्षात्काराची चुणुक त्याच्याही प्रत्ययास येत आहे. अशाच वैज्ञानिक दृष्टिकोनातून मानवी व मानवेतर सृष्टीकडे पहात असताना नेहरूंनाही या नवीन आध्यात्मिक अनुभूतीचा ईषत् साक्षात्कार झालेला दिसून येतो. त्यांनी लिहिले आहे :

'' आपल्या तत्त्वजिज्ञासेला आपण वैज्ञानिक दृष्टीची व वृत्तीची जोड देऊन आणि अतिभौतिक गोष्टींविषयी आदरभाव बाळगून आपल्या जीवनविषयक प्रश्नांना तोंड दिले पाहिजे. तरच जीवनाची समग्र दृष्टि आपणास प्राप्त होईल. त्या समग्र दृष्टीच्या पल्ल्यात आपणास वर्तमान व भूत यातील उंच-सखल भागांचे जसे दर्शन घडून येईल तसेच भविष्यकालाकडेही आपण शांतपणे व प्रसन्नतेने नजर टाकू शकू. आपणाभोवती जसे सौन्दर्य पसरले











आहे तसेच त्या शेजारी दुःखही खेटून उभे आहे. आपणा मानवांचा जीवनपथावरील प्रवास म्हणजे सुख–दुःखाचे विचित्र मिश्रण आहे. पण याच मार्गाने आपण शिकत असतो व प्रगति करीत असतो. बाह्य घटना व त्यांचे पडसाद यांचा आपणावर मोठा परिणाम होत असतो हे खरे. पण सगळ्यात मोठे हादरवून टाकणारे धक्के आपल्या मनाला बसतात ते आंतरिक भीती आणि संघर्ष यांमुळे. बाह्य भौतिक पातळीवर आपण प्रगति केलीच पाहिजे नाहीतर आपण खलासच होऊन जाऊ. पण त्याबरोबरच आपण आपल्या मनामध्ये, आपापसांमध्ये, आपल्या सभोवार परिस्थितीशी सुसंवाद राखून शांति मिळविली पाहिजे. अशा शांतीमुळे आपणास शारीरिक व भौतिक गोष्टीत समाधान लाभेल एवढेच नव्हे तर त्याबरोबरच मानवाला त्याच्या आंतरिक कल्पक प्रेरणांमुळे व धाडसी वृत्तीमुळे विचाराच्या आणि कृतीच्या क्षेत्रात आरंभापासून आतापर्यंत बरीवाईट वाटचाल करीत असताना जे मानवी म्हणून वैशिष्ट्य प्राप्त झाले आहे त्या प्रेरणांचेही समाधान होईल." ( पान ४८९ )

"मी जेव्हा या जगाकडे पहातो, तेव्हा काही गूढ, आश्चर्यकारक आणि अथांग असे आपणापुढे पसरले आहे अशी संवेदना मला होते. हे गूढ आपल्या शक्तीप्रमाणे समजून घ्यावे, त्याच्याशी एकतान होऊन, त्याच्या पूर्णतेचा अनुभव घ्यावा अशी मला प्रेरणाही उत्पन्न होते, परंतु हे गूढ समजून घ्यावयाची पद्धति मूलतः वैज्ञानिक, वस्तुनिष्ठच असावी असे मला वाटत आले आहे. अर्थात पूर्णपणे वस्तुनिष्ठता येणे शक्य नाही हे खरे. पण आत्मनिष्ठता ही जर अगदी अनिवार्य व अपरिहार्यच असेल तर तिला वैज्ञानिक पद्धतीचे नियंत्रण असणे जरूर आहे एवढेच.

"ज्याची मला संवेदना होते ते गूढ काय आहे, कोणास ठाऊक! मी त्याला परमेश्वर म्हणत नाही. कारण परमेश्वर म्हटले की अशा काही गोष्टी अभिप्रेत धरल्या जातात की त्या मला मान्य नाहीत. एखाद्या ईश्वराला वा अज्ञात परमोच्च शक्तीला मानवी सगुण रूप देऊ पाहणे माझ्या मनःप्रवृत्तीविरुद्ध आहे; पुष्कळ लोक कशी सगुण उपासना करतात याचे मला आश्चर्यच वाटत आले आहे. बौद्धिक दृष्ट्या, मला वेदान्तातील अद्वैत-कल्पना मोलाची वाटते. अर्थात् याचीही मला जाणीव आहे की, या कल्पनांचे केवळ बौद्धिक दृष्ट्या ग्रहण करण्याने माणूस विशेष पल्ला गाठू शकत नाही. त्याबरोबरच हेही खरे की, वेदान्ताची किंवा तत्सम तत्वदर्शनांची अनन्ताकडे झेप घेण्याची जी धडपड आहे ती पाहून माझे मन भीतीने दडपून जाते. उलट पक्षी, निसर्गातील विविधता व विपुलता ही पाहून मी रोमांचित होतो आणि माझे मन एक प्रकारचा सुसंवाद व शांति अनुभवते" – ( पान ११–१३ ).

"माझ्या मनाला हे पटले आहे की, इतिहासाच्या चिरकालीन प्रवाहात आज वैज्ञानिक पद्धति व दृष्टि यांनी अभूतपूर्व क्रान्ति घडवून आणली आहे. विज्ञानाने दरवाजे व मार्ग असे खुले करून दाखविले आहेत की त्यातून पुढे मौलिक बदलांची दिशा दिसत आहे आणि जे आतापर्यंत अज्ञात समजले जात होते त्याच्या दाराशी आपण येऊन ठेपलो आहोत. निसर्ग हा आपणापेक्षा कोणी भिन्न, परका असे माणसाला आता वाटत नाही. मानवाचे भवितव्य हे निसर्गाच्या तालबद्ध शक्तिस्रोताचाच एक भाग बनू पहात आहे. पदार्थ-विज्ञानातील अलीकडील शोधांमुळे, निसर्गात एक मूलभूत अद्वैत किंवा एकता आहे असे प्रत्ययास येऊ लागले आहे. विज्ञानातील ह्या ताज्या संशोधनाच्या निष्कर्षांची अद्वैत वेदांतातील मूलभूत विचारांशी तुलना करणे उद्बोधक ठरावे. अद्वैतवेदांताच्या बुडाशी तरी हीच कल्पना आहे की विश्वात एकच वस्तु असून त्याचा आकार सारखा बदलत आहे; आणि शक्तींची एकूण बेरीज सारखी तीच समान असते. आधुनिक विज्ञानाप्रमाणे, वस्तुमात्राची अंतिम उपपत्ति त्या वस्तुमात्राच्या मूल स्वभावातच सापडते; विश्वात जे काही चालू आहे त्याचा अन्वयार्थ लावायला बाह्य वस्तूची बिलकूल जरूरी नाही, सर्व विश्वच स्वयंविकासी असून स्वयंविकसित होत आहे." ( पा. १६–१७ )

### भारतीय संस्कृतीचे मानवतावादी अधिष्ठान

आधुनिक पाश्चात्त्य वैज्ञानिक संशोधनाच्या युगात वैज्ञानिक दृष्टिकोन आज प्रामुख्याने पुढे आला आहे. पाश्चात्य जगात राष्ट्राराष्ट्रात संघर्ष, अविश्वास आणि अण्वस्त्रयुद्धाच्या भीषण छाया या पसरल्या असून, पाश्चात्त्य राष्ट्रे खरा वैज्ञानिक दृष्टिकोन व तज्जन्य शांतिमय आचार अजून आत्मसात् करू शकलेली नाहीत असे नेहरूंनी म्हटले आहे. प्राचीन भारतीय संस्कृतीचे ते अत्यंत डोळस भक्त होते. प्राचीन भारतीय संस्कृ-

तीचे संशोधन करून त्यांना त्या संस्कृतातील ज्या काही उज्ज्वल गुणांचे दर्शन घडले त्यावरून त्यांनी असेही विधान केले आहे की प्राचीन भारतीय संस्कृतींच्या मूलभूत विचारामागील अधिष्ठान आधुनिक वैज्ञानिक दृष्टीशी व तज्जन्य आध्यात्मिक सुसंवादाशी अधिक जुळणारे आहे. तो उतारा असा :

" विज्ञानाची पकड पाश्चात्त्य देशावर दिसून येते व तेथील प्रत्येकजण विज्ञानाचे कौतुक करतो हे खरे. परंतु पाश्चात्य जगाला अजून खरी वैज्ञानिक दृष्टि व वृत्ति लाधली नाही असे म्हटले पाहिजे. त्याच्यामध्ये सर्जनशील शांति किंवा सुसंवाद अजून आकारास यावयाचा आहे. आपणा भारतीयांना तो गाठायला अजून पुष्कळच अंतर चालावयाचे आहे हे स्पष्टच आहे. परंतु त्या दिशेकडे मार्गक्रमण करीत असताना आपणास मोठी विघ्ने कदाचित कमी येतील. कारण, अलीकडील काळ सोडून दिला तरी प्राचीन काळातील युगानुयुगींच्या भारतीयांच्या विचारामागील अधिष्ठान हे वैज्ञानिक दृष्टीशी व वृत्तीशी आणि आंतरराष्ट्रीयवादाशी जुळणारे आहे. सत्याचा निर्भय शोध, मानव येथून तेथून एक ही ऐक्यभावना, प्रत्येक भूतमात्रात दिव्यतेचा अंश आहे ही श्रद्धा आणि व्यक्ति व समाज यांचा परस्परसहकार्याने व स्वतंत्रतेच्या वातावरणात विकास घडून यावा हा विचार– या गोष्टी प्राचीन भारतीय विचारसंपदेचे अधिष्ठान होत." ( पान ४८९-४९० )

## भारताविषयीची अद्वैतभावना

नेहरूंच्या निधनानंतर लगेच, त्यांचे त्यानीच पूर्वी लिहून ठेवलेले मृत्युपत्र ( Will and Testament ) प्रसिद्ध झाले आहे. त्या मृत्युपत्रात त्यानी आपल्या रक्षाविसर्जनाविषयी ज्या सूचना केल्या आहेत व त्या अनुषंगाने त्यानी भारतभूमीविषयी, येथील निसर्गाविषयी, भारतवासियांविषयी, आणि भारतीय संस्कृतीविषयी ज्या नितांत गाढ आदर भावभावना व्यक्त केल्या आहेत त्या त्यांच्या विज्ञाननिष्ठ दृष्टिकोनाला व आध्यात्मिक वृत्तीला साजेश्याच आहेत. आपल्या देशाविषयी आत्मीयता प्रकट करणारे त्यांच्या मृत्युपत्रातील उतारे त्यांच्या उत्कट कविहृदयाची, त्यांच्या भारताविषयींच्या अद्वैतभावनेची इतकी जाज्वल्य साक्ष देणारे आहेत की, त्यांचा मराठी अनुवाद प्रस्तुत स्थळी देण्याचा मोह आवरत नाही :

" माझ्या मरणोत्तर, माझ्या शरीराची दहनक्रिया व्हावी. मला जर परदेशात मृत्यु आला तर माझ्या शरीराची दहनक्रिया तेथे करून माझ्या अस्थी व रक्षा अलाहाबादला पाठवाव्या. त्या रक्षेतील एक लहानशी मूठ गंगेत टाकावी आणि बाकीचा अधिकांश भाग मी खाली दर्शविलेल्या पद्धतीने विसर्जित करावा. माझ्या रक्षेपैकी काहीही शिल्लक वा राखून ठेवू नये . . . . . .

" गंगा ही भारताची अशी खास नदी असून तिला लोकांच्या हृदयात प्रेमाचे स्थान आहे. या गंगेभोवतीच भारताच्या पिढ्यानुपिढ्यांच्या स्मृती, आशा-निराशा, विजयगाथा, जयपराजय गुंफलेले आहेत. गंगा ही भारताच्या युगानुयुगे चालत आलेल्या संस्कृतीच व सभ्यतेचे प्रतीक बनली आहेः तशीच सारखी बदलणारी, सारखी सतत वाहणारी.– आणि असे असूनही गंगा तीच.

" गंगा मला आठवण करून देते माझ्या अत्यंत आवडत्या हिमालयाच्या हिमाच्छादित शिखरांची आणि तेथील खोल गर्द दऱ्याखोऱ्यांची आणि खालील लांबच लांब पसरलेल्या समृद्ध मैदानांची– जेथे माझ्या जीवनाची व कार्याची घडण झाली. गंगा ! सकाळच्या सूर्यप्रकाशात हसत खिदळत नाचत जाणारी; संध्याकाळच्या छाया दाट पसरल्या आहेत, अशा वेळी काळे, रागीट, उदास, गूढ रहस्यमय रूप धारण करणारी; हिवाळ्यात मंद, संथ छोटा सुंदर प्रवाह बनून राहणारी; तीच पावसाळ्यात घोंघावत गरजणारी नि अफाट सागराप्रमाणे विशालच विशाल आणि त्या सागराप्रमाणेच कधी रौद्र रूप घेऊन संहारक बनणारी–अशी गंगा मला भारताच्या भूतकालाची स्मृति आणि प्रतीकच बनून गेली आहे– वर्तमानकालातून द्रुत गतीने खळाळत, भविष्यकालाच्या महासागराकडे वहात जाणारी !

" मी स्वतः भूतकालीन परंपरा व रूढी टाकून दिल्या आहेत. आणि माझी अशी उत्कट इच्छा आहे की भारतभूमीनेही आपणाला बांधून जखडून टाकणाऱ्या, आपल्या भारतवासियांना छिन्नभिन्न करणाऱ्या, बहुसंख्यांना दडपून ठेवणाऱ्या, आणि शरीर व मन यांच्या अनिर्बंध विकासाच्या आड येणाऱ्या अशा सर्व बंधनांपासून मुक्त व्हावे. अशी माझी इच्छा असूनही, भूतकालापासून मी संपूर्णपणे विलग व्हावे असे मला वाटत नाही. कारण जो महान् प्राचीन










वारसा चालत आला आहे व आमचा झाला आहे त्याचा मला अभिमान वाटतो. आणि मला अशी जाणीव आहे की, मीही त्या अविच्छिन्न साखळीतील एक दुवा आहे– ती अविच्छिन्न साखळी की जिचे मूळ भारताच्या स्मृत्यतीत भूतकालातील इतिहासाच्या त्या पहिल्या उषःकालपर्यंत जाऊन भिडते. ही अविच्छिन्न परंपरेची साखळी तोडून टाकावी असे मला वाटत नाही. ती एक माझा बिनमोल ठेवा म्हणून मी त्याला जपत आलो आहे. त्यापासूनच मला स्फूर्ति मिळत आली आहे. माझ्या या मनीषेची साक्ष म्हणून आणि भारताच्या या सांस्कृतिक वारश्याला माझी शेवटची आदरांजलि म्हणून माझी अशी विनंति आहे की, माझी मूठभर रक्षा अलाहाबादला गंगेमध्ये विसर्जन करावी म्हणजे ती वहात जाऊन भारताच्या किनाऱ्यावर खळाळणाऱ्या महासागराला मिळेल.

" माझ्या रक्षेचा जो अधिकांश भाग राहील त्याचे विसर्जन निराळ्या रीतीने करावे. माझी अशी इच्छा आहे की विमानातून उंच आकाशात माझी राहिलेली रक्षा न्यावी आणि उंचावरून ती खाली पसरलेल्या शेतातून– जेथे भारतीय शेतकरी राबत असतात अशा शेतातून –विखरून पसरून टाकावी, म्हणजे माझी राख भारताच्या धरतीशी, तेथील धूलिकणांशी जाऊन मिसळेल आणि भारताचा एक बेमालूम भाग बनून त्याच्याशी एकजीव होऊन जाईल. "

आचार्य विनोबांनी एकदा असे म्हटले होते की, विज्ञान आणि अध्यात्म (Science and Spirituality ) यांचा समन्वय होणे आवश्यक व इष्ट आहे. जवाहरलाल नेहरू विनोबांच्या ह्या उद्गारांचा गौरवपूर्वक उल्लेख करीत असत. विज्ञान व अध्यात्म यांचा समन्वय आपल्या जीवनात व्हावा असे त्यांचे सुखस्वप्न असावे, असे त्यांच्या गौरवपूर्वक उल्लेखावरून वाटते. नेहरूंचे जीवन व वाङ्मय अवलोकीत असताना, त्यांनी आपल्या व्यक्तित्वात बाणविलेल्या या समन्वयाचे ओझरते दर्शन घडत असते यात शंका नाही.

अनुक्रमणिका

मानवेंद्रनाथ रॉय – अनु. इन्दुमती पारीख

# जवाहरलाल नेहरू - एक कोडे की शोकान्तिका ?

दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळात नेहरूंनी आपल्याबद्दलच्या जगाच्या आकांक्षा कल्पनातीत उंचावल्या होत्या. युद्धामुळे धूळधाण व दरिद्री झालेले जग आशियाच्या पुनरुज्जीवनामुळे सावरेल असे वाटत होते. अशा आशियाचा नेहरू हा एकमेव पुढारी मानला गेला होता. नेहरूंच्या अमेरिका भेटीच्या वेळी ते सर्वांनीच मान्य केले होते. पण त्यानंतर आंतरराष्ट्रीय राजकारणाची चक्रे झपाट्याने फिरू लागली. व लोकशाही जगाची नेहरूंनी निराशा केली. अगदी अलीकडे जपानशी करावयाच्या शांतता तहाच्या अँग्लो-अमेरिकन मसुद्याबद्दल नापसंती दर्शवून सॅन्फ्रान्सिस्को परिषदेला आपले शिष्टमंडळ पाठविण्याचेसुद्धा नाकारून त्यांनी ही निराशा जास्तच दाट केली. कम्युनिस्ट व कम्युनिस्टेतर राष्ट्रात चालू असलेल्या शीतयुद्धापासून भारताला बाजूला ठेवण्याची त्यांची चिंता सर्वांना समजत असली तरी जगातील उदारमतवादी मतप्रणालीच्या लोकांस ते धोरण संमत नाही. भारताने ज्या कारणाकरिता या जपानीशांततातहाच्या मसुद्यास विरोध केला ती कारणे न्याय्य आहेत असेही म्हणता येणार नाही. नेहरूंच्या धोरणाचा निःपक्षपाती विचार करणारा कोणीही त्यांना कम्युनिस्ट म्हणू शकणार नाही किंवा ते जाणूनबुजून भारताला लोकशाहीविरोधी भूमिकेवर नेतील असा आरोपही कोणी करू शकणार नाही. म्हणूनच उदारमतवादी जगाची साश्चर्य निराशा होत आहे. या निराशेतून वैफल्याची व द्वेषाची भावना निर्माण होणे कठीण नाही. व तसे झाल्यास मात्र भारताइतके कोणाचेही नुकसान होणार नाही.

आर्थिक विकासासाठी भारताला परदेशी मदतीची गरज आहे. व भांडवलाची मोठ्या प्रमाणावर मदत अमेरिकेकडूनच होऊ शकते. युरोपप्रमाणे भारतालाही सर्वथैव मदत करण्याची तयारी अमेरिकेने वेळोवेळी दर्शविली आहे. परंतु नेहरूंच्या परराष्ट्रीय धोरणामुळे पाहिजे तेवढी मदत मिळविणे भारतास शक्य नाही. या दृष्टीने त्यांचा अमेरिकेचा दौरा अयशस्वी झाला असे म्हणावे लागते. त्यातून प्रत्यक्षात काहीही निष्पन्न झाले नाही; व त्यांचे स्वतःखेरीज दुसऱ्या कोणाचेही समाधान झाले नाही. शीतयुद्धात भाग घेण्याचे नाकारल्यामुळे अमेरिकन मुत्सद्दी नाराज झाले तर भारतात भांडवल गुंतवल्यास त्यावर राजकीय बंधने येतील अशी शंका सतत घेतली गेल्यामुळे भांडवलदार नाखुष झाले आहेत. वास्तववादी भारतीय राजकारणी व उद्योगपती नेहरूंनी 'गड्डा' आणला नाही म्हणून नाराज झाले. या सर्व अपयशाचे मुख्य कारण म्हणजे अभिनयपटु नेहरूंना जगातील डाव्या गटाकडून टाळ्या घ्यावयाच्या होत्या व जयघोष करणाऱ्या घरच्या मध्यमवर्गाच्या राष्ट्रीय अस्मितेस खूष करून लोकप्रियता मिळवावयाची होती. पण यामुळे पक्षनिष्ठ कट्टर काँग्रेसवाल्यात व 'लोक नेता' ( People's tribune) नेहरूत संघर्ष सुरू झाला. या संघर्षातून काँग्रेसमध्ये आणीबाणी निर्माण होण्याची भीती निर्माण झाली असून नेहरूंच्या राजकीय जीवनातही आणीबाणी निर्माण होण्याची वेळ आली आहे.

## शोकांतिकेचा अभिनयपटु नट

याच काळात एका प्रसिद्ध दैनिकाने, टोपणनावाने, १९३८ साली नेहरूंनी स्वतःबद्दल लिहिलेला एक लेख प्रसिद्ध केला. या लेखाने नेहरू या कोड्यावर बराच प्रकाश टाकला असून व्यक्तिशः नेहरूंच्या व त्याबरोबर राष्ट्राच्या जीवनाचा शोकान्तिकेत शेवट होणार की काय अशी भीती वाटू लागली आहे. ते लिहितात:



अनुक्रमणिका






# जवाहरलाल नेहरू–एक कोडे की शोकान्तिका ?

'रंगसफेती न करता अभिनय करण्याची कला जवाहरलालने आत्मसात केली आहे. तो सार्वजनिक रंगमंचावर सहजगत्या व काहीशा बेफिकीरपणे उत्तम अभिनय करीत असतो. हे नाटच त्याला स्वतःला किंवा राष्ट्राला कोणीकडे नेत आहे? त्याला स्वतःला काय पाहिजे आहे? काय गाठायचे आहे? या मुखवटयामागे काय दडलेले आहे? कसली अभिलाषा आहे? की सत्ता मिळविण्याची इच्छा आहे? केव्हाही न शमणारी हाव आहे? जनसागराच्या उसळणाऱ्या लाटा हातात घेऊन आकाशाच्या पटलावर माझी मनीषा ताऱ्यांनी मी लिहीत आहे असे मनात पुटपुटताना सत्तेच्या लालसेने तर तो एका जनसमुदायाकडून दुसऱ्या जनसमुदायाकडे खेचला जात नाही ना? मोठी व चांगली कृत्ये करू शकण्याची शक्ती असलेली जवाहरलालसारखी माणसे लोकशाहीत सुद्धा विश्वासार्ह नसतात. ते स्वतःला मनःपूर्वक लोकशाहीवादी व समाजवादी म्हणवतात; परंतु प्रत्येक मानसशास्त्रज्ञास हे माहीत आहे की मन हे हृदयाचे गुलाम असते. व एखादी गोष्ट माणसास तीव्रतेने पाहिजे असल्यास त्याकरता तर्कशास्त्र लढविणे फारसे कठीण नसते. जवाहरलालच्या वर्तणुकीस थोडेसे निराळे वळण लागले तर तो हुकूमशहा सहज बनू शकेल. लोकशाहीची व समाजवादाची भाषा तो वापरीत राहील. त्याच्या घोषणाही करील. फसिझमची भाषा सर्वांच्या परिचयाची आहे. पण जवाहरलाल फसिस्ट बनू शकणार नाही. त्याला हुकूमशहा होण्यास सर्व गोष्टी अनुकूल आहेत. खूप मोठी लोकप्रियता, कणखर इच्छाशक्ती, अविश्रान्त श्रम करण्याची तयारी, ताठरता, संघटनाचातुर्य, कार्यक्षमता, कडकपणा, जनसमुदायाबद्दलचे प्रेम पण दुसऱ्याबद्दलची असहिष्णुता, दुबळयांचा तिरस्कार! त्यांची कामाचा झपाटयाने उरक पाडण्याची अनिर्बंध इच्छा लोकशाहीच्या सावकाशीत बसत नाही. केवळ चौकट शिल्लक ठेवण्यास त्यांची हरकत नाही पण वेळप्रसंगी आपल्या इच्छेप्रमाणे ते अशी चौकट वाकवल्याखेरीज रहाणार नाहीत. या क्रांतियुगात सिझरीझम दरवाज्यात नेहमीच उभा असतो. जवाहरलाल आपल्याला सिझर तर समजणार नाही ? अति स्तुतीने किंवा लाडाने त्यांना विघडवणे बरोबर नाही. त्यांना स्वतःबद्दल बरीच घमेंड आहे. त्याला आळा घालणे जरूर आहे. "

या लांबलचक उताऱ्याबद्दल दिलगिरी व्यक्त करण्याचे कारण नाही. तेरा वर्षांपूर्वी लिहिलेले हे स्वभावचित्र आजही खरे आहे. किंबहुना मध्यंतरीच्या काळात घडलेल्या अनेक ऐतिहासिक घटनांमुळे त्यातील बारकावे जास्त स्पष्ट झाले आहेत.' ' दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळातील नेहरू ही जगाची सर्वात मोठी निराशा ठरली " हे न्युयार्क टाइम्सचे विधान का खरे आहे, हे नेहरूंनी स्वतःच स्पष्ट केले आहे. मन हे हृदयाचे गुलाम असते हे विधान सर्वसाधारणपणे नेहमीच खरे असते असे नाही, नेहरूंच्या बाबतीत मात्र ते खरे होते. हळु हळु प्रगत होणाऱ्या लोकशाहीबद्दलच्या नेहरूंच्या उतावीळपणामुळेच कॉंग्रेसमध्ये आणीबाणी निर्माण होत आहे हे ही खरे आहे. ज्या पक्षाचे नेतृत्व आज ते करीत आहेत त्या पक्षाच्या कार्यकारिणीचा राजीनामा देताना ते म्हणतात, " मी काही फारसा चांगला राजकारणी नाही. दहा लोकांच्या बरोबर राहून काम करणे तर मला बिलकूल जमत नाही. पण पन्नास हजार किंवा लाख लोकांच्या मध्ये मात्र मी चांगले काम करू शकतो." तेरा वर्षांपूर्वी स्वगत बोललेले बोल नेहरू आज प्रगट बोलत आहेत. दुबळयांचे बद्दल त्यांना तिरस्कार आहे कारण ते स्वतःच दुबळे आहेत. आपण फार कणखर मनाचे आहोत असे दर्शविण्यात ते स्वतःचा दुबळेपणा झाकण्याचा प्रयत्न करीत असतात; जेव्हा तो झाकणे अशक्य असते तेव्हा 'मन हृदयाचे गुलाम असते' अशासारखी सर्वसाधारण विधाने ते करतात.

नेहरूंच्या स्वयंचित्रातून त्यांच्या व राष्ट्राच्या भवितव्याचे इतके अचूक दर्शन घडते की, ते त्यांनी स्वतःच लिहिले आहे यावर बरेच दिवस कोणाचाही विश्वास बसत नव्हता. त्यांच्या टीकाकारांपैकी कोणी तरी ते लिहिले असेल असाच सर्वांचा समज होता. तेरा वर्षांनंतर त्यांच्या स्वतःच्या नावानिशी हा लेख पुन्हा प्रसिद्ध होईपर्यंत कृपलानींनी तो लिहिला असेच म्हटले जात होते. कारण ज्या








वेळी तो प्रथम प्रसिद्ध झाला त्यावेळी नेहरू काँग्रेसचे अध्यक्ष होते तर कृपलानी सरचिटणीस होते.

## नेहरूंनी 'गुलामगिरीची सनद' मान्य केली ती का?

नेहरूंचे आत्मविश्लेषण जगातील दुसऱ्या कोणत्याही प्रसिद्ध पुरुषाच्या स्वतःबद्दलच्या कबुलीजबावापेक्षा जास्त निःपक्षपाती होते. त्यातून निघणारे निष्कर्ष तर भविष्यकाळावर घनदाट काळी छाया पसरवणारे होते. व म्हणूनच ते लिखाण नेहरूंनी स्वतः लिहिले असेल अशी शंकाही कोणास येण्याची शक्यता नव्हती. नेहरूंच्या आयुष्यात वारंवार येणाऱ्या आणीवाणीच्या एका प्रसंगातून त्यांना हा लेख लिहिण्याची स्फूर्ति मिळाली होती. काहीशा विकृत गांधीनिष्ठेमुळे, स्वतःच्या बौद्धिकनिष्ठेच्या विरुद्ध जाऊन त्यांनी आपल्या अनुयायांना रखडत ठेवले होते.

काँग्रेसने १९३७ साली भारतसरकारच्या १९३५ च्या कायद्यानुसार होणाऱ्या प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणुका लढविण्याचे ठरविले होते. कायदेमंडळात बहुमत मिळवून ही 'गुलामगिरीची सनद' नेस्तनाबूत करणे हा त्यात मुख्य उद्देश होता. 'गुलामगिरीची सनद' (Charter of Slavery) हा नेहरूंचा स्वतःचाच शब्दप्रयोग होता. निवडणुकीत सर्वत्र फार मोठ्या प्रमाणात बहुमत मिळाल्यामुळे मंत्रिमंडळे बनवावी की नाही याबद्दल काँग्रेसमध्ये वाद उत्पन्न झाला. गांधींसुद्धा सर्व वरिष्ठ नेते मंत्रिमंडळे बनवावी या मताचे होते. पण निवडणुका ज्या हेतूने लढविल्या त्याच्या हे मत विरुद्ध होते. नेहरू व त्यांचे अनेक अनुयायी यांनी सत्ता राबविण्यास कसून विरोध केला. हा विरोध इतका वाढत गेला की या प्रश्नाची चर्चा करण्याकरता एक खास कन्व्हेन्शन बोलावण्यात आली. विरोधकांची संख्या इतकी मोठी होती की, ते जिंकणार असा रंग दिसू लागला; व वरिष्ठ काँग्रेस नेत्यांनी गांधींच्या परवानगीने कार्यकारिणीचा राजीनामा देण्याचे नक्की केले आहे असेही बोलले जाऊ लागले.

त्यावेळी नेहरू काँग्रेसचे अध्यक्ष होते. कन्व्हेन्शन पूर्वी काँग्रेस वर्किंग कमिटीची बैठक दिल्लीत हरिजनकॉलनीच्या गांधींच्या निवासस्थानी भरली. नेहरूंनी लिहिलेल्या ठरावावर चर्चा झाली. अध्यक्षात व वर्किंग कमिटीच्या इतर सभासदात मतभेद आहे हे स्पष्ट झाले. वातावरण इतके तापले की नेहरू राजीनामा देण्यास तयार झाले. शेवटी, महात्म्याचे मध्यस्थीने मूळ ठरावास एक पुस्ती जोडून तो पसार करण्याचे ठरले. या पुस्तीने मूळ ठराव पूर्ण बाद केला. दुसरे दिवशी, राजीनामा देण्यास तयार झालेले नेहरू, वर्किंग कमिटीने पसार केलेल्या ठरावास पाठिंबा देण्यास उभे राहिले. 'गुलामगिरीच्या सनदेनुसार' मंत्रिमंडळे बनविली गेली. अनुयायी या द्रोहाबद्दल चिडले पण नेहरूंची लोकप्रियता तसुभरही कमी झाली नाही. हृदयातून निघालेल्या बोलांनी जनसमुदाय केव्हाही फिरवता येतो.

आपल्या राजकीय जीवनात नेहरू अनेक वेळा स्वतःच्या निष्ठेविरुद्ध स्वेच्छेने वागलेले दिसतात. बहुतेक वेळा हे वर्तन हृदयाच्या प्रभुत्वामुळे होते. अलीकडे मात्र ते सत्ताभिलाषाने होत असते असे वाटते.

## नेहरूंचे दुभंगलेले व्यक्तिमत्त्व

१९३१ सालच्या दुसऱ्या कायदेभंगाच्या चळवळीनंतर नेहरूंच्या डाव्या राजकारणाच्या प्रभावामुळे काँग्रेसमधील अनेक तरुणांनी प्रचलित नेतृत्वाविरुद्ध बंड पुकारले. कारण काही वरिष्ठ नेते गोलमेज परिषदेने देऊ केलेल्या सुधारणासुद्धा स्वीकारण्याच्या तयारीत आहेत असे दिसत होते. या वेळी नेहरूंनी प्रश्नांची गल्लत केली. त्यांनी राष्ट्रवादाची व अस्पष्ट अशा समाजवादाची सांगड घालण्याचा प्रयत्न केला. व काँग्रेसमधील सनातनी शक्ती व प्रगतशील शक्ती या एकमेकापासून भिन्न होऊ पहात असताना त्यात खोडा घातला. प्रगत शक्तींच्या बाल्यावस्थेचा फायदा घेऊन त्यांना समाजवादी स्वप्नाळू जगाची लालूच दाखवली तर सनातनी राष्ट्रवाद सामाजिक क्रांतीचे साधन होऊ शकेल असेही प्रतिपादले. पुरोगामी व लोकशाही शक्तींकडून प्रतिसाद न मिळणाऱ्या जुन्या सनातनी मूल्यांना नेहरूंनी आपल्या समाजवादी घोषणांनी पुरोगामित्वाचा





अनुक्रमणिका

मुलामा चढविला. आपल्या विशुद्ध नेत्याच्या लखलखित वक्तृत्वाने भारून जाऊन ही तरुण मंडळी पुन्हा गांधीवादाच्या छत्राखाली आली. व आपल्या ऐहिक जगात सत्ता काबीज करण्याच्या मामुली मूल्यास मूठमाती देऊन काँग्रेसचे काम हिरीरीने करण्यास सिद्ध झाली.

यावेळी, मध्ययुगात युरोपला सामाजिक क्रान्तीच्या उंबरठ्यावर आणून सोडणाऱ्या चळवळीसारख्या राष्ट्रविमोचनाच्या उच्च पातळीवरील चळवळीचे नेतृत्व करण्याची संधी नेहरूंनी गमावली. सर्जनशील नेतृत्व व खराखुरा राजकीय मोठेपणा मिळवणे गांधींशी असलेल्या व्यक्तिगत संबंधामुळे नेहरूंस अशक्य झाले. नेहरूंची यावेळची वागणूक दुर्बलतेची होती. आपल्या आयुष्यातील एका महत्वाच्या आणीबाणीच्या परिस्थितीत त्यांनी माघार घेतली. समाजवादी पक्ष स्थापन करण्यास त्यांनी आपल्या अनुयायांना परवानगी दिली. पण प्रतिगामी नेतृत्व असलेल्या काँग्रेस पक्षात रहाण्याचाच त्या गटास त्यांनी आदेश दिला.

शतकानुशतकांच्या सामाजिक अन्यायाचा प्रतिकार व आर्थिक असमानतेविरुद्ध लढा हाच राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीचा पाया होता. परंतु ही बंडखोरी आंधळी होती. अन्यायाला वाचा फुटण्यास वाव मिळाला असता तर सामाजिक क्रांतिकारक शक्तींनी 'जैसे थे' शक्तींना शह दिला असता. सामाजिक न्यायाकरिता आसुसलेल्या परंतु राजकीय दृष्टया मूक अशा चळवळीची नेहरूंच्या राष्ट्रवादाने दिशाभूल केली. छुप्या समाजवादी व डाव्या राष्ट्रवादी गटांच्या साम्राज्यवादविरोधी घोषणा कडव्या वंशवादाची राजकीय नांदी ठरली. मुख्यत्वेकरून ब्रिटिशांचे विरुद्ध असलेली ही चळवळ युरोपियन उदारमतवादाच्या परंपरेत तयार झालेल्या नेहरूंच्या बुद्धिवादी विचारसरणीच्या पण वरुद्ध गेली. या अन्तर्गत भावनिक लढयामुळे नेहरूंचे व्यक्तिमत्त्व दुभंगले गेले. बुद्धिपेक्षा भावनावर जास्त विश्वास ठेवणाऱ्या व्यक्तीचे दुसरे काय होणार? व म्हणूनच नेहरूंचे जीवन त्यांच्या चहात्यांनासुद्धा न उलगडणारे कोडे वाटते, ते परस्परविरोधी वर्तनाने भरलेले आहे.

## भगवानाचा शोध

नेहरूंचे समाजवादाचे आकर्षण, विसाव्या शतकातील एकाकी बुद्धिवाद्याचे आकर्षण होते. हे आकर्षण इतके जबरदस्त असते की या ध्येयास ते आपले जीवन अर्पण करू शकले असते. ते माणसाला वैचारिक व कार्यकारी क्षेत्रात उंचावू शकते. पण हे आकर्षण जर नुसतेच भावनिक असले तर मात्र ढासळणाऱ्या भांडवलशाही संस्कृतीच्या पार्श्वभूमीवर त्याचे पर्यवसान 'भगवाना' च्या शोधात होते. नेहरूंना आपला देव गांधीत सापडला, व त्यांनी आपले जीवन त्यांना अर्पण करून टाकले. त्यांच्या अज्ञानाधिष्ठित सनातनी मूल्यांचे जन्मभर समर्थन केले.

गेली तीस वर्षे भारतीय राजकारणावर दोन व्यक्तींचे प्रभुत्व होते. त्यांच्यात अप्रतिम सहकार्य होते. पण वरवर पहाणाराला मात्र त्याबद्दल आश्चर्य वाटत असे. सांस्कृतिक दृष्टया गांधी मध्ययुगाचे प्रतीक होते, त्या काळच्या नैतिक परंपरेचे ते उत्कृष्ट प्रतिनिधी होते. नेहरू मात्र आधुनिक माणूस, व त्यामुळे गांधींच्या दृष्टीकोनाशी सहमत होणे कठीणच. परंतु सार्वजनिक आयुष्यात गांधी कधीही चुकू शकणार नाहीत या श्रद्धेने ते वागले. कोठल्याही तऱ्हेचा संदेह न ठेवता त्यांनी गांधींचे नेतृत्व मानले. दोन्ही व्यक्तीत फारच थोडे साम्य होते पण नेहरूंचे राजकीय जीवन मात्र गांधींशी असलेल्या जिव्हाळ्याच्या संबंधावर अधिष्ठित होते.

नेहरू, आधुनिक, सुसंस्कृत व सुशिक्षित आहेत. त्यांची नैतिक निष्ठा अढळ आहे, वागणुकीत सफाईदारपणा आहे, व्यक्तिमत्त्वात गोडवा आहे. आधुनिक संस्कृत माणसात सापडणारे इतरही अनेक गुण त्यांचे ठिकाणी आहेत. या सर्वांचा विचार केला म्हणजे वरिष्ठ काँग्रेस नेत्यापेक्षाच नव्हे तर मंत्रीमंडळातील त्यांच्या सहकाऱ्यांपेक्षाही ते कितीतरी श्रेष्ठ आहेत हे लक्षात येते. त्यांच्याशी तुलना होईल असा माणूस आज भारतात नाही. परंतु हे सर्व गुण ' लोकनेते ' ( Tribune of the people) पदी पोचवण्यास असमर्थ होते. राजकीय सत्ता हाती येण्यास ते उपयुक्त नव्हते. गांधींशी असलेले गूढ व अध्यात्मिक नातेच यावेळी उपयोगी होते.

## नेहरूंनी राजकारणाकरिता आत्मा गमावला

रूढिप्रिय सनातनी सांस्कृतिक वातावरणात आधुनिक माणसाची किंमत कोणास कळत नाही. व भारतीय राष्ट्रवाद अशा तऱ्हेच्या सनातनी वातावरणातच वाढला. नेहरू हे गांधींचे अध्यात्मिक पुत्र (Spiritual Son) म्हणूनच भारतीय राष्ट्रवादाचे नेतृत्व करण्यास लायक ठरले. याचा अर्थ स्पष्ट आहे. लोकप्रियता विकत घेण्याकरता नेहरूंना आपले व्यक्तिमत्त्व दडपून टाकावे लागले. ते काही सोपे नव्हते. भोंदुगिरी व लबाडी कठोर नैतिकतेमुळे अशक्य होती. दोन विसंवादी मूल्यांची सांगड घालण्याचा तो प्रयत्न होता. सुशिक्षित व सुसंस्कृत आधुनिक माणसाच्या बुद्धिनिष्ठेचा व विश्लेषण न केलेल्या अंधश्रद्धेवर आधारलेल्या व्यक्तिनिष्ठेचा तो झगडा होता. या झगडयात नेहरूंनी स्वतःवर लादलेल्या दुसऱ्या व्यक्तिमत्त्वाचा विजय झाला. खऱ्या नेहरूपेक्षा दुसरा नेहरू बलवान ठरला. याचा परिणाम भयंकर झाला. नेहरूंनी स्वतःला फसवले. त्यांचे व्यक्तिमत्व खुरटले गेले. 'यशस्वी' राजकारणी पुरुषापुढे अत्यंत श्रेष्ठ व सर्जनशील व्यक्तिमत्त्व विलयास गेले.

दोन संस्कृतीतील झगडयात नेहरूंना आपले सर्जनशील व्यक्तिमत्त्व उकलता आले नाही. त्यांना शक्य होती तेवढी उंची ते गाठू शकले नाहीत. हीच त्यांच्या आयुष्याची खरी शोकान्तिका आहे. गांधीप्रणीत मध्ययुगीन संस्कृतीने नेहरूंच्या पोकळ आधुनिकतेचा बळी घेतला. जुन्या संस्कृतीशी झालेल्या झगडयात टिकाव न लागल्यामुळे नेहरूंच्या आधुनिकतेस पोकळ म्हणावे लागते. गांधी व नेहरू या दोघांचे इतरांना कोडयात पाडणारे परस्पर संबंध त्यांच्या विचारसरणीतील मूलभूत साम्याचे पर्यवसान होते. भारतीय राष्ट्रीय चळवळीचे नेतृत्व दोन भिन्न कालखंडातील संस्कृतींची प्रतीके असलेल्या दोन व्यक्तींनी केले याचे मुख्य कारण म्हणजे आधुनिक भारत दोन युगात जगत आहे. ऐतिहासिक विकासाच्या दृष्टीने तो अजूनही मध्ययुगाच्या पहाटकालात घोटाळत आहे तर कालक्रमणा प्रमाणे तो विसाव्या शतकात जगत आहे. नेहरूंची शरणागती या परस्परविरोधी वातावरणाने ठरवूनच टाकली होती.

गांधींच्या मृत्यूनंतर सत्तेचा अभिलाष टाळला असता तर नेहरूंना आपला आत्मा परत मिळवता आला असता. हा सत्ताभिलाष कित्येक वेळा जबाबदारीच्या तीव्र जाणिवेतूनही निर्माण होतो. नेहरूंच्या बाबतीत हीच गोष्ट खरी होती. पण त्यामुळे त्यांचे स्वतःचे फार नुकसान झाले. आपण सर्व घटनांचे केन्द्रस्थान आहोत ही स्वतःबद्दलची खोटी कल्पना, दुसरे लोक आपल्याला स्वतःच्या स्वार्थाकरता वापरीत आहेत या अपमानास्पद गोष्टीकडे त्यांना कानाडोळा करावयास लावते. परंतु उघडया डोळयांनी उडी घेतल्यानंतर स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाशी न जुळणाऱ्या परिस्थितीतून काढता पाय घेणे त्यांना अशक्य आहे. या परिस्थितीतून ते बाहेर पडतील असे पुष्कळ वेळा वाटते. गांधी जिवन्त असेपर्यंत ते शक्य नव्हते. आणि आता ते स्वतःला पूर्णपणे विसरून गेले आहेत असे वाटते. पंतप्रधानकीच्या खुर्चीमागील पक्षनेत्यांच्या हातातील ते बाहुले बनले आहेत. नेहरूंना हवाहवासा वाटणारा लोकप्रियतेचा लखलखित प्रकाश फक्त त्यानाच मिळू देण्यास काँग्रेसश्रेष्ठींना बिलकुल खंत वाटत नाही.

हा लोकनेता, मुत्सद्दी म्हणूनही यशस्वी झाला नाही. आपले नेतृत्व राष्ट्रात टिकविण्यासाठी एकसारखे जनतेसमोर येणे आवश्यक असते. त्याचप्रमाणे जगाच्या व्यासपीठावर येणे पण अपरिहार्य ठरते. आंतरराष्ट्रीय राजनीतीत ते अपयशी ठरले कारण ते फारच सच्च्या वृत्तीचे आहेत. नेहरूंची लोकप्रियता थोडीफार कमी होत असली तरी मने आकृष्ट करण्यात त्यांची जागा दुसरे कोणीही घेऊ शकणार नाही. एक खानदानी गृहस्थ समाजवादाचे प्रतिपादन करीत आहे या गोष्टीने केवळ शहरी मध्यमवर्ग भाळला नाही तर नव्यानेच मतदानाचा हक्क मिळालेल्या ग्रामीण जनतेस त्यांचे विलक्षण आकर्षण आहे. व हा मतदारच येत्या निवडणुकीचे भवितव्य ठरवणार आहे. खोटया समजुती व अज्ञानात जगणाऱ्या

जनतेला अंधश्रद्धेवर झुलत ठेवणे शक्य आहे. महात्मा शरीराने हजर नसला तरी आपल्या आध्यात्मिक पुत्राकरवी निवडणुका जिंकू शकेल.

सध्याची काँग्रेसमधील आणीबाणी नेहरूंच्या जीवनातीलही आणीबाणीच आहे. ते निधर्मी-पणाबद्दल बोलतात. पण राजकीय दृष्ट्या जागृत असलेल्या मध्यमवर्गाचे मनात हिंदूराष्ट्रीयत्वाचेच विकृत ध्येय ठसलेले आहे. निवडणुका जिंकण्याकरता काँग्रेसला या बलवान शक्तीशी समझोता करावा लागेल. काँग्रेस पक्षातील बहुसंख्य सभासदांची भावना या ध्येयापासून फारशी लांब नाही. पक्ष, नेहरूंच्या विचारसरणीपासून दूर जात आहे. त्याचा कल बदलणे नेहरूंना शक्य नाही. त्यामुळे पुन्हा पक्षनिष्ठा व तत्त्वनिष्ठा यातील निवड त्यांना करावी लागेल. पक्षनिष्ठा त्यांनी अगोदरच निवडली आहे असे दिसते. त्यांची शरणागती म्हणजे विजयच वाटेल. निवडणुका जवळ आल्यानंतर पक्षश्रेष्ठी नेहरूंना दुखवण्याचा धोका पत्करण्यास तयार होणार नाहीत. पण नेहरू पक्ष कधीही सोडणार नाहीत. व प्रतिगामी शक्तींशी समझोता केल्याखेरीज नेहरू काँग्रेसचे नामधारी का होईना पण पुढारी रहाणार नाहीत. त्यांचे काश्मीरविषयी धोरण व पाकिस्तानशी असलेले संबंध हिंदुराष्ट्रवादाला दिलेल्या सवलती आहेत. अधिकार-ग्रहणाच्या चार वर्षाच्या काळात काँग्रेसची लोक-प्रियता कमी होऊ लागली आहे. पण हा लोकप्रिय नेता काँग्रेसला बहुमत सहज मिळवून देईल.

नेहरूंचा स्वभाव जास्त कणखर असता तर ते राष्ट्राचे खरेखुरे नेते झाले असते. भारताच्या इतिहासास वेगळे वळण लागले असते. जागतिक राजकारणातील त्यांचे स्थान काल्पनिक न रहाता खरे झाले असते. त्यांच्या जीवनाची शोकान्तिका झाली नसती.

पक्षीय राजकारणाच्या धकाधकीत व सत्ता-भिलाषाच्या मोहात पडल्यामुळे एका सज्जन माणसाची गळचेपी झाली. ते उत्तम कवी किंवा नट म्हणून जास्त चमकले असते. आपल्या निवडी-बद्दल त्यांना खेद वाटतो किंवा नाही हे सांगणे कठीण आहे. आता परत फिरण्यास मात्र त्यांना उशीर झाला आहे. मोठेपणाच्या अभिलाषाच्या आहारी गेल्यामुळे जग एका चांगल्या सर्जनशील माणसास मुकले व त्यामुळे दरिद्री झाले असे म्हणावेसे वाटते.

---





अनुक्रमणिका








श्री. चंद्रप्रभा प्रभू

# पं. नेहरू आणि आर्थिक लोकशाही

१५ ऑगस्ट १९४७! पिढ्यान्‌पिढ्या चाललेला स्वातंत्र्यसंघर्ष थांबला, वर्षानुवर्षे हृदयाशी जतन केलेले ईप्सित साध्य झाले. सर्व त्या तृप्तीच्या कल्पनेने हरखून गेले होते. त्या आनंदात न्हाऊन निघत होते. पण फारच थोड्यांना ही कल्पना होती की राजकीय स्वातंत्र्य आले म्हणजे गंगेत घोडे न्हाले असे समजणे चुकीचे आहे. खरी सत्वपरीक्षा पुढेच आहे. राजकीयदृष्ट्या स्वतंत्र पण आर्थिक दृष्ट्या परतंत्र देशाला ते मिळालेले राजकीय स्वातंत्र्य गमावण्यास वेळ लागत नाही—आर्थिक दृष्ट्या आपण आपल्या पायावर उभे राहिल्याशिवाय राजकीय स्वातंत्र्याला योग्य ती बळकटी येणार नाही. हे सर्व सामान्य जनतेच्या आकलनशक्तीच्या पलीकडचे होते, त्यांना या गोष्टीची जाणीवही नव्हती, त्याच्यालेखी आता करावयाचे असे काही शिल्लक उरलेलेच नव्हते. आणि या अवस्थेत ही जनता राहिल्यास कृतिशून्यतेचे ग्रहण लागण्यास, या धुंदीचे ग्लानीत रूपांतर होण्यास वेळ लागला नसता. त्यांना हे सर्व समजावून सांगावयास हवे होते, पटवून द्यावयास हवे होते.

आणि या वेळेस 'नवभारताचे भाग्यविधाते' नेहरू पुढे सरसावले. किती सार्थ आणि समर्पक शब्द आहेत हे, 'नवभारताचे भाग्यविधाते!' अगदी खणखणीत शब्दात पहिली पंचवार्षिक योजना लोकसभेला सादर करताना सबंध देशाला त्यांनी ही जाणीव करून दिली.

"आपल्या प्रवासमार्गावरील एक टप्पा आपण गाठला आहे. एक कर्तव्य बजावले आहे.—तेसुद्धा अतिशय चोख रीतीने असे मी म्हणेन, पण याचवेळेस मला अत्यंत प्रकर्षाने असे जाणवते आहे की याहून अवघड कार्य आपल्यापुढे आहे. या पुढच्या प्रवासास निघावयाचे आहे आणि तेसुद्धा ताबडतोब. पुढच्या मार्गावर जागोजाग विश्रांतिस्थानेही नाहीत."

अनेक वर्षांच्या पारतंत्र्याच्या निद्रेतून जाग्या झालेल्या भारताला परत कृतकृत्यतेची गुंगी चढून कृतिशून्यतेची बाधा होऊ नये म्हणून स्पष्ट शब्दात जणू काही धोक्याची सूचना नेहरू देत होते, की काम संपलेले नाही उलट बिकट चढणीला आता कुठे सुरवात होत आहे. हा अवघड कडा विश्रांति न घेता आपल्याला चढून जावयाचा आहे.

आणि यापुढेही जाऊन याचवेळेस त्यांनी अतिशय महत्त्वाचे आर्थिक लोकशाहीचे तत्त्व देशापुढे मांडले. नेहरू म्हणतात, "जेव्हा आपण राजकीय लोकशाही हा शब्द वापरतो तेव्हा आपण हे लक्षात घेतले पाहिजे की १९ व्या शतकात या शब्दप्रयोगाला जे एक आगळे महत्त्व होते ते आता उरलेले नाही— आता जर राजकीय लोकशाही खऱ्या अर्थाने म्हणावयाची असेल तर या राजकीय लोकशाहीने आर्थिक लोकशाही निर्मिली पाहिजे. जर आर्थिक विषमता कायम असेल तर सबंध जगातील राजकीय लोकशाही किंवा प्रौढ मतदानाचा अधिकार खरीखुरी लोकशाही स्थापू शकणार नाही. म्हणूनच वेगवेगळ्या स्तरातील सर्व प्रकारचे भेदभाव नष्ट केले पाहिजेत अधिकाधिक समानता निर्माण केली पाहिजे, समाजात अधिक एकोपा आला पाहिजे आणि म्हणूनच आर्थिक लोकशाही संस्थापिण्यासाठी धडपडणे हेच आपले ध्येय."

## आर्थिक लोकशाहीकरिता आर्थिक नियोजन

नुसते एवढ्यावरच नेहरू थांबले नव्हते, तसे घडणेच शक्य नव्हते कारण ते काही निव्वळ वाचावीर नव्हते तर ही आर्थिक लोकशाही संस्थापिण्यासाठी आर्थिक नियोजनाशिवाय तरणोपाय नाही हे ओळखूनच की काय यापूर्वीच नियोजनमंडळाची स्थापना नेहरूंच्या अध्यक्षत्वाखाली करण्यात आली होती. आणि तेव्हापासून मृत्युकालापर्यंत

नियोजनमंडळाच्या सर्व गोष्टीत त्यांनी जातीने लक्ष पुरविले. सर्व गोष्टीत बारकाईने भाग घेऊन ते अंतिम ध्येयाच्या दिशेने मार्ग दाखवीत राहिले. अगदी सुरवातीच्या नियोजनमंडळाच्या बैठकी-पासून त्यांच्या मृत्यूपूर्वी सुमारे दोन पंधरवडे आधी १९६४ च्या मे १० तारखेला झालेल्या बैठकीला-सुद्धा नेहरू हजर होते. देशाला आर्थिक नियो-जनाच्या साधनाच्या साहाय्याने आर्थिक विकासाचा मार्ग दाखविला, हीच नेहरूंची आर्थिक क्षेत्रातील अत्यंत महनीय कामगिरी म्हटली पाहिजे. कारण हे काही सोपे काम नव्हते आणि विरोध काही कमी झाला नव्हता. देशातल्या देशात अनेक गांधीवादी या नियोजनाच्या विरुद्ध होते; कारण अशा प्रकारचे नियोजन त्याच्या स्वयंपूर्ण खेडी निर्माण करून ग्रामराज्ये स्थापण्याच्या कल्पनेत बसत नव्हते. काही पाश्चात्य देशसुद्धा नियोजनाचे कट्टर विरोधक होते. पण त्याच्या आर्थिक मदतीखेरीज आपल्याला विकास साधणे शक्य नव्हते. आणि म्हणूनच पुन्हापुन्हा असे म्हणावेसे वाटते की नियोजनमंडळाची स्थापना या सगळ्या प्रकारच्या विरोधांना न जुमानता, न वाकता करून दाखविली ही गोष्ट नेहरूंचा मोठेपणा व दूरदृष्टी दर्शवीत नाही काय ?

## नियोजनमंडळाची स्थापना

स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच नव्हे तर त्यापूर्वीच नेहरूंनी या दृष्टीने पावले टाकावयास सुरवात केली होती. २ सप्टेंबर १९४६ ला हंगामी मंत्रि-मंडळाची स्थापना झाल्याबरोबर नंतरच्या काही आठवड्यात नेहरूंनी जी एक फार मोठी महत्वाची गोष्ट केली असेल तर ती म्हणजे एका ॲडव्हायझरी प्लॅनिंग बोर्डाची स्थापना " फाळणीनंतरच्या राजकीय अशांततेच्या काळात आणि नंतर काश्मीर प्रकरणामुळे निर्माण झालेल्या बिकट परिस्थिती-मुळे नियोजनाच्या दृष्टीने पुढची पावले टाकण्यास त्यांना तेवढीशी स्वस्थता लाभली नाही. पण १९४९ मध्ये परत त्यांनी या दृष्टीने विचार करावयास सुरवात केली. परदेशी तज्ञांचीही या कामी मदत घेण्यात आली. अनेक संबंधित बाबींची चर्चा करण्यात येऊन शेवटी जानेवारी १९५० मध्ये नियोजनमंडळाची स्थापना करण्यात आली. यावरून असे दिसून येते की नियोजना-विषयीचे विचार नेहरूंच्या मनात स्वातंत्र्यापूर्वीपासून घोळत होतेच. योग्य ती संधी प्राप्त होताच त्यांनी या विचारांना मूर्त स्वरूप देण्यास झपाट्याने सुरवात केली. आर्थिक नियोजनाचा अवलंब केल्यामुळे वर दिल्याप्रमाणे देशांतर्गत आणि देशा-बाहेरही कडक विरोधाला नेहरूंना तोंड द्यावे लागले. कडक टीका सहन करावी लागली. कोणी त्यांना जहाल मार्क्सवाद्यांच्या रांगेत नेऊन बसविले, कोणी उजव्या गटातील समाजवादी म्हटले, कोणी डाव्या गटाचे सूत्रधार ठरविले या सर्वांचा नक्की निष्कर्ष काढताना मात्र गोंधळ उडालेला दिसतो. कारण नेहरू नेहरूच राहिले. त्यांची मते त्यांच्या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाची खूण पटवीत राहिली. कुठल्याही एका गटाचा शिक्का मारून या विरोध-कांना मोकळे होता आले नाही. नेहरू खरोखरीच कुठल्या गटाचे होते की कुठल्याही तथाकथित एका गटाचे नव्हते याचाच विरोधकांना संभ्रम पडलेला आढळतो. एकूण अर्थव्यवस्थेचा विचार करून आपल्या देशाला त्यांच्या दृष्टीने योग्य अशी वेगळीच योजना त्यांनी दिली. त्यांनी वेळोवेळी केलेल्या भाषणातून आणि त्यांच्या लिखाणातून त्यांच्या या मतप्रणालीचे खरे दर्शन घडते. त्याना नुसतेच समाजवादी किंवा मार्क्सवादी असा शिक्का मारून मोकळे होणे हे केव्हाही चुकीचे ठरेल. त्यापेक्षा त्यानी प्रत्येकातून देशाच्या दृष्टीने योग्य तेच निवडून त्यांचा कसा सुंदर समन्वय घातला आहे हे पाहिले म्हणजे मन आश्चर्यचकित झाल्याशिवाय रहात नाही.

## नेहरूंचा लोकशाही समाजवाद

परिणामकारी आर्थिक विकासासाठी समाजवादी अर्थव्यवस्थेशिवाय गत्यंतर नाही हे नेहरूंनी आपल्या लिखाणातून व भाषणातून वेळोवेळी मान्य केलेलेच आहे. पण याच वेळेला हेही मान्य केले पाहिजे की त्यांच्या समाजवादी अर्थव्यवस्थेची कल्पना रूढ अर्थाने समाजवाद ज्याला आपण म्हणतो त्याबरहुकूम नाही असे जे म्हणतात तेही खरे आहे. त्यांच्या समाजवादाची कल्पना नैतिक



अनुक्रमणिका

आणि सामाजिक मूल्यांवर आधारलेली आहे; मार्क्सच्या पुस्तकातील साम्यवादावर आधारलेली नाही. याचा अर्थ असा नव्हे की मार्क्सच्या तत्वांबद्दल त्यांना आदर नव्हता. उलट त्यांना मार्क्सच्या तत्वप्रणालीबद्दल कमालीचा आदर होता. पण ती आहे तशीच जशीच्या तशीच भारतात लागू करावयास त्यांचे मन तयार नव्हते. तात्पर्य, वेगवेगळ्या मतांचा अभ्यास करून त्यातून आपल्याला हवे तेवढेच आणि तेच घ्यायच्या त्यांच्या नीरक्षीर-विवेकबुद्धीमुळे त्यांना कुठल्याही एका गटाचे म्हणून शिक्का मारणे चुकीचे ठरते.

त्यांची स्वतःची अशी याबाबतीतील विशिष्ट मते कशी ठरत गेली हेसुद्धा अभ्यासण्याजोगे आहे. तसे पाहू गेल्यास पंडितजींच्या आत्मचरित्रावरून असे आढळते की त्यांच्या विद्यार्थीदशेत समाजवादी विचारसरणीचा त्यांच्यावर विशेष असा पगडा नव्हता. साधारण १९२६-२७ मधील त्यांच्या युरोपच्या सफरीमध्ये त्यांना प्रथम साम्यवादी विचारसरणीने आकृष्ट केलेले आढळते. त्यांच्या आत्मचरित्रातच एके ठिकाणी त्यांनी म्हटले आहे की " समाजवादी चळवळीच्या बाबतीत मी काही भारतात अग्रभागी नव्हतो. खरे म्हणजे याबाबतीत मी जरा मागेच होतो. आणि माझी या बाबतीत प्रगती जरा जिकीरीनेच नि पायरी पायरीनेच झाली."

नेहरूंना समाजवादी विचारसरणीकडे आकृष्ट करण्यास मात्र त्यांचा बहुजनसंपर्क विशेषतः आपल्या शेतकऱ्यांशी येणारा त्यांचा संबंध कारणीभूत झालेला असावा. त्यांनीच म्हटले आहे की " १९२० मध्ये मी आपल्या देशातील शेतावरील म्हणा किंवा कारखान्यातील म्हणा कामकऱ्यांच्या जीवनाबद्दल पूर्णपणे अनभिज्ञ होतो. आणि याच सुमारास एका नवीन गोष्टीने माझ्या आयुष्यात प्रवेश केला. माझी स्वतःची कुठलीही इच्छा नसताना माझा शेतकऱ्यांशी संबंध येऊ लागला. औधमधले गांजलेले शेतकरी कर्मकथा मला सांगत येऊ लागले. "

एकदा या परिस्थितीची जाणीव झाल्यावर मात्र नेहरू स्वस्थ बसले नाहीत. जमीनदारी नष्ट करणे हा त्यावर एकच उपाय हे त्यांनी मनोमनी हेरून ठेवले. ती नष्ट केल्याशिवाय, व त्यावर आधारलेली सामाजिक नि आर्थिक रचना बदलल्याशिवाय आर्थिक विकासाचे स्वप्न मूर्त होणे शक्य नाही, हे त्यांनी तेव्हाच ओळखले. व स्वातंत्र्यप्राप्तीनंतर त्यांनी त्या दृष्टीने योग्य ते प्रयत्न सुरू केले. जमीनदारी नष्ट करविली. नेहरूंचा समाजवाद हा असा प्रत्यक्ष अनुभवावर आधारलेला होता त्यांना पटलेला, त्यांनी निरखून, पारखून, परिस्थितीच्या निकषावर कस लावून घेतलेला, मार्क्सच्या किंवा दुसऱ्या कुणाच्या पुस्तकात दिलेला, म्हणून मान्य केलेला तो नव्हता. पुढील नेहरूंच्या विधानावरूनसुद्धा या गोष्टीची प्रचीती येईल. एके ठिकाणी त्यांनी म्हटले आहे की,"भारतातले साम्यवादी आणि समाजवादी मुख्यतः औद्योगिक कामगारांच्या प्रश्नांशी निगडीत असलेल्या लिखाणावरच विसंबून राहातात. भारतासारख्या शेतकीप्रधान देशात नुसत्या औद्योगिक कामकऱ्यांच्या प्रश्नांवर भर देऊन प्रश्न पुरता सुटणार नाही. राष्ट्रीयत्वाची भावना आणि ग्रामीण अर्थव्यवस्था या आपल्याकडील दोन अत्यंत महत्वाच्या गोष्टी आहेत, आणि युरोपियन समाजवाद या गोष्टीकडे क्वचितच लक्ष पुरवितो." यावरून असे दिसून येते की मी मी म्हणवणाऱ्या तथाकथित समाजवाद्यांनीसुद्धा जिकडे दुर्लक्ष केले त्या बाबी काहीशी उशीरा सुरवात करून का होईना नेहरूंनी किती विचारपूर्वक अभ्यासल्या आहेत.

त्यांच्या या विचारांशी त्यांचे सहकारी प्रत्येक वेळेस सहमत होतेच असे नाही. पण एकदा अशा प्रकारे मत तयार झाल्यावर मात्र नेहरू त्यापासून तसूभर ढळलेले दिसत नाहीत. बऱ्याच वेळेला तर याबाबतीत नेहरू ज्यांना अतिशय मानत त्या गांधीजींशी नेहरूंचे एकमत नसे. एके ठिकाणी तर नेहरूंनी स्पष्ट म्हटले आहे की, " काही वेळेस गांधीजी स्वतःला 'सोशॅलिस्ट' म्हणवितात. पण तो शब्दप्रयोग ते अशा काही वेगळ्याच अर्थाने वापरतात. रूढ अर्थाने त्याचा समाजाच्या आर्थिक रचनेशी संबंध येतो; गांधींमध्ये त्याचा काहीच मागमूस उरत नाही. गांधीजी कुठल्याही प्रकारच्या

समाजवादाकडे–विशेषतः मार्क्सवादी –संशयित दृष्टीने पहात. त्यामुळे नेहरूंची विचारसरणीसुद्धा त्याना पटणे शक्य नव्हते. गांधीजींना दारिद्रय जरी पहावत नसले तरी आर्थिक विकास साधून रहाणी-मान वाढविण्याच्या कल्पनेशी ते तितकेसे सहमत नव्हते. त्याऐवजी ते ग्रामीण उद्योगधंदे, स्वयंपूर्ण खेडी वगैरे गोष्टींवरच जास्त भर देत. मानव-प्राण्यांच्या नैतिक चांगुलपणावर विसंबून रहाण्याच्या त्यांच्या तत्त्वज्ञानाचाच तो एक आविष्कार म्हणावा लागेल. याउलट नेहरू मात्र हा प्रश्न केवळ नैतिक मूल्यांवर आधारलेला आहे हे मानावयास तयार नव्हते. 'जगाला आर्थिक कटकटीतून, दारिद्र्याच्या दुःखातून सुटावयाचे आहे, नुसतेच भांडवलशाही, समाजवादी किंवा साम्यवादी विचारसरणीतील चुका शोधून काढून सुवर्णमध्याची आशा करीत बसल्याने हा प्रश्न सुटणार नाही.' हे नेहरूंचे मत होते.

नेहरूंच्या समाजवादावरील विचारांची परि-पूर्णता नि सखोलता त्यांच्या आत्मचरित्रातील खाली दिलेल्या उताऱ्यावरून दिसून येईल : " हे सत्य आहे की समाजवादाने आपल्यापुढे मांडलेले मोठमोठे बदल नुसते काही कायदे करून तावडतोब घडवून आणता येणार नाहीत, पण काही मूलभूत कायदे पाया उभारण्यासाठी हवेच आहेत, मुख्य अडथळे नष्ट केलेच पाहिजेत. मुख्य ध्येय म्हणजे सांप्रतचे दारिद्रय नष्ट करून भावीकालात सुबत्ता संस्थापित करावयाचे आहे."

## रशियाच्या समाजवादापेक्षा निराळा समाजवाद

याचबरोबर नेहरूंच्या आर्थिक मतप्रणालीतील दुसरी एक प्रकर्षाने जाणवणारी गोष्ट म्हणजे त्यांची लोकशाही तत्वांवरील निष्ठा. आर्थिक विकास साधावयाचा आहे, आर्थिक नियोजन हवे आहे, समाजवादी अर्थव्यवस्थेची स्थापना करा-वयाची आहे, पण ते सर्व लोकशाहीच्या चौकटीत बसत असेल तर ! नाहीतर मग आर्थिक विकासही नको आणि ते नियोजनही नको. त्यांची अशी काहीशी स्पष्ट विचारसरणी या सर्वामागे दिसून येते. त्यांच्या आत्मचरित्रापासूनच सुरवात करा-वयाची म्हटले तर एके ठिकाणी त्यांनी म्हटले आहे की रशियात घडून आलेल्या फार मोठ्या बदलांनी मला साम्यवादाकडे आकृष्ट केले पण कम्युनिस्टांच्या हुकूमशाही आणि आक्रमक मार्गांचा मला तिटकारा आहे आणि त्यांच्याशी सहमत न होणाऱ्यांचा धिक्कार करण्याच्या त्यांच्या संव-यीही मला पसंत नाहीत.

पहिली पंचवार्षिक योजना सादर करण्याच्या वेळेस त्यांनी हे जास्त स्पष्ट केले. 'रशियाचे आर्थिक नियोजन हे उद्दिष्टांच्या दृष्टीने नि वापरलेल्या पद्धतींच्या दृष्टीने आपल्या नियोजनापेक्षा फार वेगळे होते. विशेषतः दुसऱ्या बाबतीत फारच फरक होता. आपण हेतुपूर्वक लोकशाहीचा अंगिकार केला आहे. नि म्हणूनच आपले कुठलेही धोरण लोकशाहीच्या चौकटीत बसेल असेच असले पाहिजे. आपल्या राज्यघटनेशी विसंवादी असे किंवा लोक-शाहीच्या रचनेत न बसणारे कुठलेही कार्य करण्याचा नियोजन मंडळाला अजिबात हक्क नाही.' किती स्पष्ट शब्दात नेहरूंनी नियोजनाची लोकशाही राष्ट्रातील मर्यादा दिली आहे.

या मर्यादांमुळे नियोजनाच्या यशस्वितेला बाधा येणार नाही याबद्दलही नेहरूंनी खात्री त्याचवेळी दिली आहे. ते म्हणतात 'या मर्यादांमुळे मार्ग थोडासा अधिक बिकट होईल, वापरावयाची पद्धत थोडीशी अधिक गुंतागुंतीची होईल पण योग्य प्रकारे आखणी केल्यास आपले ईप्सित लोकशाही मार्गाने साध्य करणे सहज शक्य आहे. '. आणि त्यामुळेच नियोजनमंडळाच्या सुरवातीपासून नियो-जनमंडळाचे कार्य स्पष्टपणे आपल्या राज्य-घटनेतील मूलभूत हक्कांशी निगडित केलेले दिसून येते व तसे उघडपणे नमूदही केलेले आहे. विशेषतः आर्थिक, सामाजिक नि राजकीय समानता निर्माण करून नि टिकवून लोकांचे कल्याण साध्य करण्याचे व्रत नियोजनमंडळाने पण सुरवातीपासूनच अंगिकारले आहे. या गोष्टी नजरेसमोर ठेवूनच नियोजन-मंडळाने आर्थिक विकास घडवून आणावयाचा आहे, लोकांचे रहाणीमान वाढवावयाचे आहे, उत्पादन








वाढवावयाचे आहे. यावरून एक गोष्ट स्पष्ट दिसून येते की सुरवातीपासूनच नेहरूंच्या नेतृत्वाखाली नियोजनमंडळाने जे कार्य सुरू केले ते लोकशाही नि समाजवादाच्या मूल्यांचा पूर्ण अंगिकार करूनच. किंबहुना नियोजनाची बैठकच लोकशाही तत्त्वांच्या पायावर उभारलेली आढळते. अर्थात नंतर हे सुरवातीपेक्षा जास्त प्रकर्षाने जाणवू लागले ही गोष्ट वेगळी. प्रत्येक वेळेस देशवासियांना मात्र एक धोक्याची सूचना द्यावयास नेहरू विसरले नाहीत. 'आपण भारताचा विचार करतो आहोत. दुसऱ्या कुठल्याही देशाचा नव्हे म्हणून आपण दुसरीकडे आढळणाऱ्या गोष्टी तशाच्या तशा इथे निर्माण करण्याचा प्रयत्न करू नये. आपल्या भावी कालाकरिता केलेली योजना आपल्या देशातील परिस्थितीशी संबंधित, येथील विविध गोष्टींशी निगडित असावी'.

आणि म्हणूनच पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या वेळी त्यांनी असेही म्हटले आहे की 'आपण ईप्सितसिद्धीसाठी झगडयाच्या मार्गाचा किंवा बळ वापरण्याचा विचारही करता कामा नये. आजपर्यंत शांततामय मार्गाने आपण अनेक गोष्टी मिळविल्या आहेत, आणि त्यामुळे एकाएकी तो मार्ग सोडून जोरजुलमाच्या मार्गाचा अंगिकार करण्याचे आपल्याला काहीएक कारण नाही. शिवाय आपण त्या मार्गाचा अवलंब का करू नये याला दुसरे एक कारण आहे. ते म्हणजे जर आपण आपली उद्दिष्टे मग ती कितीही श्रेष्ठ का असेनात धाक दपटशाच्या मार्गाने साधण्याचा प्रयत्न केल्यास आपल्याला उलट जास्त विलंब लागेल याची मला खात्री आहे. भारत नुसताच मोठा देश नाही तर विविधतापूर्ण देश आहे. जर एकाने शस्त्र उगारले तर त्याला दुसरा शस्त्रानेच उत्तर देणार हेही निःसंशय. आणि या झटापटीत देशाची मर्यादित शक्ती व्यर्थ ऱ्हास पावेल.'

पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या वेळेसच नेहरूंनी कल्पना दिली की योजना म्हणजे नुसते कारखाने उभारणे आणि उत्पादन वाढविणे नव्हे. त्यांची जरूर आहेच. पण त्याहून जास्त महत्वाचे जर काही असेल तर ते म्हणजे हळू हळू एकात्मक समाजरचना करणे.

पण त्यावेळस मात्र ती समाजरचना नक्की कुठल्या प्रकारची असणार याबद्दल विशेष कल्पना दिलेली नव्हती. पण दुसऱ्या पंचवार्षिक योजनेवरील सुरवात करताना ते जास्त स्पष्टपणे दिले आहे. 'सर्वसाधारणपणे जेव्हा आपण आपले उद्दिष्ट समाजवादी समाजरचनेचे आहे असे म्हणतो, तेव्हा आपल्याला काय बरे म्हणावयाचे असते? असा समाज की ज्यात सामाजिक एकता आहे, जो वर्गातीत आहे, सर्वांना समान संधी देणारा आहे, आणि प्रत्येकाला चांगल्या प्रकारे आयुष्य कंठणे शक्य करणारा आहे हे तर नक्कीच. महत्वाची गोष्ट म्हणजे संपत्ती आणि उत्पादन तर असावयास हवेच......

## राष्ट्रीयीकरण व उत्पादन यांचे समीकरणाबद्दल नेहरू साशंक

आपल्याला हे विसरून चालणार नाही की प्रगतिशील समाजाचे मुख्य कार्य आहे संपदा वाढविणे. त्याशिवाय विकास शक्यच नाही आणि मग विभागणी करावयास काही राहाणारच नाही. आपण राष्ट्रीयीकरणाबद्दल बोलतो ते अशा थाटात की सर्व दुःखे दूर करणारी ती जादूची कांडीच आहे. शेवटी सर्व प्रमुख साधने जरी राष्ट्रीय मालकीची होणार असली तरी मला हे कळत नाही की आज असे काहीतरी करून पुढच्या प्रगतीचा खेळखंडोबा कशाला करावयाचा? वाढत्या उत्पादनाला का खीळ घालावयाची? आणि तेसुद्धा फक्त कुठल्यातरी मतप्रणालीप्रमाणे वागण्याकरता?'

यावरूनही हेच दिसून येते की समाजवादाच्या बाबतीत नेहरू एका ठराविक पुस्तकी विचारसरणीला कधीच चिकटून बसावयास तयार नव्हते. देशाच्या आर्थिक, सामाजिक, राजकीय परिस्थितीचा विचार करून, ती पार्श्वभूमी लक्षात घेऊन आणि भविष्यकालीन उद्दिष्टे नजरेसमोर ठेवून या सर्वांना पोषक असा समाजवादच त्यांना मान्य होता. केवळ समाजवाद राष्ट्रीयीकरण मानतो म्हणून सुरवातीपासूनच राष्ट्रीयीकरणावर भर देणे आपल्या देशाला मानवणार नाही. हे ओळखून त्यांनी तसे स्पष्ट म्हटलेले वर दिलेलेच आहे.








पण त्याचबरोबर, १९५८ मध्ये त्यांनी आपली समाजवादाची कल्पनाही स्पष्ट केली. नेहरू म्हणतात, "आपल्याला आर्थिक विकेन्द्रीकरण करावयाचे आहे. लोखंड, पोलाद वगैरे मोठ्या उद्योगधंद्यांच्या बाबतीत ते शक्य नसेल, पण शक्य तितके लहान प्रमाणावर उद्योगधंदे सुरू करून सरकारी देखरेखीखाली ते सहकारी तत्वांवर चालविता येतील..... प्रत्येक माणसाला स्वतःच्या विकासासाठी समान संधी असावी. हीच माझी समाजवादाची कल्पना आहे."

लोकशाही तत्वांवरील निष्ठा नि त्या तत्वांच्या पायावर उभारलेली समाजवादी समाजरचना या दोन गोष्टी नेहरूंच्या कुठल्याही आर्थिक धोरणाच्या बाबतीत प्रकर्षाने कशा जाणवतात हे आपण आतापर्यंत पाहिलेच. पण नेहरूंनी हे भारतीयांच्या मनावर ठसवीत असतानाच इतर अनेक आवश्यक गोष्टींकडे दुर्लक्ष केलेले नाही.

## औद्योगीकरणाची बाब

आर्थिक विकासासाठी औद्योगीकरण हवेच. हे अगदी सुरवातीपासून नेहरू सांगत आले. पण त्यातसुद्धा अगदी बारीक सारीक मुद्यांकडे लक्ष पुरविण्यास ते विसरलेले नाहीत, औद्योगीकरण म्हणजे केवळ मोठमोठे उद्योगधंदे प्रस्थापित करणे नव्हे तर फार मोठ्या प्रमाणावर आपल्याला ग्रामीण आणि कुटीरोद्योगांचे पुनरुज्जीवन करावयाचे आहे, हे सांगावयास नेहरू विसरले नाहीत. पण त्याचबरोबर यंत्रसामुग्री देशातल्या देशात निर्माण करून मोठ्या प्रमाणावरील उद्योगधंद्यांची भक्कम उभारणी करण्याचे महत्वही त्यांनी तितक्याच कळकळीने सांगितले. औद्योगिक विकास आणि शास्त्रीय प्रगतीशिवाय भारताचा इतर देशांबरोबरच्या शर्यतीत टिकाव लागणार नाही, हे नेहरूंनी ओळखूनच सुरवातीपासून या गोष्टी जनमनावर बिंबवण्यास सुरवात केली. देशात शास्त्रीय प्रयोग-शाळांचे एक जाळेच निर्माण करण्याच्या कामी नेहरूंनी पुढाकार घेतला. आज भारताच्या नवनिर्माणासाठी उद्योगधंद्यांची जी हळू हळू पण बळकट स्वरूपाची उभारणी होते आहे त्याचे पुष्कळसे श्रेय नेहरूंनाच आहे. पण औद्योगीकरणाचे महत्त्व पटवून देत असतानाच नेहरू शेतकी विकासाला विसरले नाहीत. जमीनदारी आणि जहागिरदारी नष्ट करून या कार्यास सुरवात झाली. पंचवार्षिक योजनांमधून शेतीला अग्रस्थान दिले गेले. सहकारी शेतीच्या तत्त्वाचा जोरदार पुरस्कार नेहरूंनीच केला.

## जनतापुरस्कृत नियोजनाची गरज

आर्थिक लोकशाहीची उभारणी करण्यासाठी आर्थिक नियोजनाद्वारे, औद्योगीकरण, आर्थिक-विकास, शास्त्रीय प्रगती नि शेवटी समाजवादी समाजरचना या गोष्टी अत्यावश्यक आहेत म्हणून नेहरूंनी आयुष्यभर त्यासाठी खटाटोप केला. त्याचबरोबर दुसरी एक प्रामुख्याने आढळणारी गोष्ट म्हणजे त्यांची बहुजनसमाजाच्या कर्तृत्वावरील निष्ठा व सहकारी तत्वावरील श्रद्धा. त्यांना आर्थिक नियोजन हवे होते. पण ते जनतेने पुढाकार घेऊन केलेले हवे होते, सरकारने लादलेले नको होते. सरकारी हस्तक्षेपाबद्दलची आपली तीव्र नापसंती वेळोवेळी नेहरूंनी व्यक्त केली आहे. या करिता समाजविकास-योजनांचा त्यांनी पुरस्कार केला. या विषयावर बोलताना नेहरूंनी म्हटले आहे की, " या समाजविकास-योजना माझ्या दृष्टीने फार महत्वाच्या आहेत. त्यामुळे एकात्मक समाजाची उभारणी होणार आहे. प्रत्येक भारतीय आधी त्याच्या गावाचे पुनरुज्जीवन करील नि अशा रीतीने शेवटी नवभारताच्या उभारणीत हातभार लावील." ते शेवटी म्हणतात, " योग्य प्रकारे पार पडा, यात खरेच काहीतरी क्रांतिकारी आहे ! आतापर्यंत ग्रामीण विभागाकडे आपण हवे तितके लक्ष दिलेले नाही.

याच नेहरूंच्या विश्वासामुळे त्यांच्या आर्थिक धोरणाला एक विशिष्ट वळण लागले. जानेवारी १९५८ मध्ये पंचायती राज्याच्या धोरणाचा अंगीकार करण्यात आला. १९५८ च्या नोव्हेंबरमध्ये सहकारी धोरणाचे तत्त्व स्वीकारण्यात आले. खेड्यांच्या विकासाकडे जास्त लक्ष पुरविण्याच्या दृष्टीने सहकारी चळवळ खेड्यापाड्यातून प्रथम पसरविण्याचे धोरण ठेवण्यात आले.



अनुक्रमणिका

भारताने आर्थिक नियोजनाचा अवलंब केला. त्याचप्रमाणे इतर अनेक राष्ट्रांनीसुद्धा या मार्गाचा अंगिकार केला नि करताहेत. पण आपल्या योजनात नि या इतर अनेक योजनात फार मोठा फरक आहे. कारण आपल्या योजनांमागे नेहरूंची विचारसरणी आहे. त्यात कुठल्याही एका नियोजनप्रकाराची सहीसही नक्कल नाही. तर आपल्या देशाला पचेल नि रुचेल अशाच गोष्टींचा अंगीकार आहे. इतर आफ्रिकेतील नि आशियातील अनेक उदयोन्मुख राष्ट्रात लोकशाही तग धरू शकली नाही पण भारतात मात्र आज १७ वर्षे दिमाखाने टिकू शकली; दोन पंचवार्षिक योजना आपण पुऱ्या करू शकलो; तिसरी पंचवार्षिक योजना पूर्ण होण्याच्या मार्गावर आहे. या सर्वांचे श्रेय नेहरूंच्या कुशल नेतृत्वालाच आहे. त्याबद्दल भारत त्यांचा कायम ऋणी राहील.

राजकीय आघाडीवर नेहरूंनी जगाला 'पंचशील' तत्व दिले. राजकीय सहिष्णुता पुन्हा नव्याने शिकविली. आर्थिक क्षेत्रात मिश्र अर्थव्यवस्था यशस्वी होऊ शकते हे दाखविण्याचा खटाटोप यांनी भारतातील नियोजनाद्वारे केला. सरकारी विभाग आणि खाजगी विभाग हे दोन्ही एकाच वेळेला असणे म्हणजे एका म्यानात दोन तरवारी ठेवण्यासारखेच. पण प्रत्येकाचे क्षेत्र मर्यादित केले तर दोन्ही विभाग एकाच वेळेला राहू शकतील, एवढेच नाही तर ते एकमेकांना उपकारक नि साहाय्यकारी ठरतील, त्यामुळे आर्थिक विकास जास्त जोरदार होण्यास मदत होईल. हे नेहरूंनी दाखविले. ही नेहरूंनी शिकवलेली आर्थिक आघाडीवरील सहिष्णुता. भारतातील प्राचीन मुनींच्या आश्रमात वाघ आणि हरिण एकाच तलावावर शेजारी शेजारी पाणी पीत, असे आपण वाचतो. विसाव्या शतकात नेहरू राजकीय आघाडीवर 'पंचशील' द्वारे आणि आर्थिक आघाडीवर मिश्र अर्थव्यवस्थेद्वारे अशाच प्रकारचा प्रयोग साधण्याचा प्रयत्न करीत होते, असे वाटल्यावाचून रहात नाही.

## नेहरूंच्या समाजवादावरील टीका

नेहरूंच्या आर्थिक धोरणावर टीका होत होती नि अजूनही होत आहे. नेहरूंच्या समाजवादात काही तथ्य नाही; ती एक अशी पोकळ पुंगी आहे की त्यातून तुम्ही हवा तो आवाज काढू शकता; नेहरूंचा समाजवाद फक्त पुस्तकातच राहिला. परिस्थिती मात्र त्या उलट वनत चालली आहे, भांडवलशाहीचे आसन अधिक बळकट होत आहे, नि गरीब मात्र दारिद्र्याच्या गर्तेत जास्त जास्तच खोल संतत चालले आहेत, वगैरे वगैरे अनेक प्रकारची टीका आपण ऐकतो. ही टीका निखालस खोटीही नाही, देशातील शेतकी विभागाची प्रगती हव्या त्या वेगाने होऊ शकली नाही, परदेशी चलनाची चणचण चालूच आहे. विशेषतः निर्यातीत आपण वाढ करू शकलो नसल्यामुळे परिस्थिती दिवसेदिवस जास्त गंभीर झाली आहे. किंमती भराभर वाढताहेत. नियोजनमंडळाच्या अयशस्वितेबद्दलही सर्वत्र टीका ऐकू येते आहे. लोकांचा सरकारी धोरणावरील विश्वास उडतो आहे.

पण या सर्व गोष्टींची नेहरूंना जाणीव नव्हती असे थोडेच आहे. उलट इतर कुणापेक्षाही त्यांना या चुकांची, या फसलेल्या प्रयत्नांची जास्त जाण होती, असे काही वेळेला त्यांनी काढलेल्या उद्गारांवरून वाटते. राष्ट्रीय विकासमंडळाच्या एका बैठकीच्या वेळी नेहरू म्हणतात, " आपण बरेचसे वृक्ष लावले पण लोक भुकेकंगाल, उपाशी घरदारविना राहिले तर जरी आपण वृक्ष लावण्याच्या बाबतीत मोठे यश मिळविले असले तरी आपण संपूर्ण अपयशी ठरलो असे म्हणावे लागेल.......सामान्य जनतेचे काय ? या १३ वर्षांच्या नियोजनाने त्यांना कसला लाभ झाला आहे ? नेहरू स्वतःच स्वतःच्या धोरणाचे मूल्यमापन कडव्या टीकाकारापेक्षा जास्त चांगल्या रीतीने करीत आहेत, असे वाटल्यावाचून राहवत नाही. कुठेही चूक होतेसे वाटले तर ते कधीच मी केले तेच बरोबर म्हणून अडून बसलेले दिसत नाहीत; तर लगेच थोडे फेरफार करून चुका सुधारण्याचा त्यांनी प्रयत्न केला. सहकारी संस्थांच्या बाबतीत सुद्धा सरकारी मदत देण्याच्या धोरणामुळे सरकारी हस्तक्षेप वाढतो. व सहकारी तत्त्वाला बाधा होते हे पाहून त्यांनी त्या धोरणात योग्य ते बदल घडवून आणण्यास मागेपुढे पाहिले नाही.








## पं. नेहरू आणि आर्थिक लोकशाही

अगदी पहिली पंचवार्षिक योजना सादर करताना-सुद्धा नेहरू म्हणतात, " योजना परिपूर्ण नाही; त्यात चुका काढणे काही कठीण नाही..... परिपूर्णता ही फार मोठी गोष्ट आहे.......पण मी तुम्हाला एक विनंती करतो की या योजनेकडे तुम्ही फक्त टीकेच्या दृष्टीकोनातून न बघता व्यापक दृष्टीकोनातून बघा, हा आपला पहिला प्रयत्न आहे.' .....नेहरूंना अपूर्णतेची, त्यातल्या दोषांची जाणीव नव्हती, असे कोण म्हणेल ? पुढे त्यांनी त्याचवेळेस असेही सांगितले की चुका सुधारत सुधारतच आपण योजना मूर्त स्वरूपात आणावयाची आहे. तोच एक मार्ग आपल्यापुढे आहे. कारण एकतर भविष्य-कालाबद्दल अगदी अस्पष्ट अंधुक अशीच जास्तीत-जास्त आपण कल्पना करू शकतो. नि शिवाय आपण नुसत्या सिमेंट, पोलाद सारख्या वस्तूंकरिता योजना आखीत नसून ३६ कोट माणसांकरिता योजना बनवीत आहोत आणि त्यातला प्रत्येक दुसऱ्याहून भिन्न आहे आणि त्यामुळे चुका सुधारत सुधारत पुढचा मार्ग शोधण्याचा हा एकमेव मार्ग आपल्यापुढे आहे. " हे जे त्यांनी सुरवातीला सांगितले त्याप्रमाणेच त्यांनी आपले धोरण ठेवले ते अपूर्णतेतून परिपूर्णतेकडे जाण्याचे, सदोषता नष्ट करून निर्दोषत्व निर्माण करण्याचे, अंधारातून प्रकाशाकडे नेण्याचे.

त्यांना काही बाबतीत अपयश आले असेल, कल्पना कल्पनाच राहिल्या असतील, स्वप्ने मूर्त स्वरूपात येऊ शकली नसतील, काही वेळेस आडाखे चुकले असतील, बऱ्याच वेळेस हेतुपुरस्सर विरोधकांनी तोंडघशी पाडण्याचा प्रयत्न केला असेल. पण या गोष्टींवरून नेहरूंच्या आर्थिक धोरणाच्या यशस्वितेचे मूल्यमापन करावयाचे हे केव्हाही बरोबर ठरणार नाही. प्रारंभीच्या बिकट काळात लोकशाही टिकवून ठेवून देशाला सुस्थिर अर्थ-व्यवस्थेचा लाभ करून देणे हे काही साधेसुधे काम नव्हे, आणि ते नेहरूंनी करून दाखविले. जाज्वल्य कर्तव्यनिष्ठा नि ओतप्रोत देशप्रेम यांचा इतका सुंदर समन्वय फार क्वचितच आढळत असेल. भारताचा आर्थिक विकास साधण्यासाठी स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर नेहरूंनी जे अक्षरशः तनमनधन अर्पण केले ते केवळ कर्तव्यपालन म्हणून नव्हे तर त्यांच्या नसानसात भरून राहिलेले भारताविषयीचे अतुलनीय देशप्रेम.

नेहरूंचे आर्थिक धोरण या त्यांच्या जाज्वल्य देशप्रेमाच्या पार्श्वभूमीवरून पाहिल्यास ते त्यांच्या विशुद्ध देशप्रेमाचाच एक आविष्कार आहे असे आढळेल !!

---

**❀ मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.**

**❀ या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.**

**❀ मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.**





अनुक्रमणिका

ले. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# नेहरूंची आंतरराष्ट्रीय राजनीति

राष्ट्रीय राजनीति व आंतरराष्ट्रीय राजनीति या दोन्ही परस्परावलंबी असतात. त्यांचा आपसात तर्कशुद्ध सजीव संबंध असतो. राष्ट्रीय राजनीति ज्या तत्त्वावर व ध्येयावर आधारलेली असते त्या तत्त्वांशी व ध्येयांशी सुसंगत अशी त्या त्या राष्ट्राच्या आंतरराष्ट्रीय राजनीतीची तत्त्वे व ध्येये असतात किंवा असावी लागतात. राष्ट्रीय राजनीतीच्या मूलभूत ध्येयात व तत्त्वात अस्पष्टता, गोंधळ व आंतरविरोध असेल तर त्याचा परिणाम राष्ट्राच्या आंतरराष्ट्रीय राजनीतीवरही तसाच होतो; आंतरराष्ट्रीय राजनीतीत अशा स्थितीत घोटाळ्याची परिस्थिती केव्हा उत्पन्न होईल याचा नेम नसतो. राष्ट्रीय राजनीति सामर्थ्यशाली व प्रगतिशील जितकी असेल तितकी विदेशनीति प्रभावी होऊ शकेल. तात्पर्य, राष्ट्रीय राजनीति हेच त्या त्या राष्ट्रांच्या राजनीतीचे स्वरूप व गतीची दिशा ठरवते.

## स्वराष्ट्राच्या कल्याणार्थच विदेशनीति जन्मते

कोणत्याही राष्ट्राच्या आंतरराष्ट्रीय राजनीतीच्या वरिष्ठ उद्देशाच्या गाभ्यात स्वराष्ट्राचे रक्षण किंवा आत्मरक्षण हा मूलगामी उद्देश नियमाने गृहीत धरलेला असतो. या उद्देशाचा परिपोष होईल, त्याला धक्का लागणार नाही किंवा त्याच्याशी प्रतारणा होणार नाही याची नित्य सावधान व सतर्क राहून खबरदारी घ्यावी लागते. आत्मा किंवा प्रस्तुत संदर्भात स्वराष्ट्र हे सर्व ध्येयांमध्ये व सर्व मूल्यांमध्ये उच्चतम मूल्य होय. किंबहुना आत्मकल्याण किंवा स्वराष्ट्रहित हा सर्व ध्येयांचा व मूल्यांचा अंतिम निकष होय. आंतरराष्ट्रीय राजनीतीच्या जुन्या ध्येयांचे स्वरूप चतुर्विध होते: (१) स्वराष्ट्ररक्षण (२) आर्थिक व राजकीय उद्देशाच्या पूर्तीकरता मित्रराष्ट्रे मिळविणे (३) शत्रूराष्ट्राला नमविणे व (४) राज्यसत्तेचा विस्तार करणे किंवा साम्राज्य स्थापणे; स्वराष्ट्रकल्याणाच्या या आंतरराष्ट्रीय कक्षा होत. 'आप मरे दुनिया डुब गयी' हा स्वार्थसमर्थक विचार आंतरराष्ट्रीय राजनीतीचा सनातन सिद्धान्त म्हणून मानलेला आहे. या सिद्धान्ताला मुरड किंवा मर्यादा दुसऱ्या विश्वयुद्धाच्या अखेरीस पडली; आता ती मर्यादा विश्वबंधुत्ववादी राजनीतीत काही प्रमाणात मान्यता पावू लागली आहे. स्वराष्ट्ररक्षण हे जितके महत्त्वाचे तितकेच विश्वमानव जातीचे रक्षण समतुल्य महत्त्वाचे आहे असा विचार अणुबाँबच्या शोधाअंती निघाला. अणुबाँबचे विश्वयुद्ध पेटले तर सर्व राष्ट्रांच्या बरोबर स्वराष्ट्रही दग्ध होण्याची संभवनीयता निर्माण झाली आहे. त्यामुळे जगाचे राजकारण हे स्वराष्ट्रकेन्द्रितर ाजकारणाचा विस्तार होय या सनातन सिद्धान्ताला मर्यादा पडली आहे; राजकारण विश्वकेन्द्रित बनू लागले आहे; व त्याचे प्रमुख उद्दिष्ट विश्वशांति व त्याकरिता युद्धसंस्थेची समाप्ति हे ठरले आहे.

## विश्वकेंद्रित राजनीतीची नांदी

या शांततावादी विश्वकेन्द्रित आंतरराष्ट्रीय राजकारणाची प्रसववेदना पहिल्या महायुद्धाच्या अखेरीसच सुरू झाली. अणुबाँबच्या शोधापूर्वीची ही स्थिती होय. मानवजातीच्या सामाजिक संस्थेचा अपरिहार्य भाग म्हणून युद्धाला मान्यता देणे किंवा परिस्थितीच्या प्रभावाने प्राप्त झालेली घटना म्हणून तिचा स्वीकार करणे हे एकंदर मानवी प्रगतीस धोक्याचे आहे, याची प्रकट व उत्कट जाणीव त्याचवेळी दूरदर्शी व मानवतावादी मुत्सद्यांना झाली. इ. स. १९१४ साली ऑगस्ट महिन्यात पहिल्या महायुद्धाची नांदी झाली. ही नांदी ज्या तोफांनी केली त्या तोफातून निघणारे ध्वनि "हा सर्व महामूर्खपणा आहे" अशा सूचना देत होते. "मानव्याचाच बळी पडणार आहे" असा त्यात ध्वनित अर्थ होता. म्हणून पहिल्या विश्वयुद्धाच्या शेवटी 'लीग ऑफ नेशन्स' अस्तित्वात आली.



अनुक्रमणिका








सर्व राष्ट्रांना स्वयंनिर्णयाचा हक्क प्राप्त झाला पाहिजे या अमेरिकन राष्ट्राध्यक्ष वुड्रो विल्सन यांच्या घोषणेने या लीगची स्थापना झाली. त्यानंतर लगेच आत्यंतिक राष्ट्रवाद वा फॅसिझम जन्मला; त्याचे आक्रमक राजकारण सुरू झाले, व त्याच्या-पुढे ही लीग दुबळी ठरली; व नष्ट झाली. दुसरे विश्वयुद्ध झाले. दुसऱ्या विश्वयुद्धानंतर विश्वकेन्द्रित राजनीतीचे आवाहन निरनिराळ्या स्वरूपात अह-महमिकेने दिले जाऊ लागले; त्या आव्हानांनी संघटनात्मक व संस्थात्मक रूप पुनः धारण केले; लीग ऑफ नेशन्सचा द्वितीय अवतार झाला; तो म्हणजे 'युनायटेड नेशन्स' होय.

या विश्वकेन्द्रित नीतीशी संवादी आविष्कार अन्यत्रही झाले. शांततापूर्ण सहजीवनाची घोषणा सोव्हिएट युनियनने केली आणि स्वतंत्र भारताने पं. नेहरूंच्या नेतृत्वाखाली पंचशीलाची घोषणा केली. पंचशील म्हणजे आंतरराष्ट्रीय वर्तनाचे पाच नियम होत :

(१) परस्परांवर राष्ट्रांनी आक्रमण न करणे अथवा अनाक्रमण; (२) परस्पर सहकार्य; (३) एकमेकांच्या राष्ट्रीय सीमांचे अबाधित परिपालन किंवा सीमावाद युद्धावाचून सोडविण्याचा प्रयत्न करणे; (४) सर्व राष्ट्रांची समानता किंवा समान-स्वातंत्र्य मान्य करणे, व (५) शांततामय सहजीवन; – हे ते पाच नियम. एप्रिल १९५४ साली तिबेट-संबंधात चीन-भारत कराराबरोबर नेहरूंनी लाल चीनशी पंचशील करार केला.

### पंचशील राजनीति

पंचशील ही परिभाषा नेहरूंनी अतिप्राचीन भारतीय अहिंसावादी वारसा म्हणून स्वीकारली. पंचशील हा शब्द भगवान बुद्धाचा आहे. खऱ्या बुद्धधर्मी सामान्य मनुष्याकरिता ही पंचशीले किंवा पाच नियम बुद्धधर्माने अनुशासिले आहेत. अहिंसा, अस्तेय, लैंगिक आत्मनिग्रह, असत्यवर्जन आणि मद्यनिवृत्ति ही ती पंचशीले होत. पं. नेहरू हे आधुनिक पश्चिमी संस्कृति आत्मसात केलेले गृहस्थ असल्यामुळे त्यांना आधुनिक संस्कृतीचा भारतीय मनुष्य म्हणून भारतातील व जगातील आधुनिक सुशिक्षितात मान मिळालेला आहे. परंतु त्यांच्या अन्तर्मनातील श्रद्धा, भावना व संस्कार यांच्या परिसरात भारतीय ध्येयवादाची उच्च अस्मिता ( Super Ego ) होती. त्यामुळेच त्यांना आधुनिक व्यक्तिमत्त्वाचे तेजोवलय असले तरी त्यांच्या ध्येयवादाच्या व विचारसरणीच्या मुळाशी ही उच्च अस्मिता स्तव्धपणे कार्य करीत होती. म. गांधींशी ते एकरूप होऊ शकले ते याच-मुळे. स्वातंत्र्य–आंदोलनाच्या कालखंडात, आम्ही गांधींची अहिंसा व्यवहार म्हणून मान्य केली आहे–तत्त्व म्हणून नव्हे, असे नेहरू म्हणत होते; तरी अहिंसेचा व्यवहार करता करताना नेहरूंचेही अहिंसा हे तत्त्व बनले व ते तत्त्व त्यांच्या आंतर-राष्ट्रीय राजनीतीच्या पंचशीलात प्रकट झाले. कोणत्याही राष्ट्राचे आंतरराष्ट्रीय राजनीतीचे स्वरूप तत्त्वात्मक नसतेः सत्तेच्या व्यवहाराचे मार्ग-दर्शक धोरण हेच तिचे स्वरूप असते. या धोरणाचे दोन भाग; एक मुख्य धोरण (Strategy) व तत्कालिक धोरण ( Policy ). मुख्य धोरणातून तत्कालिन धोरण वेळोवेळी परिस्थित्यनुसार ठरत असते. मुख्य धोरणे किंवा तत्कालिक धोरणे ही तात्त्विक निष्ठा किंवा श्रद्धा यांच्यापासून भिन्न असतात. तात्त्विक निष्ठा अचल असते. मुख्य धोरण स्थिर असले तरी अचल नसते व तात्कालिक धोरणे ( Policies ) वेळोवेळी आवश्यकतेप्रमाणे वदलण्यास तयार असावे लागते. मुख्य धोरणाला तात्त्विक निष्ठेची प्रेरणा असते परंतु त्याला तात्त्विक निष्ठेची मूस नसते.

### पंचशीलाचा ऐतिहासिक संदर्भ

पंचशील राजकारणाच्या यशापयशाची मीमांसा करीत असता महत्त्वाचे दोन ऐतिहासिक संदर्भ तपासणे जरूर आहे. पहिला संदर्भ म्हणजे नेहरूंच्या राजकीय जीवनाचा आद्यन्त इतिहास होय; व दुसरा संदर्भ म्हणजे प्राचीन भारतीय परंपरा हा होय. प्राचीन भारतीय परंपरेचे मूल्यमापन संक्षेपतः या लेखाच्या समारोपाच्या वेळी करू. अगोदर नेहरूंच्या राजकीय जीवनाचा कालपट व त्याच्याशी समांतर असलेला राष्ट्रीय

व जागतिक घडामोडींचा कालपट यांचे तुलनात्मक अवलोकन केले पाहिजे. नेहरूंच्या विदेश नीतीची बीजे स्वातंत्र्यपूर्व कालातच रोवली गेली. १९३५ साली स्पेनमध्ये गृहयुद्ध झाले. त्यात फॅसिझमचा विजय झाला. नेहरूंच्या नेतृत्वाखाली भारतीय राष्ट्रीय काँग्रेसने लोकशाहीकरिता फॅसिझमशी झगडणाऱ्या स्पेनच्या जनतेच्या बाजूने सहानुभूतीचा प्रस्ताव स्वीकृत केला. तेव्हापासून आंतरराष्ट्रीय राजकारणाची विशेष दखल भारतीय नेते घेऊ लागले. भारतीय राष्ट्रीय काँग्रेसने सन १९३६ मध्ये लखनौ येथे भरलेल्या अधिवेशनात नेहरूंना विदेशनीतीचे खाते उघडण्याचा अधिकार दिला. तेव्हापासून नेहरू हे भारताच्या वतीने विदेशनीतीचे प्रणेते बनले. भारताच्या विदेशनीतीचा स्वाभाविकपणे साम्राज्यशाहीविरोध हाच महत्त्वाचा आधार झाला. तिसऱ्या इंटरनॅशनलच्या म्हणजे कम्युनिस्टांच्या प्रभावाखाली असलेल्या विश्वसंघटनेच्या साम्राज्यशाहीविरोधी आंदोलनाच्या प्रभावाखाली नेहरू बरेच दिवस राहिले. फार मोठ्या अपेक्षा या विश्वसंघटनेच्या बाबतीत त्यांनी बाळगलेल्या होत्या. परंतु स्टॅलिनने जर्मनीशी अनाक्रमणाचा करार केल्यामुळे आणि साम्राज्यवादी जपानशी मैत्रीचे अनुसंधान बांधल्यामुळे फार जोराचा धक्का नेहरूंना बसला. आंतरराष्ट्रीय राजकारण हे तत्त्वे गुंडाळून कसे शुद्ध संधिसाधु बनते याचा त्यांना पहिल्यांदा प्रत्यय आला.फॅसिझमशी असलेला त्यांचा तात्त्विक विरोध आचरणात आणण्याची संधी दुसऱ्या युद्धाच्या प्रारंभी नेहरूंना प्राप्त झाली होती. परंतु तेव्हा त्यांच्या अंतर्मनात दृढमूल झालेल्या ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या विरोधाने त्यांच्या फॅसिझमशाही विरोधी भावनांवर मात केली. दुसऱ्या महायुद्धाचे क्रांतिकारक स्वरूप आपोआप त्यांच्या दृष्टिपथापासून बाजूला झाले. आणि सन १९४२ सालच्या 'भारत छोडो' या गांधीप्रणीत आंदोलनात ते सामील झाले. या दुसऱ्या विश्वयुद्धाच्या शेवटी जगातील पश्चिमी साम्राज्यशाह्यांसह ब्रिटिश साम्राज्यशाही दुबळी होऊन नष्टचर्यास प्राप्त झाली. यावेळी भारत प्रथम मुक्त झाला. भारताची 'संविधान समिति' (Constituent Assembly) स्थापन झाली. १९४७ जानेवारी २७ ला नेहरूंनी त्या संविधान समितीत असे जाहीर केले की, "ही भारतीय क्रांती आशियातील अन्य राष्ट्रांच्या बंधमुक्तीच्या आंदोलनाचा नेता बनणार आहे; आपण आतापासून अशा व्यापक स्वरूपातच आपली विचारसरणी बनविली पाहिजे." भारत मुक्त झाल्यानंतर आशियाई आणि आफ्रिकी राष्ट्रांतील साम्राज्यशाही सत्तेच्या विरुद्ध सशस्त्र उठाव व आंदोलने प्रभावी होऊ लागली व ती एकामागून एक यशस्वी झाली. एकामागून दुसरे अशी अनेक राष्ट्रे भराभर स्वतंत्र होऊ लागली. दुसऱ्या विश्वयुद्धानंतर सुरू झालेला आतापर्यंतचा हा कालखंड पश्चिमी साम्राज्यशाहीच्या विनाशाचा कालखंड होय. या मुक्तिपर्वाचे प्रारंभीचे एकमेव नेतृत्व भारताकडे म्हणजे पर्यायाने नेहरूंकडे आले.

## आशियातील प्रतिस्पर्धी एकमेव लाल नेतृत्व

हे एकमेव नेतृत्व फार दिवस टिकले नाही. त्याचा प्रबल भागीदार किंबहुना त्या नेतृत्वाचे स्वतः एकटेच वारसदार आहोत असा दावा सांगणारे प्रतिस्पर्धी लाल नेतृत्व आशियाच्या पूर्वेस दिमाखाने उदयास आले. माओत्से तुंगने चिनी जनतेचे स्वतंत्र गणराज्य ३१ सप्टेंबर १९४९ साली घोषित केले. चांग कै शेकच्या विशाल परंतु विस्कळित सत्तेच पराभव झाला व ती निमुटपणे चीनजवळील शांत महासागरातील तैवान नावाच्या छोट्या बेटात निर्वासित होऊन राहिली. नेहरूंचे चँग कै शेक जिगर दोस्त होते. ती दोस्ती आपोआप संपली. नेहरूंनी घाईघाईने ३१ जानेवारी १९५० ला माओत्से तुंगच्या चिनी गणराज्याला मान्यता दिली. लाल चीनला मान्यता देणारा भारत हा पहिला देश होय. लाल चीन स्वतःच्या, जगातील सर्वांत मोठ्या संख्येच्या अत्यंत संघटित भूसैन्याच्या ताकतीवर निर्माण झाला. तीस वर्षांच्या समराच्या दीर्घ अनुभवाने निष्णात झालेली विराट सैनिक शक्ति लाल चीनच्या पाठीचा भक्कम कणा बनला. त्याचे








हादरे बसून पूर्व आशियातील, दक्षिणपूर्व आशियातील व पॅसिफिक महासागरातील राष्ट्रांमध्ये उलथापालथी सुरू झाल्या. याची जाणीव नेहरूंना तावडतोब झाली. लाल चीनला मान्यता दिल्याबरोबर १५ च दिवसात नेहरूंनी भारतीय जनतेला इशारा दिला की, "सगळे जग संकटाच्या मुठीत आहे; शेजारची राष्ट्रे गोंधळात सापडली आहेत; या गोंधळापासून भारताने स्वतःचा बचाव करण्याकरिता सावध होऊन सतत यत्नशील राहिले पाहिजे." सन १९५० च्या ऑक्टोबरमध्ये म्हणजे लाल चीनला मान्यता मिळाल्याबरोबर आठ महिन्यात तिबेटमध्ये लाल सैन्य येऊन दाखल झाले. हिंदुस्थानच्या सरहद्दीवर ठेपलेली लाल चीनची शस्त्रे तळपू लागली. भारताचे सैन्य तिबेटातून परत घेतले गेले. अनेकांनी सल्ला दिला की तिबेट सोडू नका, परंतु तो मानला गेला नाही. कोरियात कम्युनिझमचे आक्रमण सुरू झाले. लाल चीनचा विस्तारवाद नेहरूंच्या मनाला धक्के देऊ लागला.

## आन्तरराष्ट्रीय कम्यूनिझमचा आक्रमकतेस पायबंद व शीतयुद्धारंभ

लाल चीनचा विस्तारवाद हा आंतरराष्ट्रीय कम्युनिझमचाच आशियातील आविष्कार होय परंतु नेहरूंच्या मते कम्युनिझमचा हा विस्तारवाद नव्हे; तो चीनचा स्वतःचा आहे. विश्वयुद्धाच्या शेवटी लाल सेनेने पूर्व युरोपमध्ये जर्मनीपर्यंत कम्युनिझमची स्थापना केली. त्यामुळे सर्व युरोपभर लाल क्रांतीची लांब छाया पसरू लागली. महायुद्धामुळे खिळखिळा, दुर्बल, जर्जर व भुकेने व्यथित झालेला पश्चिम युरोप पुनः प्रबल व नवयौवनसंपन्न व्हावा म्हणून मार्शल योजना कार्यान्वित होऊ लागली. त्यामुळे ही लाल छाया पसरण्याच्या ऐवजी घटू लागली. परंतु संघटित प्रतिकाराच्या तयारीशिवाय लालशक्ति स्वस्थ बसणार नाही हे पाहून नाटो 'पूर्व अटलांटिक तह-संघटना' नामक बिन कम्युनिस्ट युरोपियन लष्करी गट १४ एप्रिल १९६४ ला स्थापन करण्यात आला. अशाच प्रकारच्या आशियातील बिन कम्युनिस्ट लष्करी गटाची कम्युनिझमचे आक्रमण थांबविण्याकरिता आवश्यकता आहे अशी सूचना अमेरिकेचे अध्यक्ष ट्रुमन व ब्रिटनचे पंतप्रधान अटली यांनी नेहरूंना ऑगस्ट १९४९ मध्ये केली. ताकतच ताकतीचा सामना करू शकते; शक्तीच शक्तीला आडवू शकते; असा विचार नेहरूंपुढे या लोकशाही नेत्यांनी मांडला; नेहरूंनी तो मानला नाही. आंतरराष्ट्रीय कम्युनिझमचे आक्रमक धोरण लक्षात घेऊन ते आक्रमण थोपविण्याकरता आंतरराष्ट्रीय शक्तींची संघटनाच उपयोगी पडेल असा विचार मनाशी बाळगून पश्चिमी राष्ट्रे अशा लष्करी संघटना बांधण्यास उद्युक्त झाली. अशा लष्करी संघटना उभारण्याचे काम करीत असताना महायुद्धांनी जर्जर झालेल्या राष्ट्रांना व साम्राज्यशाहीच्या बंधनातून मुक्त झालेल्या नवमुक्त राष्ट्रांना आर्थिक नवजीवन प्राप्त होऊन राजकीय स्थैर्य प्राप्त व्हावे याकरिताही पश्चिमी राष्ट्रांनी योजना आखल्या व त्या कार्यान्वित होऊ लागल्या.

कम्युनिस्ट राष्ट्रे रशियाच्या नेतृत्वाखाली आणि बिन कम्युनिस्ट राष्ट्रे अँग्लो-अमेरिकन गटाच्या नेतृत्वाखाली किंवा पश्चिमी गटाच्या नेतृत्वाखाली दोन लष्करी गटात विभक्त झाली. व त्यामुळे जगात शीतयुद्धपर्व सुरू झाले. या शीतयुद्धातून तिसरे तप्त विश्वयुद्ध निर्माण होण्याचा धोका आहे असे नेहरूंना वाटू लागले. हे तिसरे विश्वयुद्ध अणुयुद्ध बनल्याशिवाय राहाणार नाही व हे अणुयुद्ध विश्वसंहारक ठरेल याबद्दल रशियन नेते व पश्चिमी नेते यांच्याही मनात शंका उरली नाही. शीतयुध्दातील दोन्ही विरोधी पक्षांना तिसऱ्या विश्वयुद्धाचे संकट टाळायचे होते. ते आजपर्यंत टळले आहे. याचे कारण विरुद्ध पक्षांना एकमेकांचे भय वाटते. परस्परांच्या भयानेच हे युद्ध टळणार असा व्यावहारिक व वस्तुवादी विचार दोन्ही विरुद्ध पक्षांच्या मनाचे नियंत्रण करीत आहे. परंतु याबाबतीत विश्वयुद्ध टाळताच येईल असे शंभर टक्के आश्वासन मिळणे अशक्यच आहे असा विचारही या परस्परभयवादाच्या बरोबरच शिल्लक राहिला. म्हणून शांततामय सहजीवनाचा सिद्धांत लेनिनच्या पोथीतून स्टालिनने बाहेर

काढला, व क्रुश्चोव्हने स्टालिननंतर त्याला अधिक प्रामाणिक बैठक देण्याचा प्रयत्न केला. इकडे अध्यक्ष केनेडींनी कालांतराने पश्चिमी राष्ट्रांच्या वतीने शांततामय सहजीवनाचे तत्त्व प्रभावीपणे पुरस्कारिले. अशा रीतीनें शक्ति व शांति या दोन्हींचा मेळ क्रुश्चोव्ह व केनेडी यांनी घेतला.

## तटस्थतेच्या धोरणाची उपपत्ति

नेहरूंना या शांततामय सहजीवनाच्या तत्त्वाचे दर्शन प्रथमपासूनच झाले होते. पंचशीलाचे धोरणात हे तत्त्व व्यक्त झाले. शीतयुद्धात म्हणजे पर्यायाने आंतरराष्ट्रीय लष्करी गटात सामील न होता नवमुक्त राष्ट्रांचे शांततावादी व तटस्थ ' तिसरे जग' नेहरूंच्या प्रयत्नाने उदयास आले. हे नवमुक्त राष्ट्रांचे तटस्थतावादी धोरण जन्मास येण्याचे पहिले कारण म्हणजे आंतरराष्ट्रीय लष्करी गट स्पर्धाशील बनून लष्करी खर्चाची सतत वाढ करीत राहतात. त्यामुळे नवोदित राष्ट्रांना आर्थिक व सामाजिक नवजीवनाची रचना करण्यास आवश्यक असलेल्या साधनसंपत्तीचा युद्धसाधने वाढविण्यातच अपव्यय होतो, तसे होऊ नये. दुसरे कारण असे की, नवोदित राष्ट्रांना चिरस्थायी शांततेची आत्म-विकासार्थ गरज आहे. लष्करी गटात सामील होण्याने अप्रत्यक्षरीत्या युद्धार्थ प्रोत्साहनच दिल्यासारखे होते. तटस्थतेचे धोरण विश्वशांतीच्या आंदोलनाचा एक महत्त्वाचा भाग म्हणून अवलंबिणे जरूर आहे. तिसरे कारण असे की, पश्चिमी गटात वा सोव्हिएट युनियनच्या कम्युनिस्ट गटात सामील होण्याने आक्रमक गटात सामील झाल्यासारखेच मानले जाणार. एका बाजूने कम्युनिस्ट गटाला अशी शंका आहे की, पश्चिमी गट कम्युनिझमचेच जगातून उच्चाटन करू इच्छितो. आणि दुसऱ्या बाजूने पश्चिमी गटाचे असे मत आहे की, कम्युनिझमला विश्वसाम्राज्य स्थापन करावयाचे आहे व व्यक्तिस्वातंत्र्यवादी जीवनपद्धती नष्ट करावयाची आहे. या दोन्ही गटां-पासून अलिप्त राहण्याने आक्रमकतेच्या शंकेचे वाता-वरण तटस्थांच्या प्रयत्नाने कमी करता येईल. नेहरूंनी तटस्थतेचे समर्थन आणखी एका महत्त्वाच्या कारणास्तव केले आहे ते असे की, पश्चिमी वा अन्य राष्ट्रांशी लष्करी कराराने बद्ध झाल्यास अन्य परकीय राष्ट्राच्या सैन्यास स्वराष्ट्रात येण्यास व राहण्यास संमति द्यावी लागते. मातृभूमीवर परकीय सैन्याला पाय ठेवू देणे म्हणजे पुनः पारतंत्र्याला आवाहन देणे होय.

नेहरूंच्या या तटस्थतेच्या धोरणाची मीमांसा करीत असता पहिला प्रश्न असा उपस्थित होतो. तटस्थ राष्ट्रे नवोदित व अतएव दुर्बल राष्ट्रे आहेत. अपवादादाखल पंचशील करार मान्य केलेल्या राष्ट्रांपैकी लाल चीन हेच तेवढे जगातील लष्करीदृष्टचा अत्यंत समर्थ राष्ट्र आहे. लष्करी-दृष्टचा भारत हा असमर्थ राष्ट्रांच्या मालिकेत येतो. तटस्थतेचे धोरण स्वीकारणारे राष्ट्र जर असमर्थ असेल तर त्याच्यावर आक्रमण झाल्यास त्याच्या रक्षणार्थ व आक्रमणाच्या निवारणार्थ साहाय्य करण्यास कराराने बद्ध झालेले असे दुसरे राष्ट्र नसल्यामुळे पराभवाची शक्यता वाढते. तटस्थतेचे राजकारण हे तर्कदृष्टचा आत्मसंरक्षणास पूर्ण समर्थ असलेल्या राष्ट्रांचेच राजकारण होऊ शकते. अत्यंत सामर्थ्यशाली अशा पश्चिमी राष्ट्रां-नाही लष्करी कराराने एकजूट करण्याची पाळी आली आहे. तेथे दुर्बलांची काय कथा? या युगात विशेषतः कोणत्याही सामर्थ्यशाली आक्रमणास यशस्वी रीतीने परतवण्यास अनेक सामर्थ्यशाली राष्ट्रांची एकजूटच समर्थ बनवू शकते. ही जर अद्ययावत् साधनसामग्रीने सुसज्ज अशा आधुनिक राष्ट्रांची स्थिती आहे तर नवोदित असमर्थ राष्ट्रांची आक्रमण झाल्यावर काय स्थिती होईल याची कल्पनाच करणे बरे. तटस्थतेचे समर्थन करीत असता महत्त्वाचे एक कारण सांगण्यात येते की, परकीय सैन्य मातृभूमीत आक्रमण निवारणार्थ शिरल्यावर ते अप्रत्यक्षपणे पारतंत्र्याचेच आवाहन ठरेल. परंतु हे भय गेल्या विश्वयुद्धानंतरच्या कालाची पार्श्वभूमी लक्षात घेता अस्थानी ठरते. पश्चिमी राष्ट्रांनी आपली सैन्ये अन्य राष्ट्रांच्या भूमीतून परत घेतली आहेत. पराजित जर्मनी व जपान येथून दोस्त राष्ट्रांनी व विशेषतः अमेरिकेने पराजितांची नाखुषी दिसल्याबरोबर आपली सेना








माघारी नेली व त्यांच्या मागणीमुळेच विशिष्ट कालावधीपर्यंत थोडे सैन्यविभाग तेथे राखले. हिंदुस्थानातीलही ब्रिटिश सैन्य आपखुषीने परत गेले आहे. परकीय सैन्य मातृभूमीत कोणत्या उद्देशाने व धोरणाने येते याचा अर्थ निरनिराळ्या संदर्भात बदलतो. म्हणून परकीय सैन्याच्या कल्पनेची धास्ती घेणे म्हणजे ही केवळ पूर्वसंस्काराचीच प्रतिक्रिया ( Conditioned Reflex ) ठरते. तिसरे असे की, तटस्थतेचे धोरण हे सर्व राष्ट्रांनी धोरण म्हणून स्वीकारले तरच विश्वशांतीच्या अनेक उपायांपैकी तो एक उपाय म्हणून ठरू शकतो. परंतु जगातील सर्व सामर्थ्यशाली आधुनिक प्रगत राष्ट्रे लष्करी गटात सामील आहेत व प्रसंग पडल्यास प्रत्यक्ष युद्ध पुकारण्यासही तयार आहेत. ही त्यांची तयारी आक्रमकाला प्रत्यक्ष थोपवून धरीत आहे. उलट तटस्थ राष्ट्रे लष्करी दृष्टया नजीकच्या काळात कायम दुर्बल राहणार असल्यामुळे आक्रमकाला प्रत्यक्ष थोपवून धरणे त्यांच्या सामर्थ्याबाहेरचे आहे. आज जी जगात मोठ्या प्रमाणात शांतता आढळते त्याचे कारण आक्रमकाला पराभवाचे व विनाशाचे भय आहे हेच होय. प्रतिकाराची दुर्दम शक्तीच आज विश्वसंग्रामाला थोपवून धरीत आहे. तटस्थतेचे धोरण त्याला तटस्थ राष्ट्रांचा केवळ नैतिक पाठिंबा देऊ शकते.

### ध्येयवादांचा संग्रामच शीतयुद्धाची मानसिक अवस्था

आज सोव्हिएट युनियन व पश्चिमी राष्ट्रे यांच्यातील शीतयुद्धाला तात्पुरता विराम पडलेला असला तरी शीतयुद्धास अनुकूल असलेली मानसिक भूमिका यत्किंचितही ढळलेली नाही. ही भूमिका म्हणजे उद्देशांचा संग्राम होय. राष्ट्राराष्ट्रांमधील उद्देशांचा संग्राम जोपर्यंत प्रखरपणे चालू असतो तोपर्यंत शीतयुद्ध कायम असते. मग हे उद्देश सीमेबद्दलचे असोत, सांस्कृतिक वा आर्थिक असोत, वा ध्येयवादी क्रांतीचे असोत. चीन-भारत शीतयुद्ध सीमा व ध्येयवाद या दोन्ही मुद्यांवर आहे. पाक-भारत वाद हा प्रादेशिक व सांस्कृतिक मुद्यांवर आहे; पश्चिम जर्मनी व पूर्व युरोप यांच्यातला वाद सीमा व ध्येयवाद या दोन्ही मुद्यांबद्दलचा आहे. अशा वादांची जाणीव तेवढी प्रसंगविशेषी कमीजास्त होते. शीत युद्धालाही आरोह व अवरोह असतात. सध्या अवरोहाचा काळ आहे. शांततामय सहजीवन हे धोरण म्हणून सोव्हिएट युनियनने मान्य केले आहे. परंतु तत्त्व म्हणून त्याचा अंगिकार सोव्हिएट युनियनने केला आहे की नाही हे अजूनपर्यंत तरी निश्चित सांगता येत नाही. शांततावादी सहजीवनाचे, आंतरराष्ट्रीय राजनीतीचे मूलभूत तत्त्व म्हणून अवलंबन 'युनायटेड नेशन्स' याच एका संघटनेने केले आहे. अलीकडे अध्यक्ष जॉन केनेडी यांनीही त्याचा तत्त्व म्हणून पुरस्कार केला. या तत्त्वाच्या पाठीमागे अजिंक्य अशी आंतरराष्ट्रीय सैनिक-शक्ती जोपर्यंत उभी करण्यात व सार्वत्रिक निःशस्त्रीकरण करण्यात युनायटेड नेशन्स या संघटनेला यश येत नाही तोपर्यंत ध्येयवादी संग्रामांच्या पोटातील तिसऱ्या विश्वयुद्धाची संभवनीयता कायम राहणार आहे. ह्या ध्येयवादी संग्रामात दोन कक्षा किंवा दोन पक्ष आहेत. पहिली अत्यंत महत्त्वाची कक्षा किंवा पक्ष कम्युनिझमचा आहे. जगातील सर्व मानवजात कम्युनिस्ट क्रांतीच्या छायेखाली येणार नाही तोपर्यंत मानव बंधमुक्त होणार नाही, म्हणून सर्व मानवी विश्वात कम्युनिझमची क्रांति शक्य त्या उपायांनी घडवून आणणे हे अंतिम ब्रीद म्हणून जगातील सर्व कम्युनिस्ट पक्षांनी व राष्ट्रांनी प्राणपणाने स्वीकारले आहे. या ध्येयवादाच्या पूर्तीकरिता सशस्त्र आक्रमणाची आवश्यकता आहे की नाही याबद्दल चीन व सोव्हिएट युनियन यांच्यात मतभेद झाले आहेत असे दिसते. लाल चीन उघडपणे माओत्से तुंगच्या ध्येयवादी नेतृत्वाखाली युद्धनीति हीच विश्व-कम्युनिझमची जननी होय असे मानतो. सोव्हिएट युनियन व तिच्या प्रभावाखाली असलेली युरोपियन कम्युनिस्ट राष्ट्रे या माओत्से तुंगच्या सिद्धांताचा निरपवादपणे स्वीकार करण्यास तयार नाहीत. आशियाई राष्ट्रांच्या संदर्भात असे म्हणता येते की कोणत्याही आशियाई राष्ट्राला सोव्हिएट युनियनच्या धोरणापेक्षा लालचीनचे धोरणच लक्षात घेऊन











आपला राजकीय वर्तनक्रम व मुख्य धोरण ठरविले पाहिजे.

या ध्येयवादी संग्रामाची विरोधी दुसरी कक्षा म्हणजे पश्चिमी राष्ट्रांचा ध्येयवाद होय. व्यक्तिस्वातंत्र्यनिष्ठ संसदीय लोकशाही जीवनपद्धती हीच आदर्श जीवनपद्धती असून तिला जागतिक कम्युनिझमचा चिरंतन धोका आहे. हा धोका नाहीसा करण्याच्या बाबतीत पश्चिमी राष्ट्रात तडजोडवादी व आत्यन्तिक असे दोन विचारप्रवाह आहेत. अमेरिकेचा गोल्ड वॉटर या आत्यंतिक धोरणाचा पुरस्कर्ता आहे. तडजोडवादी विचारसरणी ही अधिक महत्त्वाची आहे. ती विचारसरणी पश्चिमी अनुभववादी तत्त्वज्ञानावर आधारलेली आहे म्हणून ती अधिक महत्वाची आहे. अनुभववादी तत्त्वज्ञानाचे असे म्हणणे आहे की, प्रत्येक राष्ट्राला किंवा प्रत्येक समाजाला आपली समाजनीति व राजनीति स्वतःपुरती ठरविण्याचा व बदलण्याचा अधिकार आहे. राष्ट्रविकास किंवा समाजविकास हा प्रयोग व अनुभव यांच्या साहाय्यानेच होऊ शकतो. व्यक्तिस्वातंत्र्यवादी लोकशाही जीवन हा आदर्श सामाजिक संस्थांच्या अनुभवातून स्वाभाविकपणे परिणत व्हावा लागतो. एका राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्रावर विशिष्ट राज्यपद्धति लादण्याची प्रक्रिया आता थांबली पाहिजे. ज्यांनी कम्युनिझम स्वीकारला आहे त्यांच्यात स्वानुभवाने निश्चित बदल होईल. आपले आंतरराष्ट्रीय कर्तव्य एकच ठरते ते हे की, कम्युनिझमच्या आक्रमकतेचा अंत करणे हे होय. शांततावादी सहजीवनाचे धोरण जगातील सर्व राष्ट्रांना मान्य करावयास लावणे हाच ' युनायटेड नेशन्स' या संघटनेचा उद्देश आहे. हा उद्देश या तडजोडवादी पश्चिमी गटाच्या नेतृत्वाखाली कार्यान्वित होत आहे.

## ढासळणारी गटस्थता व दुर्बल तटस्थता

पश्चिमी राष्ट्रांनी किंवा सोव्हिएट युनियनने जे आंतरराष्ट्रीय लष्करी गट उभारले त्यांना आता प्रत्येक ठिकाणी तडे गेले आहेत. नाटो संघटनेतील फ्रान्सचे विदेश राजकारण म्हणजेच द गॉलचे राजकारण तडा गेल्याचेच द्योतक आहे. आशियातील पाकिस्तान हा लष्करी गटातील दुवा निखळल्यासारखा झाला आहे. सोव्हिएट युनियनच्या वार्सा करारातील राष्ट्रांमध्येही अनेक द गॉल उत्पन्न झाले आहेत. आंतरराष्ट्रीय लष्करी गटांच्या राजकारणाची पकड शिथिल झाली हे जितके खरे तितके पंचशील धोरण स्वीकारणाऱ्या ऑफ्रोआशियाई राष्ट्रगटामध्येही पंचशील धोरणाची उपेक्षा उघडकीस आली आहे. चीनचे भारतावर आक्रमण झाल्यापासून पंचशील गटातील इजिप्तसारखा एखादुसरा अपवाद सोडल्यास 'नरो वा कुंजरो वा ' म्हणणारी पंचशील गटातील राष्ट्रे यांची मनःस्थिती उघडी पडली आहे. तटस्थतावादी राजकारणही वैफल्याच्या चक्रव्यूहात अडकून पडले आहे.

तटस्थतेचे राजकारण हे आक्रमकाला पायबंद घालू शकत नाही ही गोष्ट चीनचे भारतावरील आक्रमण आणि दक्षिण-पूर्व आशियातील चीनचे लष्करी डावपेच सिद्ध करीत आहेत. पंचशीलाचे व तटस्थतेचे धोरणावर म्हणजे पर्यायाने नेहरूंवर मर्माघात चिनी आक्रमणाने केला. त्यामुळे त्यांच्या जीवनाची समाप्ति दुर्दैवाने अपेक्षेपेक्षा फार लवकर झाली. ती एक ध्येयवादी आंतरराष्ट्रीय राजकारणाची शोकांतिका आहे. नेहरूंचे स्वातंत्र्योत्तर काळातील राजकीय जीवन म्हणजेच ही शोकांतिका होय. ही शोकांतिका एकांकिका आहे. जागतिक राजकारणाचे रंगमंदिरच या विसाव्या शतकातील शोकांतिकांचे नाटयमंदिर बनले आहे. ही शोकांतिकांची मालिका मानवजातीच्या महाशोकांतिकेची नांदी बनू नये याकरिता नेहरूंच्या एकांकिकेची वैचारिक पार्श्वभूमी मीमांसिली पाहिजे.

## वस्तुवादविहीन ध्येयवादाची परंपरा

नेहरूंचे विचारविश्व अद्‌भूतरम्य ध्येयवादाने भारलेले व भरलेले आहे. या अद्‌भूतरम्य ध्येयवादाची रचना म. गांधींच्या अलौकिक प्रभावाखाली रचली गेली. जगातील युद्धसंस्था हा मानवी समाजसंस्थेचा परंपरागत आलेला वारसा आहे. तो वारसा मानवजातीने टाकून दिला नाही तर मानवजातीचा प्रलय टळू शकणार नाही. म्हणून गांधीवादी अहिंसेचा आंतरराष्ट्रीय राजकीय पथ नेहरूंनी निर्माण करण्याचा प्रयत्न केला. अद्‌भूतरम्य ध्येय-

वाद हा धार्मिक विचारसरणीचे व धार्मिक ध्येयवादाचे मूळ अधिष्ठान होय. गांधीवाद हा त्याचाच एक आविष्कार होय. गांधींचे अर्थशास्त्र व ग्रामसंघटनेचे समाजशास्त्र या गोष्टी वर्तमानकालीन वस्तुस्थिती व प्रत्यक्ष सामाजिक अनुभव यांच्यावर आधारलेल्या नसून अस्तंगत अशा प्राचीन व मध्ययुगीन सामाजिक जीवनाच्या रमणीय आदर्श चित्रावर आधारलेल्या आहेत. ते रमणीय आदर्श चित्र नेहरूंना मान्य नव्हते हे खरे आहे. परंतु गांधीवादाचा भावनात्मक आदर्श नेहरूंच्या वैचारिक प्रक्रियेत आपोआप शिरला.

दुसरी अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्राचीन भारतीय संस्कृतीचा वारसा. भारतीय ध्येयवाद व तत्त्वज्ञान यांच्या परंपरेत वस्तुवादी अनुभवनिष्ठ व प्रयोगावलंबी विचारांची बैठक कोठेही सापडत नाही. चार्वाकाचे भौतिकवादी तत्त्वज्ञान हा एक अपवाद सोडल्यास सगळी भारतीय तत्त्वदर्शने बाह्य विश्वाच्या भौतिक स्थितीचे महत्त्व नाकारतात. हा नकार दोन प्रकारचा आहे. जे दार्शनिक पंथ बाह्यविश्वाचे स्वतंत्र अस्तित्व मानतात तेही त्याला बंधन म्हणून झिडकारतात म्हणजेच नाकारतात. व काही मायामय, क्षणभंगुर किंवा शून्य म्हणून नाकारतात. या तत्त्वज्ञानाचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष परिणाम सामाजिक व राजकीय इतिहासावर हजारो वर्षे झालेला दिसतो. जातिबद्ध समाजव्यवस्था ही सामाजिक व राजकीय दृष्ट्या दुर्बळ व चिरकाल शिलीभूत (Fossilised) समाजसंस्थेचे रूप आहे. भारताचा राजकीय इतिहास असे दाखवितो की, येथे ग्रामपंचायतीसारख्या किंवा जमात-पंचायतीसारख्या जुजबी व कायम बाल्यावस्थेत राहिलेल्या राजकीय संस्थांशिवाय अधिक उच्चतर राजकीय जीवन जगणारी सामर्थ्यशाली राजकीय संस्थाच निर्माण होऊ शकली नाही. याचे कारण वस्तुवादी दृष्टिकोणाचा अभाव हे होय. भारतीयांचा नैतिक किंवा पारमार्थिक ध्येयवाद ऐहिक जीवनाची सामर्थ्यशाली रचना करण्यास असमर्थ ठरला. चीनचा इतिहास असा नाही. ऐहिक, नैतिक जीवनाला तेथील द्रष्टयांनी व राज्यकर्त्यांनी महत्त्व दिले. त्यामुळे एकभाषी व एकसंस्कृतीचा विशाल चीनी समाज निर्माण झाला. पश्चिमी संस्कृतीतही ग्रीक, रोमन व किंबहुना ख्रिश्चन परंपरेच्या प्रभावाखाली राजकीय व सामाजिक सामर्थ्य असणाऱ्या समाजसंस्था निर्माण झाल्या.

नेहरूंचे पंचशील राजकारण व तटस्थतेचे धोरण याला जबरदस्त वस्तुवादी दृष्टिकोणाचा आधार प्राप्त झाला तर त्याच्यातून स्वराष्ट्राचे संरक्षण करण्यास समर्थ अशी नवी आंतरराष्ट्रीय राजनीति आकार घेऊ शकेल. तटस्थता हे व्यवहारी धोरण आहे, तत्त्व नाही; ही कल्पना मान्य करण्यानेच वस्तुवादी विचारास खरा प्रारंभ होईल. स्वराष्ट्रकल्याण व विश्वशांति या दोन ध्येयांतील आंतरविरोध लक्षात घेऊन स्वराष्ट्रकल्याणाची बाजू संभाळणारे नवे धोरण स्वीकारावे लागेल. नेहरूंच्या उदात्त ध्येयवादी नेतृत्वापासून प्रेरणाही घेतली पाहिजे व धडाही घेतला पाहिजे. केवळ प्रेरणा घेतल्याने आत्मवंचना होण्याची फार शक्यता आहे.

लेे. अगेहानंद भारती अनु. डॉ. सौ. इंदुमती पारीख

# निधर्मी भारत

भारतात निधर्मी राज्याची स्थापना झाली आहे ही गोष्ट खरी नाही. भारतीय घटनेतील निधर्मी राज्याची घोषणा सांप्रदायिक असून वैचारिक, सांस्कृतिक व भावनिक दृष्ट्या ती निधर्मी नाहीच असे म्हणावे लागते. ही घोषणा साधारणपणे अशी आहे. कोठल्याही धर्मात ढवळाढवळ करण्यात येणार नाही; कोणाहीबद्दल दुष्टावा नाही; कोठल्याही एका धर्माचा पुरस्कार करण्यात येणार नाही; इत्यादी. या गोष्टी स्पष्ट करण्याचं मुख्य कारण म्हणजे पश्चिमी जगातील विचारवंताकडून - शिक्षणाच्या निमित्ताने आलेल्या संबंधातून - आत्मसात केलेल्या निधर्मी मूल्यांशी आधुनिक भारताच्या निर्मात्यांचे प्रत्यक्ष व्यवहारात सतत उडणारे खटके हे होय. आणि म्हणूनच स्वातंत्र्योत्तर भारताच्या अधिकृत संस्कृतीचा भाग म्हणून घटनेत समाविष्ट केलेला निधर्मीपणाचा हा खुलासा औषधी व "कॅथार्टिक" आहे. कारण भारतीय परंपरेतील निधर्मी संस्थांचा अभाव श्री. नेहरूंसकट अनेक भारतीय पुढाऱ्यांना माहीत आहे; परंतु ज्याना ही गोष्ट माहीत आहे त्याना त्याचा पुरता अर्थ कळलेला नसून त्याचे महत्त्वही वाटत नाही. याची जाणीव करून देण्यास दक्षिण आशियाई संस्कृतीच्या पार्श्वभूमीवर भारतीय संस्कृतीचा सखोल अभ्यास करण्याची गरज आहे. चीन, जपान, थायलंड किंवा इतरही लहान लहान दक्षिण आशियाई संस्कृतीत खऱ्या अर्थाने निधर्मी संस्था अस्तित्वात होत्या हे लक्षात घेणे जरूर आहे. तेथे धार्मिक विचारास तोंडदेखल्या महत्त्व असले तरी त्यांचे राजकारण खऱ्या अर्थाने निधर्मी तत्वावर चालत होते.

## राष्ट्रीय जीवनाला निधर्मी पोताची उणीव

वर उद्धृत केलेली घटनेतील निधर्मीराज्याची कल्पना हीच भारतातील परंपरेतील निधर्मीसंस्थांच्या अभावाचा पुरावा होय. निधर्मीराज्याच्या कल्पनेचा, आधुनिक विचारवन्तास पटेल अशा तऱ्हेने विकास करावयाचा असेल— आणि ते विकासाचे काम विचारवन्तच करू शकतील— तर धार्मिक बाबतीत ढवळाढवळ करणार नाही हे आश्वासन पुरेसे नाही. निधर्मीपणा व्यवहारात आणण्याच्या दृष्टीने एखाद्या धर्माला किंवा पंथाला पाठिंबा न देणे किंवा त्याचा पुरस्कार न करणे अपुरे आहे. देशभक्तिसुद्धा सर्व जुनी मूल्ये बुद्धिवादी विचारसरणीच्या निकषावर घासून पाहून निधर्मी तत्त्वज्ञान व्यवहारात मूलभूत मूल्य म्हणून प्रस्थापित करील अशा तऱ्हेची एकही संस्था उभारण्याचा नेहरूसकट मागील पिढीतील एकाही पुढाऱ्याने प्रयत्न केलेला दिसत नाही. कदाचित् राष्ट्रीय चळवळीच्या उच्चतम नेत्यांना स्वातंत्र्य लढ्याकरता राष्ट्रवादातूनच स्फूर्ती मिळाली असेल. कदाचित् निशाण, भाषा व अध्यात्म यासारख्या धार्मिक गोष्टींना त्यांचे भावनात प्राधान्य मिळाले असेल; परंतु यामुळे त्यांचे हातून राष्ट्रीय जीवनाचे निधर्मी पोत विणले गेले नाही. किंवा पुढील पिढीच्या राजकीय व शासनिक शिक्षणात निधर्मीपणाचे लोणही ते पोचवू शकले नाहीत. पाश्चात्य राज्यशास्त्रज्ञ, शासनकर्ते व इतिहासकार वस्तुनिष्ठ शैलीत बोलत असतात, परंतु या शैलीचा भारतीय श्रोत्यांवर काहीही परिणाम होऊ शकत नाही. नेहरू व त्यांचे सहकारी भारतीय श्रोत्यांचा प्रतिसाद मिळविताना वापरीत असलेली भाषा, बुद्धिवादी व निधर्मी नसते याची जाणीव त्यांना असावी— आहेही. परंतु ही भाषा व्यापक स्वरूपात बदलण्याचा मार्ग त्यांना दिसत नाही. संसदेत, वृत्तपत्रात, शिक्षणकार्यात किंवा घराघरातून विधिनिषेधपर विधाने करावयाचे सोडून जर कोणी वस्तुनिष्ठ विधाने करावयाचे ठरविले तर सगळीकडे उदासीनतेचे व गोंधळाचे वातावरण निर्माण झाल्यावाचून रहाणार







नाही. भारतातील भ्रष्टाकार, जाडय, मांद्य व गटबाजी याचे मूळ काहीही असले तरी भ्रष्ट होणारे व न होणारे, ज्यांच्या मनावर कोठल्याही गोष्टीची प्रतिक्रियाच होऊ शकत नाही किंवा जे संपूर्ण मूर्ख आहेत, किंवा अगदी साधेसुधे लोक या सर्वांचा पौराणिक गोष्टीवर संपूर्ण विश्वास आहे. ' भारतमाता', 'आध्यात्मिक आम्ही व जडवादी पाश्चिमात्य ', ' आमची परंपरा ' या गोष्टीखेरीज येथे पान हालत नाही. याकरता पुराणांच्या भाषेतच येथे बोलावे लागते, तीच भाषा जिवन्त ठेवावी लागते. निधर्मी विचारास येथे श्रोते मिळतच नाहीत.

## निधर्मी तत्त्वज्ञानाचा अभाव

खऱ्या निधर्मी वर्तनाशी खटकणारे परंतु सांप्रदायिक व अधिकृत भारतीय निधर्मीपणाचे अनेक दाखले भारतीय जीवनात सापडतात. येथे गांधी-तत्त्वज्ञान प्रत्यक्षात किंवा कायद्याने उलथून पाडणे अशक्य आहे. त्यामुळे मूलभूत प्रश्नांची येथे मुस्कटदाबी होते व मूलभूत वैचारिक बदल संभवत नाही. या तत्त्वज्ञानाच्या धार्मिक मूल्यावर टीका करणाऱ्या परकीय विचारवन्तास येथे येण्यास मज्जाव होतो तर एतद्देशीय टीकाकारांना शैक्षणिक व प्रसिद्धि क्षेत्रात शिरकाव मिळत नाही. गांधींची सर्व शिकवणूक भारतीय परंपरेतील धार्मिक शिकवणूक आहे. रामकृष्ण मिशनचा एक स्वामी आपल्या व्याख्यानात नेहमी म्हणतो: " गांधीच्या तत्त्वज्ञानात वेगळे असे काय आहे ? हे सर्व भगवद् गीतेचे, उपनिषदाचे, गौतमबुद्धाने सांगितलेलेच तत्त्वज्ञान आहे " आणि हे म्हणणे खरेही आहे. कारण एकही निधर्मी तत्त्ववेत्ता गांधींचे स्फूर्तिस्थान नव्हता. त्यांचे तत्त्वज्ञानातील लैंगिक गोष्टीबद्दलची घृणा त्यांच्या वैष्णव पार्श्वभूमीतून व ज्या प्रदेशात त्यांचे बालपण गेले तेथील लोकमतावर पकड असलेल्या कबीर, नानक, सहजानंद, स्वामीनारायण इत्यादि धार्मिक संतांच्या शिकवणीतून उत्पन्न झाली आहे. त्याचप्रमाणे गांधींची राष्ट्राच्या दैवीपणाची, व्यक्तिव्यक्तीतील संबंधाविषयी अर्थशास्त्र, परराष्ट्रीय धोरण या संबधीच्या कल्पनांची स्फूर्तिस्थाने भारताबाहेरील असली तरी टॉलस्टॉय, रस्किन, कार्लाइल यासारख्या निधर्मी तत्वज्ञानावर विश्वास नसलेली आहेत.

जेथे शासनकर्ते व राजकीय पुढारी यांच्या दृष्टीकोणात मूलभूत मतभेद असत नाही तेथे निधर्मी तत्वज्ञान वाढत नाही. येथे करन्सीची अफरातफर, कर चुकवणे व यासारखे भारताच्या विकासास व अर्थव्यवस्थेस घातक गुन्हे परदेशी किंवा भारतीय गुन्हेगार सहज पचवू शकतो. परंतु एखादा माणूस आपले लैंगिक बाबतीतील वैयक्तिक विचार सार्वजनिक रीत्या मांडू लागला तर गोत्यात आल्याखरीज रहाणार नाही. या बाबतीतील अधिकृत दृष्टीकोन सुद्धा सनातनी असून त्यात वैश्विक हटवादाचा, जागतिक धार्मिकतेचा व उच्चनीचतेवर आधारलेल्या संस्कृतीचे प्रतिबिंब आहे. त्यास बुद्धिवादाची किंवा वस्तुनिष्ठतेची बिलकुल बैठक नाही.

## व्यभिचार खुनापेक्षा भयंकर

नानावटी खटला हा पारंपरिक वर्तणुकीचा अर्क आहे. खुनी इसमास, विचारपूर्वक केलेल्या खुनाच्या आरोपातून ज्यूरी सोडून देतात कारण काय तर त्याचे बाजूने अनेक विनंती अर्ज आले, त्याचेकरिता दयेची याचना करण्यात आली, प्रार्थना झाल्या, खून झालेल्या माणसाच्या प्रतिमा जाळण्यात आल्या व शेवटी शासनसंस्थेकडून न्यायालयाकडे विनंती करण्यात आली, व या सर्वास समाजातील रोगट वृत्तपत्रांनी भरमसाट प्रसिद्धि दिली. व्यभिचार हा खुनापेक्षाही जास्त भयंकर गुन्हा ठरला. खटला चालू असता वस्तुनिष्ठ न्यायाची मागणी करणारे लोक संशयास्पद ठरले. सनातनी हिंदुतत्त्वज्ञानाप्रमाणे लग्नबाह्य लैंगिकसंबंध हा खुनापेक्षाही भयंकर गुन्हा आहे. असे प्रकार क्वचित् प्रसंगी भारताबाहेरही होतात. न्युयार्क शहरात रसेलच्या व्याख्यानावर याच कारणाकरता बहिष्कार घालण्यात आला. परंतु त्याची पार्श्वभूमी नानावटी खटल्यापेक्षा वेगळी होती. आणि रसेलच्या व्याख्यानावर बहिष्कार घालणाऱ्या श्रोत्यांची पाश्चिमात्त्य बुद्धिवादी जगाने गय केली नाही; तर उलट भारतात एरवी समतोल, शहाणे किंवा स्वतःला बुद्धिवादी म्हणविणारांनी सुद्धा कायद्याविरुद्ध परंपरेची बाजू घेतली याचाच








अर्थ इथे निधर्मी तत्त्वज्ञानविरोधी शक्ती अतिशय बलवान आहेत.

## वंशश्रेष्ठत्वाची पकड व विभूतिपूजेला धार्मिक स्वरूप

निधर्मी तत्त्वज्ञानाविरुद्ध येथे उभी असलेली दुसरी प्रबळ शक्ति म्हणजे सर्वत्र प्रचलित असलेली वंशश्रेष्ठत्वाची कल्पना होय. धार्मिक, नैतिक व उदात्त विचार, सुसंस्कृत भाषा, ऐहिक जगाचा त्याग करण्यास उद्युक्त करणारी संन्यस्त वृत्ती या सर्व गोष्टी अत्यंत महत्त्वाच्या असून या सर्वांचे उगमस्थान भारतातच आहे ही कल्पना प्रभावी आहे. कोणाचेही तोंड बंद करण्यास "आम्ही आध्यात्मिक वृत्तीचे आहोत तर पाश्चात्त्य लोक ऐहिक गोष्टींच्या मागे लागले आहेत हे वाक्य उपयोगी पडते. निधर्मी-तत्त्वज्ञानाच्या वाटेतील हा युक्तिवाद फारच मोठी अडचण असून भारतीय अॅन्थ्रॉपॉलजीच्या वर्गातील तर ते 'वेदवाक्य" बनले आहे. आध्यात्मिक मूल्ये मानणारे पक्के किंवा भोंदू लोकच भारतीय विचार-सरणीचे नियामक (censor) बनत आहेत. येथे कोठल्याही तऱ्हेच्या विभूतिपूजेतील पूज्यपुरुष हा नेहमी धार्मिक असतो (बोस व हिटलर दोघांनाही अवतारी पुरुष मानण्यात आले होते) नेताजी बोस आपल्या काल्पनिक गणवेषात एखाद्या पौराणिक वीरासारखा वाटतो. पौराणिक कल्पनांच्या पार्श्व-भूमीवर रंगवलेली भारतीय नेत्यांची अनेक चित्रे आढळून येतात. एका चित्रात गांधी आकाशातून स्वतःची चिता पहात आहेत असा देखावा आहे तर काही चित्रातून 'शक्ति' वेषातील भारतमाता नेहरू पटेल यांचेसारख्या सुपुत्रांना आशीर्वाद देत असलेली रंगविली आहे.

वांशिक श्रेष्ठत्वाच्या कल्पनेने भारून गेल्यामुळेच काही अंशी भारताने कम्युनिस्ट चीन विरुद्ध लष्करी तयारी केली नाही. चार हजारवर्षे या दोन राष्ट्रात युद्ध झालेले नाही. वगैरे वगैरे, चीन हे बौद्धराष्ट्र असल्याची अस्पष्ट व अपुऱ्या माहितीवर आधार-लेली कल्पना—कारण ते संपूर्ण बौद्ध कधीच नव्हते—व त्यामुळे तो देश भारताला आपला सांस्कृतिक गुरु मानून त्यावर हल्ला करणार नाही असा समज; चीन हा भारताप्रमाणेच आशियायी देश म्हणून जवळचा— फक्त भौगोलिक दृष्टचाच, वांशिक किंवा सांस्कृतिक नव्हे— व म्हणून भारताची सीमा भंग करण्यास तयार होणार नाही ही सर्व परंपरागत भारतीय विचारसरणीची उदाहरणे आहेत.

## निधर्मी वातावरण निर्माण करण्याचे उपाय

या सर्वांवर एकच उपाय आहे व तो म्हणजे भारतातील विचारवन्त व नेते या दोघांनी मिळून, देशाच्या राजकारणातून व अधिकृत वैचारिक दृष्टि-कोनातून पौराणिक कल्पनांची व गोष्टींची उचल-बांगडी करण्याचा कसून प्रयत्न करणे हा होय. निधर्मी भारतात जनतेचे श्रद्धास्थान एखादे संस्कृत उपपद असलेला, चमत्कार करणारा, किंवा साधू पुरुष न बनता, अवैयक्तिक परंतु कार्यक्षम, 'पॉपर्स ओपन सोसायटीत' चित्रित केलेला शासक किंवहुना शासनच झाले पाहिजे, अशा तऱ्हेची निष्ठाच निधर्मी लोकशाहीत अध्याहृत असते ती गृहीत धर-लेली असते. त्यात भपकेबाजीस किंवा दिखाऊपणास वाव नसतो. त्यात निधर्मी व्यवहारावर व समृद्धीवर लक्ष केंद्रित झालेले असते. अशा तऱ्हेच्या दिखाउ-पणाचा अभाव असलेल्या, कोठल्याही तऱ्हेच्या पौराणिक मूल्यांशी निष्ठावन्त नसलेल्या निधर्मी दृष्टीकोनामुळेच दुसऱ्या महायुद्धात धुळधाण झालेली जपान, जर्मनी व फ्रांन्स सारखी राष्ट्रे पुनः ऊर्जिता-वस्थेत आली.

तरुण पिढीला दिल्याजाणाऱ्या शिक्षणातील मूलभूत तत्त्वांचा फेरविचार केल्याखेरीज खऱ्या अर्थाने कायद्याने नव्हे तर प्रत्यक्षात- निधर्मी तत्त्वाचा प्रसार भारतात होणे कठीण आहे. मितभुक्त, कडक स्नायूंचा ब्रह्मचारी, एखाद्या काल्पनिक शत्रूशी झगडणारा शूर शिपाई किंवा राम वा हनुमान यांचे आदर्श तरुण पिढीच्या डोळ्यासमोर न ठेवता कार्यक्षम शिक्षक, उत्तम शास्त्रज्ञ किंवा बुद्धिमान विचारवन्त हेच त्यांचे आदर्श ठरले पाहिजेत. राजकारणी किंवा मुत्सद्दी पुरुषांचे आदर्श सुद्धा येथे चालणार नाहीत. कारण भारतीय पाठ्य पुस्तकात राजकारणी व मुत्सद्दी म्हणून सम्राट अशोकाचे उदाहरण दिले जाते. परंतु त्याचा सर्व मोठेपणा तो उत्तम प्रशासक होता यात नसून त्याने ऐहिक वैभवाचा त्याग करून बुद्ध धर्म स्वीकारून अध्यात्माचा मार्ग पत्करला यात आहे; हे सर्वांच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न सतत केला जातो.







प्रौढ शिक्षणास सुरवात भारतीय संस्थांच्या व घराच्या भिंतीवरील फोटो बदलण्यापासून करावी लागेल. सिलोन, पूर्व आफ्रिका इत्यादि देशातून प्रवास करीत असता अनेक भारतीयांचे घरातून राजेन्द्रप्रसादांचे फोटो अजूनही आढळले. काही दक्षिण भारतीय कुटुंबे सोडली तर राधाकृष्णन यांचे फोटो आढळले नाहीत. अर्थात हिंदी लोकांच्या देवांच्या प्रभावळीतील कोठलाही देव आपली जागा सोडीत नाही. नवे देव त्या मालिकेत पाहिजे तसे बसवता येतात. हा दृष्टीकोन धार्मिक आहे निधर्मी नव्हे हे सांगावयास नको. राधाकृष्णन राजेंद्रप्रसादाप्रमाणे सन्यस्त वृत्तीचे सत्पुरुष नाहीत. व भारतीय देवतांचे प्रभावळीत शान्तपणे विचार करणारा एखादा विचारवन्त किंवा सचोटीने काम करणारा सज्जन बसू शकत नाही. पण निधर्मी समाज अस्तित्वात यावयाचा असल्यास हे बदलले पाहिजे. गेल्या काही दिवसात पं. नेहरूंचे शेवटचे दिवस व त्यांची शेवटची इच्छा याबद्दल बराच बोलबाला झाला आहे. "माझी राख भारताच्या भूमीत मिसळवून टाका" ही नेहरूंनी, कदाचित संपूर्ण निधर्मी इच्छा दर्शविली होती. पण त्याची अंमलबजावणी अशा रीतीने झाली की पंडितजी हे कर्मठ सनातनी होते असे वाटावे. ते सनातनी होते असे मला मुळीच वाटत नाही. परंतु बहुसंख्य भारतीयांना ते सनातनी हिंदू नव्हते किंवा निधर्मी होते असे म्हणण्यात संकोच वाटतो किंवा त्याचा ते सपशेल इन्कार करतात.

भारतास निधर्मी करावयाचे असेल तर पुढारी म्हणजे अवतारी पुरुष असे मानणे व म्हणणे बंद केले पाहिजे. जातपात, भारतमाता व दैवी अंश या सर्वांशी कोठलाही संबंध न ठेवता सर्व पातळीवरील राज्यकारभार उत्तम रीतीने चालवू शकेल तोच खरा नेता होय असे समजले पाहिजे. नेत्याची ही व्याख्या अतिशय काटेकोर आहे व अनेक पुढारलेल्या देशातील काही नेते तरी या कसोटीस उतरणार नाहीत हे खरे असले तरी वरील सर्व विवेचन भारताबद्दल असल्यामुळे भारताला हे पथ्य पाळलेच पाहिजे. सात्विकतेपेक्षा तर्कशास्त्रास व अद्‌भुत चमत्कार करणारापेक्षा विचारवन्तास जर सर्वत्र प्राधान्य मिळाले तर भविष्यकालात येथे निधर्मी समाजरचना अस्तित्वात येण्याची शक्यता आहे. आणि एकदा विचारवंत व उच्चपदस्थ शासनकर्ते यांना ही गोष्ट पटली म्हणजे ती समाजास शिकविणे, त्याचा प्रचार करणे कठीण जाणार नाही.

---

## लेखकांना विनंति

(१) 'नवभारत' मासिकासाठी पाठवावयाचे लेख कागदाच्या एकाच बाजूवर शाईने सुवाच्य लिहावे.

(२) लेखाची पोंच तात्बडतोब देण्यात येऊन त्यासंबंधी निकाल सामान्यतः एक महिन्यात कळविण्यात येईल. न स्वीकारलेला लेख परत करण्यासाठी अवश्य तो टपालखर्च पाठवावा.

(३) लेखाची मर्यादा सामान्यतः ४००० शब्दांहून अधिक नसावी. अनेक अंकातून लेखांक देण्यापेक्षा विशिष्ट मुद्यावर स्वतंत्र लेख लिहिणे बरे.

(४) आशयाला बाध न आणता लेखाची मर्यादा कमी करण्याचा अधिकार संपादकमंडळाला राहील.

(५) लेखाबद्दल अल्पस्वल्प मोबदला देण्याचे संपादकमंडळाने ठरविले आहे.

(६) अभिप्रायासाठी पाठवावयाच्या पुस्तकांच्या दोन प्रती येणे लवकर अभिप्राय देण्याचे दृष्टीने सोईचे पडते.

(७) लेख, संपादकासाठी इतर काही मजकूर व अभिप्रायासाठी पुस्तके कार्यकारी संपादकांचे पत्त्यावर मुंबईस पाठविणे.








प्रा. प्यारेलाल गोहेल

# पं. नेहरूंचे मृत्युपत्र : देशनिष्ठेच्या दिव्य आदर्शाचे महाकाव्य

## नेहरूंची अंतिम इच्छा *

" भारतीय जनतेने माझ्यावर एवढे अपरंपार प्रेम केले आहे, एवढा जिव्हाळा तिने दाखविला आहे की या प्रेमाची परत फेड अल्पांशानेही करणे केवळ अशक्य आहे. खरे म्हणजे प्रेमासारख्या दिव्य भावनेची परतफेड तरी कशी होणार ? अनेकांचे कौतुक झाले, काही जणांना लोकांनी पूजनीय मानले, पण माझ्या वाट्याला भारताच्या सर्व भागातील, सर्व थरातील जनतेचे जे प्रेम आले त्यामुळे मी भारावून गेलो आहे. माझ्या उरल्या सुरल्या आयुष्यात या जनतेला व तिच्या प्रेमाला मी पात्र ठरो, एवढी एकच आशा मी व्यक्त करतो. माझे अनंत सहकारी व अगणित मित्र यांचे ऋण तर कधीच फिटणार नाही. अनेक महान कार्यात हातात हात घालून कामे केली, ती करीत असताना विजय मिळाला तर विजयाचे किंवा दुःख भोगावे लागले तर त्या दुःखाचेही आम्ही भागीदार झालो होतो.

" मृत्यु नंतर माझ्यासाठी कोणताही धार्मिक विधि केला जाऊ नये, असे मला अगदी मनापासून जाहीर करावयाचे आहे. अशा कर्मकांडावर माझा मुळीच विश्वास नाही. केवळ औपचारिक गोष्ट म्हणून सुद्धा अशा धार्मिक विधींना बळी पडणे म्हणजे एक प्रकारचे ढोंगच ठरेल. त्यामुळे आपली व लोकांचीही फसवणूक होते असे माझे स्पष्ट मत आहे.

" माझ्या निधनानंतर माझ्या देहाचे दहनच करावे. माझा मृत्यु परदेशात झाला तर दहन त्या देशात करून रक्षा मात्र अलाहाबादला पाठवावी. यापैकी मूठभर रक्षा गंगेत विसर्जन करावी आणि उरलेल्या राखेची विल्हेवाट खाली लिहिल्याप्रमाणे करावी. यापैकी चिमूटभरसुद्धा राख राखून ठेऊ नये. माझ्या देहाच्या राखेपैकी मूठभर राख गंगेत टाका असे माझ्या देहापुरते बोलावयाचे तर मी कोणत्याही धार्मिक भावनेने सांगितलेले नाही. अलाहाबाद जवळून वहात जाणाऱ्या गंगा व यमुना नद्यांशी लहानपणापासूनच मी मनाने बांधला गेलो आहे. जसा जसा मी मोठा होत गेलो तसतसे हे बंधनही अधिकाधिक दृढ होत गेले. जसजसे ऋतू बदलत जातात तसतसे गंगा-यमुनांचे रूप आणि वृत्ति बदलत जातात. ही त्यांची बदलती रूपे मी मनात कोरून ठेवली आहेत. अनेक वेळा या रूपाच्या पलीकडे जाऊन या नद्यांची गाणी मी ऐकली आहेत त्यांच्या अनादि प्रवाहाबरोबर वाहत आलेल्या कथांचे मी श्रवण केले आहे. या नद्यांची प्राचीन परम्परा, त्यांचा इतिहास व पुराणातून त्यासंबंधी असलेले उल्लेख यांच्यावर मी कितीतरी विचार केला आहे.

" या नद्या, विशेषतः गंगा ही सर्वार्थाने भारताची नदी आहे. गंगेवर भारतातील जनतेचे अलोट प्रेम आहे. गंगा नदीच्या भोवती भरतवंशाची अनेक संस्मरणे गुंफली आहेत; भारताच्या आशाआकांक्षा, जयपराजय यांची गंगा ही साक्षीदार आहे. भारतमातेच्या विजयाची गाणी तिने ऐकली आणि पराभवाचा आक्रोशही तिने केला आहे. गंगा ही भारताच्या प्राचीनतम संस्कृतीचे व जीवनप्रवाहाचे प्रतीक आहे. जीवनप्रवाह बदलत राहतो, वहात राहतो व त्याचे प्रतीक मात्र गंगाच राहते.

गंगेकडे पाहिले म्हणजे मला हिमालयाच्या बर्फाच्छादित शिखरांची आणि खोल खोल दऱ्यांची आठवण होते, त्याच्यावर मी फार फार प्रेम केले आहे. या हिमशिखरांप्रमाणेच मला गंगा नदीकडे पाहून समृद्ध आणि विस्तीर्ण अशी दुआबातील मैदाने आठवतात. याच प्रदेशात माझे जीवन घडले आहे. जीवनकार्य ठरले आहे.

" सकाळी सूर्यकिरणाच्या कोवळ्या प्रकाशात गंगा कशी हास्यस्मित करीत, नाचत बागडत चाललेली दिसते. पण एकदा का संध्याछायाचे आवरण पडले म्हणजे तिचा प्रवाह कसा खिन्न आणि गूढ भासू लागतो. हिवाळ्यात प्रवाह रोडावतो खरा, पण गंगा कशी मंदगतीने आणि डौलाने वहात जाते ! पावसाळ्यात तिचा प्रचंड प्रवाह घनगर्जना करीत येतो, त्यावेळचे त्याचे रूप म्हणजे भरदार छातीच्या सागराचेच जणु दर्शन, आणि त्या प्रवाहात सागराप्रमाणेच विध्वं-

* अवतरण चिन्हांतील बहुतेक नेहरूंचे उद्गार अत्रेकृत ' सूर्यास्ता'तून.



अनुक्रमणिका







सक्तेचे सुप्त सामर्थ्य ! वर्तमान काळातून वहात वहात भविष्यकाळाच्या महान सागरात एकरूप होणाऱ्या भारताच्या भूतकालाचे गंगा हे मला प्रतीक वाटते, भव्य स्मारक वाटते.

"अनेक जुन्या परम्परा व रूढि मी टाकून दिल्या आहेत. भारतीय जनतेत भेदाभेद उत्पन्न करणाऱ्या अगणित लोकांना दडपून ठेऊन त्यांची भौतिक व अध्यात्मिक उन्नति रोखून धरणाऱ्या सर्व प्रकारच्या बंधनांतून भारत मुक्त झाला पाहिजे; असे मी सांगत आलो आहे. हे सर्व घडावे तसेच मला नेहमी वाटत असले तरी भूतकालाशी पूर्णतः फारकत घ्यावी असे मला कधीच वाटत नाही. आपला महान सांस्कृतिक वारसा हे माझेहि अभिमानाचे निधान आहे. भारताच्या अनंत अशा भूतकालापैकी इतिहासाचा श्रीगणेशा जेथपासून लिहिता येतो तेथपासून ज्ञान भूतकालापासून जी एक अक्षुण्ण व अखंड अशी परंपरा चालत आली आहे; त्या परंपरेचा मी एक दुवा आहे याची जाणीव माझ्या मनात सतत जागती आहे. परंपरेची ही सांखळी मी तोडणार नाही. ही परंपरा म्हणजे माझा अनमोल ठेवा आहे. त्याच्यापासून मी सतत स्फूर्ति घेत आलो आहे.

"माझ्या या सर्व मनीषांचा, भावभावनांचा साक्षीदार असलेल्या माझ्या देहाची थोडी राख म्हणूनच गंगेत पडावी अशी माझी विनंति आहे. भारताच्या सांस्कृतिक परंपरेला माझा तो अखेरचा प्रणिपात आहे. अलाहाबादला गंगेत टाकलेली ही राख आपोआपच सागराला मिळेल, – जो सागर भारतमातेच्या चरणतलांना रोज स्नान घालतो !

"मात्र मूठभर राखेचे गंगेत विसर्जन केल्यावर जी राख उरेल ती विमानातून उंच आकाशात न्यावी आणि उंचावरूनच ती भारतभूमीवर विखरून टाकावी; ज्या ठिकाणी भारतातील शेतकरी काबाडकष्ट करतो त्या शेतातून ती पडावी. तिथल्या मातीत मिसळून जावी, तिथल्या धुळीशी ती एकजीव व्हावी. भारताच्या भूमीचाच तो एक अंश बनावा हीच माझी अखेरची इच्छा आहे."

## कालिदासानंतरचे महाकाव्य

बालपणापासून गर्भ श्रीमंतीत व ऐनतारुण्याच्या उमेदीत लोळत असलेल्या वैभवात राहून, पाश्चात्य शिक्षणाने दीक्षित झालेल्या या राजपुत्राने भारतमातेची ५० वर्षे अहर्निश सेवा करून आपल्या मृत्युपत्रात जी हृदयस्पर्शी काव्यात्मक भावना व्यक्त केली आहे, ती भावना म्हणजे विज्ञानाने लिहिलेले अध्यात्म्यावरचे महाकाव्यच होय. हे भारतपुत्राचे महाकाव्य ज्याप्रमाणे जागतिक मनाला आकर्षित करणारे आहे तसेच भारतीय जीवनपरंपरेच्या मान्यता व विश्वास यांना धक्का देऊन जागतिक समाजजीवनात भारताने कसे वागावे याविषयी दिव्य आदर्श निर्माण करणारे देखील आहे.

– असे हे भव्य, उदात्त परंतु बुद्धि व भावनेचे समन्वयात्मक महाकाव्य नेहरूंनी दहावर्षापूर्वी लिहून ठेवले आहे. या महाकाव्याचे अधिष्ठान जागतिक स्वातंत्र्य असून हजारो वर्षांच्या परंपरेची धूळ फुंकून माणसाच्या स्वतंत्र व्यक्तित्वाची जोपासना करण्याचे आव्हान देणारे आहे. ज्ञान आणि विज्ञान हा मानवाचा नवा धर्म असून त्यांची आराधना मानवी अंतःकरणात नि सामाजिक व्यवहारात झाली पाहिजे हा युगसंदेश नेहरू देऊ इच्छितात. ध्येयवाद आणि व्यवहार यात सुमेळ साधण्याची किमया नेहरूंनी करून दाखविली. नेहरू केवळ मुत्सद्दी नव्हते तर भारतीय विचारपरंपरेतील अध्यात्मिक मूल्यांचा अभ्यास करून आधुनिक विज्ञान युगाशी त्याची सांगड घालण्यासाठी त्यांनी आकाशपाताळ एक केले. भारताचा त्यांनी 'पुनः शोध' लावला. व शतकनुशतके गुलामीत पिचत पडलेल्या देशाला आंतरराष्ट्रीय प्रतिष्ठा व सन्मान प्राप्त करून दिला. हेच त्यांचे ऐतिहासिक कार्य होय. घराण्याने अमीर परंतु देशासाठी फकिरी पत्करून राष्ट्रनिष्ठेचा दिव्य आदर्श त्यांनी आपल्या आचरणाने वारसाच्या रूपाने घालू दिला.

जिवंतपणी जगाने त्यांच्यावर एवढे प्रेम केले त्याची परतफेड त्यांनी आपले जीवन देशसेवेत घालवून केली. मृत्युपत्रातून अभिव्यक्त होणारी हृदयस्पर्शी भावना म्हणजे त्यांच्या संपूर्ण जीवनाचा भारतीय जनमनाविषयी असलेल्या विश्वव्यापी प्रेमाचा साक्षात्कार होय; म्हणूनच महाकाव्याची भव्यता आणि उत्कटतेचे दर्शन त्यांच्या उद्गारातून होते.

## चिरतारुण्यमूर्ति नेहरू

"शरीर उत्तम असेल तरच मनाचा समतोलपणा साधतो. प्रकृति नीट असली म्हणजे मन नेहमी नीट असते असे नव्हे; पण आजारी शरीरात धडधाकट

मन कधीच राहू शकत नाही. मन किंवा शरीर दुखणाइत असेल तर जगण्यात काहीच आनंद नाही. वैद्यकीय व्यवसायावर माझा फारसा विश्वास नाही अर्थात् आजारीपणात किंवा तातडीच्या प्रसंगी डॉक्टराकडे जावे लागते. पण आरोग्याचे प्राथमिक नियम जर आपण समजून घेतले नाहीत आणि त्याप्रमाणे वागलो नाही तर नुसत्या औषधाच्या जोरावर आपला फारसा निभाव लागणार नाही. तुरुंगात झाडण्याचे व कपडे धुण्याचे व बागेत खणण्याचे काम मी मुद्दाम करीत राहतो. बागेत काम करताना मला अतिशय समाधान लाभते. आणि माझे हातही गुंतून राहतात. मन आणि शरीर शक्यतितके धडधाकट ठेवण्याचा मी प्रयत्न करतो. मनाची शरीरावर व शरीराची मनावर एकसारखी प्रतिक्रिया होत राहते त्या उभयतांमध्ये समतोल साधण्याचा माझा प्रयत्न असतो. स्वभावतःच मी उद्योगी आहे म्हणून जेव्हा माझे मन भकास असते तेव्हा काहीतरी उद्योग करीत असतो. बळकट हृदय आणि आनंदी मन हे सुखी आयुष्याचे रहस्य आहे. तुरुंगात जे जे लोक आहेत त्यात माझी प्रकृति उत्तम आहे कारण इतरांपेक्षा मी प्रकृतीची अधिक काळजी घेतो. या बाबतीत मी स्वतःवर अवलंबून असतो. काही अपघात झाला नाही तर माझी प्रकृति अनेक वर्षे अवसानघात करणार नाही असा विश्वास वाटतो. तुरुंगात असताना प्रकृति चांगली ठेवणे ही मी इज्जतीची गोष्ट मानतो. येथे आजारी पडणे अक्षम्य अपराध आहे असे मला वाटते."

वरील उद्गारात नेहरूंच्या चिरतारुण्याचे रहस्य व जीवनाविषयीचा समतोलपणा आजच्या तरुण पिढीस आवश्यक मार्गदर्शन करील. जीवनातील कार्यात श्रमाबरोबर आनंद व कार्यांची उपयुक्तता सिद्ध करण्याचे अजब कसब नेहरूंना अवगत होते. साठी उलटल्यानंतर देखील तरुणांना लाजविणारे चैतन्य प्रकर्षाने त्यांच्यात तळपत होते याचे कारणही ते आहे.

नेहरू, लहान मुलाप्रमाणे संतापी व तापट होते. तरुणांना साजेसा खोडकर व चेष्टेखोर स्वभाव त्यांच्या जीवनप्रसंगातून साकार झालेला दिसून येतो. ते तरुणांचे ताईत होते. नेहरूंचे चिरतारुण्य तरुणांच्या स्फूर्तीचे केन्द्र होते ते याचसाठी.

## जीवनातील रसिकता—

नेहरूंचे संपूर्ण जीवन रसिकतेने भरलेले आहे. आपल्या मृत्युपत्रात निर्जीव मालमत्तेची विल्हेवाट लावणारे रसहीन शब्द नसून भारताने केलेल्या अफाट प्रेमाच्या मोबदल्यात आपल्या देहाचा कणन्‌कण राष्ट्राच्या भूमीशी एकरूप व्हावा अशी उर्मी आहे. राष्ट्राच्या धकाधकीच्या खडतर जीवनात त्यांनी गुलाबाला कोमेजू दिला नाही. विश्वामधील रस, रूप, गंध, स्पर्श आदि अनेक प्रकारची सौंदर्यरूपे जी या पृथ्वीतलावर आहेत त्या सर्वांचा आस्वाद घेण्याचे सात्विक आकर्षण त्यांच्या जीवनात होते. सौंदर्यास्वाद पोटी निर्माण होऊ शकणारी विलासिता त्यांच्या जीवनाला शिवू शकली नाही. राजकीय वैभव व संन्यासाचे वैराग्य हे त्यांच्यामध्ये एकाच वेळी नांदत होते.

गांधीजींच्या वैराग्यपूर्ण जीवनाची रूक्षता व भारतीय दारिद्र्याचा भडकपणा त्यांच्या रसिक वृत्तीत बदल घडवून आणू शकला नाही. नेहरू गरीबांचे कैवारी होते परंतु दारिद्र्याबद्दल भयंकर चीड असल्यामुळेच जणु त्यांच्या अंगी रसिकतेविषयींची आसक्ति विद्यमान होती. स्वातंत्र्यपूर्वकाळात गांधीजींच्या हाकेस ओ देऊन त्यांनी सर्व वैभव लाथाडले व स्वातंत्रसंग्रामाच्या होमकुंडात उडी घेतली. चौदा वर्षांच्या असह्य कारावासात पिचत असताना देखील त्या महापुरुषाच्या अंतःकरणात विश्वाच्या विविध रंगांचे खेळ चालू असत. या रसिक मनोवृत्तिमुळेच राष्ट्राच्या कठीण परिस्थितीत ते डगमगले नाहीत.

भारताचा पंतप्रधान होळीच्या वेळी आपले असामान्यत्व टाकून राष्ट्रमय बनत असे. संगीत, कला, नृत्य, चित्रपट, खेळ, शायरी अशा विषयात रसिकतेने भाग घेण्याची वृत्ति त्यांच्यात उपजतच होती. संस्कृत, उर्दू, इंग्रजी व फ्रेंच भाषेतील सौंदर्यस्थळे ते अचूक टिपून घेत असत. देशात काय अन् परदेशात काय सर्व कार्यक्रम बाजूला सारून ते सांस्कृतिक कार्यक्रमात भाग घेत असत. रसेलला भेटले तसे चार्ली चापलिनलाही. नेहरू आंतरराष्ट्रीय रसिक होते. नागांचा वेष परिधारण करून ते नाचले. कधी महाराष्ट्राचा फेटा तर कधी आदिवासियांचा पिसांचा मुकुट ते धारण करीत. जगाच्या मानव समाजात मिसळून विश्वातील रसांचा








आस्वाद त्यांनी घेतला होता. जीवनाच्या रसिकतेचा परिघ जेवढा मोठा होत जाईल तेवढा मानव विशाल बनत जाईल हे त्यांच्या जीवनावरून स्पष्ट होते. त्यांच्या तुलनेत आम्ही किती संकुचित व मर्यादित आहोत हे देखील स्पष्ट झाल्याशिवाय रहात नाही.

### ध्येयवादावरील निष्ठा

पं. नेहरूंनी जेलमधून इंदिरेच्या वाढ-दिवसानिमित्त लिहिलेल्या एका पत्रात म्हणतात " रशियात लेनिनने क्रान्तीचा प्रारंभ ज्या वर्षी केला त्याच वर्षी तुझा जन्म झाला. राष्ट्राच्या इतिहासात अनेक मोठे व पराक्रमी पुरुष व स्त्रिया होऊन जातात त्यांची स्फूर्तिदायक चरित्रे वाचून आम्हाला असे वाटते की आपणही त्यांचे सारखे व्हावे. जोन-ऑफ-आर्कची कथा वाचल्यानंतर तुलाही नाही का वाटले की आपण जोनच व्हावे म्हणून ? तुझ्या वाढदिवशी मला एकच संदेश तुला द्यावासा वाटतो, तो हा की तू शूर हो ! आपण शूर झाले की आपल्या मनात भयाला यत्किंचितही थारा मिळत नाही. मग कोणतेही लाजिरवाणे कृत्य आपल्या हातून होत नाही. सूर्याशी स्नेह कर. प्रकाशात जीवन जग. काळोखात काहीही करू नकोस. प्रकाशाची कन्या हो. म्हणजे मग मोठेपणी तू भारताची सेवा करणारी शूर सैनिक होशील. "

स्वतंत्र भारताच्या आधुनिक ऋषींने भारतीय तरुणांना दिलेला हा मंत्र संजीवनीचे कार्य केल्याशिवाय रहाणार नाही. अशी शक्ति या उद्गारात आहे. नेहरू आजन्म क्रान्तिकारी होते. स्वातंत्र्यासाठी क्रांति, सर्वांगीण विकासासाठी क्रांति, गुलामराष्ट्रांच्या मुक्तिसाठी क्रांति सत्य-शिव-सुंदरतेच्या आविष्कारासाठी क्रान्तीचे आव्हानच जणु करीत होते. विश्वैक्याचा विकास आणि निर्भय मने तयार करणे हेच त्यांचे जीवनकार्य होते. करोडो भारतीय तरुणांना जणु शूर व्हा, प्रकाशमय बना, सेवापरायण व्हा असा आदेश ते देत होते व स्वतः आचरित होते. ध्येयदृष्टिविषयी ते लिहितात " ज्यांना आयुष्यात काही ध्येय नाही ती समाजवृक्षावर उगवलेली निव्वळ बांडगुळे होत. मी स्वतःच्या ध्येयवादाने इतका व्यग्र झालो आहे की ज्यांच्या आयुष्यामध्ये कसलेही ध्येय नाही त्यांचे जीवन मी समजूच शकत नाही. आयुष्य आधीच थोडे म्हणून ते क्षुद्रपणाने आपण जगू नये. अगदी फाशीच जाण्याचा प्रसंग आला तर दीडशे वर्षापूर्वी फ्रेंच उमराव ज्याप्रमाणे ऐटीत आणि मिजाशीने फाशी गेले त्याप्रमाणे आपणही हंसत हंसत दिमाखाने आपल्या वधस्तंभावर चढावे. "

नेहरूंच्या या उद्गारातून ओथंबणारा ध्येयवाद युवकांच्या जीवनाला व राष्ट्राच्या उन्नतीला शतकानुशतके दीपस्तंभाप्रमाणे मार्गदर्शन करीत राहील यात शंका नाही. आमचे जीवन आज करीत असलेल्या विचाराच्या भिन्न दिशेने चालले आहे. त्यामुळे चांगल्या विचाराचे महत्व कमी झालेले आढळून येते. काही तरी करून चुकण्याची जिद्द आमच्यात उरली नाही. निर्भय समाजाच्या प्रस्थापनेसाठी उक्ति व कृतीत समन्वय साधावयास हवा.

### जागतिक विचारातील सुवर्णमध्य

आंतरराष्ट्रीय विचारांचा व संस्कृतींचा प्रभाव नेहरूंवर अखेरपावेतो होत राहिल्यामुळे त्यांचा पिंड खऱ्या अर्थाने आंतरराष्ट्रीयवादी बनला होता. ते खरे बुद्धिवादी होते. ज्यांच्याजवळ बुद्धि आहे त्याने विचार करायलाच हवा. बौद्धिक शक्तीचा उपयोग न करणे किंवा दुरुपयोग करणे हा अक्षम्य अपराध आहे असे ते मानीत. याच बौद्धिक विचाराच्या प्रक्रियेतून व विश्वसंस्कृतीतील संस्कारांतून त्यांनी मानवी जीवनाचा समतोलपणा कायम ठेवण्याचा प्रयत्न केला. व्यक्तीच्या जीवनात विचार व चिंतनास जसे महत्व आहे तसे ते सामाजिक जीवनातही आहे असा त्यांचा विश्वास होता. या वृत्तीमुळे नेहरू जनतेकडून खूप शिकले. त्यांनी राष्ट्राला समर्पिलेले प्रेम व विचार हा त्याच शिकवणुकीचा परिपाक आहे.

भौतिक, आधिभौतिक किंवा अध्यात्मिक ज्या कोणत्या क्षेत्रात त्यांना घेण्यासारखे होते, ते त्यांनी घेतले. विशाल दिशा, उंच पर्वत किंवा गंभीर सागर त्यांना त्यासाठी अडवू शकला नाही. भारतातील ऐतिहासिक व तत्कालीन विचारवंत तर सोडाच परंतु जगन्मान्य अल्बर्ट आइन्स्टाइन, रसेल, शॉ व त्यांच्यासारखे इतर विचारवंतापासून त्यांनी स्फूर्ति घेतली. नेहरूंच्या व्यक्तित्वात रघुकुलतुल्य गुणसंपत्ति जणु साकार झाली होती. त्यांचे संपूर्ण जीवन पारदर्शक होते. आंतरराष्ट्रीयवादी नेहरू मुत्सद्दी असून रवींद्रनाथांप्रमाणे कविहृदय होते.








प्रा. अ. भि. शहा

# पंडितजींची समाजवादाची कल्पना

जवाहरलाल नेहरू आणि त्यांच्या पातळीवरील इतर नेते यांच्यामध्ये एक महत्त्वाचा फरक असा दिसून येतो की, आर्थिक प्रश्नावर पंडितजींची भूमिका नेमकी काय आहे हे सांगणे फार अवघड असे. गांधी, रूझवेल्ट, चर्चिल, स्टालिन, इत्यादींची मते त्या त्या वेळेपुरती स्पष्ट असावयाची आणि म्हणून त्यांच्या भूमिकेचा, पक्षातील त्यांच्या प्रच्छन्न विरोधकांना किंवा इतरांना स्वतःला अनुकूल असा विपर्यास करणे सहसा जमत नसे. याउलट पंडितजींच्या बाबतीत अनेकदा असे घडत असे की त्यांच्या वेगवेगळ्या विधानातून स्वतःला सोयीचे असेल तेवढे घेऊन काही लोक पंडितजींच्या नावाचा उपयोग करून घेऊ शकत होते. पंडितजींच्या समाजवादाच्या कल्पनेबाबत तर हे नेहमीच व्हावयाचे. कृष्ण मेनन ते मोरारजीभाई पर्यंतच्या सर्व काँग्रेसजनांना पंडितजींचा समाजवाद "मान्य" होता. एवढेच नव्हे तर गेली काही वर्षे कम्युनिस्ट आणि समाजवादी पक्षांच्या पंडितजींवरच्या टीकेचा मुख्य रोख त्यांच्या विचारांवर नसून त्यांच्या सरकारच्या आचारावर होता. याचा अर्थ असा की एकतर काँग्रेस, कम्युनिस्ट आणि समाजवादी या पक्षात समाजवादाच्या आर्थिक स्वरूपाबद्दल एकवाक्यता होती; किंवा या पक्षाचे नेतृत्व बहुंशी अप्रामाणिक, किंवा वैचारिक दृष्ट्या कमकुवत होते. हे विधान थोडे कडक वाटण्याचा संभव आहे. परंतु थोडा विचार केल्यास त्याची यथार्थता दिसून येईल. संपूर्ण राष्ट्रीयीकरण, जड उद्योगांच्या विकासास अग्रक्रम, आणि हुकूमशाही, आर्थिक विषमता[१] व आत्यंतिक आर्थिक शोषण या मार्गाने भांडवलनिर्मिति यांचा पुरस्कार करणारे कम्युनिस्ट; संपूर्ण नसले तरी बऱ्याच मोठ्या प्रमाणावर राष्ट्रीयीकरण, शेती आणि सेव्य पदार्थांचे उत्पादन, आणि लोकशाही स्वातंत्र्य यांचा आग्रह धरणारे समाजवादी; आणि एकाचवेळी महालनवीस आणि विनोबा यांचे मार्गदर्शन घेणारे काँग्रेसजन- या सर्व लोकांना पंडित नेहरू यांची समाजवादाची कल्पना जर मूलतः मान्य असली तर कोठेतरी, कोणाचे तरी चुकत आहे असे म्हणणे भाग आहे. इतकेच नव्हे तर पंडितजींच्या या कल्पनेतसुद्धा कोठेतरी गोंधळ आणि अंतर्विरोध असला पाहिजे असा निष्कर्ष काढावा लागेल. या कारणास्तव पंडित नेहरू यांच्या समाजवादाच्या कल्पनेची चिकित्सा उद्बोधक ठरण्याचा संभव आहे.

## पंडितजींचे व्यक्तिमत्त्व

परंतु हे काम हाती घेण्यापूर्वी एका गोष्टीची दखल घेणे आवश्यक आहे. ही गोष्ट म्हणजे पंडितजींचे व्यक्तिमत्त्व होय. हे व्यक्तिमत्त्व बहुरंगी आणि अंतर्विरोधांनी भरलेले होते. तसेच इतर कोटल्याही नेत्यास लाभली नाही तेवढी लोकप्रियता त्यांना मिळाली होती. मृत्युपूर्वी दीड वर्षापर्यंत केवळ जनतेचाच नव्हे तर बहुसंख्य विचारवंतांचा पंडितजींच्या नेतृत्वावर संपूर्ण विश्वास होता. पंडितजींनी आपले बौद्धिक नेतृत्व इतक्या सहजरीत्या मान्य करवून घेतले होते की काही अपवाद वगळल्यास अनेक विचारवंतांना त्यांचे पायिक म्हणून कार्य करण्यात अभिमान वाटायचा. महात्मा गांधींना सुद्धा अशी सर्वांगीण मान्यता मिळाली नव्हती. बहुजनसमाजाच्या हृदयात गांधींचे व्यक्तिमत्त्व जे स्पंदन निर्माण करू शकत होते ते सुशिक्षित वर्गाच्या बाबतीत झाले नाही. गांधींचे राजकीय नेतृत्व मान्य करूनही त्यांच्याशी वैचारिक किंवा मूल्यांच्या पातळीवरील तादात्म्य साधणे या वर्गास अशक्य होते. मानवेंद्रनाथ रॉय सारख्या धडाडीच्या क्रांतिकारक आणि तर्कनिष्ठ

---

१. कम्युनिझम आर्थिक समतेचा आग्रह धरतो हा समज अज्ञानावर आधारलेला आहे. पहा : A. B. Shah, *The Myths of Communism* in *A New Look at Communism* edited by A. B. Shah, Indian Committee for Cultural Freedom.












विचारवंताच्या बाबतीत हे झाले नाही. पंडितजीच एक असे निघाले की ज्यांच्या व्यक्तिमत्त्वाची मोहिनी समाजातील सर्व वर्गांवर एकसारखी प्रभावी ठरली.

या अद्वितीय यशाचे मूळ अर्थातच पंडितजींच्या बहुरंगी व्यक्तिमत्त्वात शोधले पाहिजे. ते रसिक होते, लेखक होते, आधुनिक मूल्यांचे उपासक होते, पद-दलितांबद्दल मनापासून सहानुभूति बाळगणारे होते, आणि अमाप सत्ता आणि लोकप्रियता मिळाली असून एका अर्थाने एकाकी व सत्तेपासून अलिप्त होते. परंतु हे सर्व गुण रॉय यांच्याठायीसुद्धा होते; त्यांच्यामुळे सत्ता किंवा सर्वमान्य नेतृत्व मिळू शकत नाही. पंडित-जींच्या व्यक्तिमत्त्वाचा विशेष असा होता की त्यात वर उल्लेख केलेल्या गुणांबरोबर, भारतीय मनाची पकड घेणारे इतरही काही गुण होते. उदाहरणार्थ, व्यक्ति-स्वातंत्र्य आणि लोकशाही यांचा पुरस्कार करणारे पंडितजी वृत्तीने बादशहा होते, विज्ञानाधिष्ठित बुद्धिवादाचे महत्त्व मान्य करीत असूनही ते अने-कदा आणीबाणीच्या वेळी श्रद्धा किंवा भावना यांच्या आहारी जात असत. बहुजनसमाजाच्या प्रेमामधून शक्ति आणि स्फूर्ति मिळविणारे पंडितजी सर्वसामान्य नागरिकाशी कधीही एकरूप होऊ शकले नाहीत; एवढेच नव्हे तर ते आणि त्यांचे निकटवर्ती सहकारी यांच्यामध्येही शेवटपर्यंत एक दरी राहिली. रेखीव-पणाचे चाहते अ लेले पंडितजी भारताच्या राष्ट्रीय जीवनात विलक्षण वैचारिक वेंधळेपणा आणि परस्पर-विरोधी प्रवृत्ती यांचे स्फूर्तिदैवत म्हणून वागत राहिले. उदाहरणार्थ, धर्माधिष्ठित भोळ्या समजुतींवर कोरडे ओढीत असताना पंडितजी आपल्या बहिणीस नवजात नातवाची कुंडली उत्तम ज्योतिषाकडून करवून घेण्याचा सल्ला देऊ शकत होते, आणि आधुनिक लोकशाही समाजवादाची कल्पना विशद करून सांगताना वेदान्ती तत्त्वज्ञानाचाही सकौतुक उल्लेख करू शकत होते.

पंडितजींच्या व्यक्तिमत्त्वात असे अनेक अंतर्विरोध होते. प्रत्येक वर्गास त्यात स्वतःचा आदर्श अंशतः का असेना परंतु प्रतिबिंबित झालेला दिसत असे, आणि म्हणून दोष उपेक्षणीय वाटत होते. त्यांच्याशी महत्त्वाच्या प्रश्नावर तीव्र मतभेद असणाऱ्या विचारवंतांनासुद्धा ते आपल्यातले वाटत असत, कारण या टीका-कारांची भाषा त्यांना समजत होती. त्यांच्यामुळे सत्तेच्या राजकारणालाही एक शान आली आणि स्वातंत्र्योत्तर नाजुक काळात भारतास राजकीय स्थैर्य लाभण्यास साहाय्य झाले.

## मूल्ये व धोरण

परंतु त्याचबरोबर पंडितजींच्या व्यक्तिमत्त्वामुळे देशापुढील काही महत्त्वाच्या प्रश्नांचे स्वरूप स्पष्ट होण्यास अडथळा आला हे तितकेच खरे आहे. विशेषतः परराष्ट्रधोरण आणि आर्थिक नियोजन या दोन्ही प्रश्नांवर त्यांनी घेतलेल्या भूमिका इतक्या चुकीच्या ठरल्या की त्याना प्रिय असलेल्या स्वातंत्र्य, शांति आणि समृद्धीवर आधारलेली समता या तिन्ही मूल्यांना धोका निर्माण झाला. शेवटी शेवटी हे पंडितजींच्या लक्षात येऊ लागले होते असे समजण्यास जागा आहे. चिनी हल्ल्याच्या पाचव्या दिवशी राज्य-सरकारांच्या माहितीमंत्र्यांच्या सभेत बोलताना, सम-कालीन जगाबद्दल आपला समज साफ चूक ठरल्याचे त्यांनी मोकळेपणाने कबूल केले. त्याच सुमारास नियो-जनाबद्दल बोलताना त्यांनी मोठमोठ्या प्रकल्पांमागे लागण्याच्या वृत्तीवर टीका केली. भारतीय समा-जाचे सामाजिक आणि सांस्कृतिक नव्हे तर केवळ आर्थिक आधुनिकीकरण व्हावयाचे असेल तरी त्या प्रक्रियेत शिक्षणास फार मोठा भाग आहे हे त्यांनी ओळ-खले होते. स्टालिनोत्तर काळात कम्युनिस्ट जगात घड-लेल्या घटनांवरून त्यांची लोकशाही मार्गावरील श्रद्धा बलवत्तर झाली. याचा परिणाम त्यांच्या समाज-वादाच्या कल्पनेवरही झाला असल्यास नवल नाही. कारण, समाजवादी निष्ठा बाळगणारे अनेक राजकीय पुढारी आणि विद्यापीठीय अर्थशास्त्रज्ञ यांच्यापेक्षा पंडितजींची भूमिका अधिक व्यापक आणि लवचिक होती. हे लक्षात घेतले की संयुक्त सहकारी शेती-सारख्या गोष्टींचा त्यांनी का आग्रह धरला नाही हे समजण्यास मदत होते.

याचा अर्थ असा नव्हे की पंडितजींची समाज-वादाची कल्पना पुरेशी स्पष्ट होती. स्पष्टता होती, परंतु ती मूल्यांच्या बाबतीत आणि ती साध्य करण्यास अवलंब करण्याच्या साधनांच्या बाबतीत. म्हणून पंडित-जींच्या विचारांची मांडणी किंवा त्यांचे विश्लेषण कर-ताना एक गोष्ट लक्षात ठेवणे आवश्यक आहे. ती अशी की, धोरण आणि मूल्य ( किंवा कार्यपद्धति ) यांच्यामध्ये

विरोध दिसून आला तर मूल्यांच्या अबाधितत्वासाठी धोरणात बदल करण्याची त्यांची तयारी असे. काही वेळा उघडपणे तर काही वेळा गाजावाजा न करता, परंतु नेहमी असा बदल होत असे. संयुक्त सहकारी शेतीचे उदाहरण वर दिलेच आहे. दुसरे उदाहरण लष्करी साहाय्य घेण्याबद्दलच्या धोरणाचे देता येईल. १९६२ च्या सप्टेंबर पर्यंत याबाबत पंडितजींची भूमिका अशी होती की असे साहाय्य घेणे अलिप्ततावाद आणि राष्ट्रीय स्वातंत्र्य यास घातक ठरेल. चीनने आक्रमण चढविल्यानंतर या भूमिकेत जो बदल घडून आला तो सुविदित आहे. समाजवादावर पंडितजींनी केलेल्या विधानांचा विचार करताना त्यांची ही वृत्ति लक्षात ठेवली नाही तर त्यांच्या नावावर अनेक परस्परविरोधी कल्पना विकल्या जाण्याचा संभव आहे. आप्तवाक्य प्रमाण मानण्याची परंपरा असलेल्या समाजात, तशीच परंपरा असलेल्या कम्युनिस्टांना याचा फायदा उठविणे विशेष सोपे आहे. शास्त्रीसरकारविरुद्ध आलेल्या अविश्वासाच्या ठरावावर कम्युनिस्टांनी केलेल्या भाषणात याचे प्रत्यंतरही आले आहे.

## दोन विस्तृत स्पष्टीकरणे

समाजवादावर पंडितजींनी केलेली दोन विस्तृत स्पष्टीकरणे या दृष्टीने बारकाईने पाहणे योग्य ठरेल. पहिले अखिल भारतीय काँग्रेस कमिटीतर्फे प्रसिद्ध होत असणाऱ्या इकॉनॉमिक रिव्हयु ( Economic Review ) या नियतकालिकाच्या १५ ऑगस्ट १९५८ च्या अंकात **मूलभूत धोरण** ( The Basic Approch ) या शीर्षकाखाली प्रसिद्ध झाले आहे. दुसरे त्यांच्या नावाखाली किंवा त्यांच्या भाषेत प्रसिद्ध झाले नसले तरी त्यांच्या संपूर्ण संमतीने झाले असावे असे समजण्यास हरकत नाही. हे स्पष्टीकरण म्हणजे भुवनेश्वरच्या बैठकीत जानेवारी १९६४ मध्ये काँग्रेसच्या साधारण सभेत मंजूर झालेला **लोकशाही आणि समाजवाद** ( Democracy and Socialism ) ठराव हे होय. या स्पष्टीकरणांचा उल्लेख पुढे ' B. A. ' आणि ' C & D ' असा केला जाईल. त्यातील उद्धृत केलेल्या वाक्यांचा अक्षरशः अनुवाद देण्याचा प्रयत्न न करता आशयास बाध येणार नाही एवढी काळजी घेऊन त्यांचा स्वैर अनुवाद दिला आहे. मूळ इंग्रजी वाक्ये तळटीपात दिली आहेत.

पंडितजींच्या समाजवादाच्या कल्पनेत व्यक्ति केंद्रस्थानी आहे. तिच्या विकासास आवश्यक असलेली आर्थिक, सामाजिक आणि सांस्कृतिक परिस्थिति निर्माण करण्यास, विशेषतः भारतासारख्या मागासलेल्या आणि अविकसित राष्ट्रात, भांडवलशाही असमर्थ आहे आणि म्हणून आपल्यास समाजवादी मार्गाने गेल्याशिवाय गत्यंतर नाही. परंतु समाजवादही एक साधन आहे आणि त्याचा उपयोग लोकशाही मार्गाने, जनतेच्या संमतीने व सहकाराने करावयाचा आहे. दुसरे असे की हा समाजवाद कोठल्याही पोथीबंद तत्त्वावर उभारावयाचा नाही. त्याचे उद्दिष्ट संधींची समानता, सामाजिक न्याय, समृद्धीवर आधारलेली आर्थिक समता, वैज्ञानिक दृष्टिकोण आणि नैतिक व आध्यात्मिक मूल्यांची जोपासना व त्यांचा विकास याकरिता अनुकूल परिस्थिति निर्माण करणे हे होय. केवळ भौतिक भरभराटीने मनुष्यजीवनास अर्थ प्राप्त होत नाही. त्याचबरोबर जोपर्यंत सर्वसामान्य नागरिक दारिद्र्य आणि आर्थिक अशाश्वती यापासून मुक्त होत नाहीत तोपर्यंत त्याला स्वतःचा विकास करून घेणे अशक्य आहे. भारताची लोकसंख्या आणि त्या मानाने मर्यादित असलेली साधनसामुग्री लक्षात घेता दारिद्र्याचा प्रश्न नियोजनाचा अवलंब केल्याशिवाय सुटणार नाही. हे नियोजन शासनाने केले पाहिजे, हे उघड आहे नियोजनाबरोबर उत्पादनाचे न्याय्य वाटप होईल हे पाहणेही शासनाचे कर्तव्य ठरते. या सर्व गोष्टी लक्षात घेतल्या तर अर्थव्यवस्थेतील शासकीय विभाग मोठा आणि निर्णायक स्वरूपाचा असावयास पाहिजे, हे स्पष्ट होईल.

परंतु समाजवादाचा स्वीकार केल्याने लगेच दारिद्र्याचे समृद्धीत रूपांतर होईल असे समजणे चूक ठरेल. त्याकरिता खूप श्रम करावे लागतील. तसेच व्यक्तीच्या प्रतिष्ठेस घातक अशा सामाजिक संस्था– उदाहरणार्थ, जातिसंस्था– आणि बुरसटलेले विचार याचे निर्मूलन करून आधुनिक मूल्ये व वैज्ञानिक दृष्टिकोन यांची स्थापना केली पाहिजे. म्हणजे पंडितजींना अभिप्रेत असलेला समाजवाद व्यक्तीची प्रतिष्ठा आणि तिचे स्वातंत्र्य, समृद्धि, समता, आणि








आधुनिक ज्ञान व मूल्ये यावर आधारलेला होता. त्याची साधने तितकीच पवित्र असावयास पाहिजेत असा त्यांचा आग्रह होता. विशेषतः कम्युनिझमचे पोथीबंद तत्त्वज्ञान आणि हिंसेचा किंवा हुकूमशाहीचा मार्ग त्यांना नामंजुर होता, कारण की कम्युनिस्टांच्या बाबतीत हे सिद्ध झाले आहे की साधनाऱ्यांमुळे साध्यही विकृत होऊन जाते. तसेच मार्क्सने मांडलेले सिद्धांत जुनाट झाले आहेत आणि आज त्यांना चिकटून बसणे म्हणजे गेल्या शंभर वर्षात मनुष्यजातीने मिळविलेल्या ज्ञानाचा आणि अनुभवाचा उपमर्द करण्यासारखे होईल.

ही झाली पंडितजींची समाजवादाबद्दलची तात्त्विक भूमिका. वर उल्लेख केलेल्या १९५८ च्या लेखात ही भूमिका स्पष्ट भाषेत व्यक्त करणारी अनेक विधाने आहेत. उदाहरणार्थ, ' आपण हे विसरू नये की मानव हा मूलभूत घटक आहे: व्यक्तीचा विकास साधणे व विषमता कमी करणे हे आपले ध्येय होय; तसेच जीवनाला अर्थ प्राप्त करून देणारीं व सुसंस्कृत समाजाचा अंतिम पाया म्हणून असणारी जीवनाची नैतिक व आध्यात्मिक अंगेही आपण विसरता कामा नये. '[2] ही उद्दिष्टे साध्य करण्याचे समाजवादी अर्थव्यवस्था एक साधन आहे, ती स्वतः काही साध्य नाही.[3] ' परंतु समाजवाद म्हणजे काय ? या प्रश्नाचे काटेकोर उत्तर देणे अवघड आहे ... ...मूलतः समाजवाद म्हणजे भांडवलशाहीपेक्षा वेगळा असा एक मार्ग आहे. परंतु मला वाटते की समाजवाद आणि भांडवलशाही या दोन्ही मधले अंतर हळुहळु कमी होत जात आहे. कारण की समाजवादाच्या अनेक कल्पना क्रमशः भांडवलशाहीत आत्मसात होऊ लागल्या आहेत. .....शेवटी समाजवाद म्हणजे सामाजिक आणि आर्थिक प्रश्नांकडे पाहण्याची एक वैज्ञानिक दृष्टि आहे. मागासलेल्या आणि अविकसित देशात समाजवाद स्वीकारल्याने त्याचे मागासलेपण काही एकदम कमी होत नाही. वस्तुतः अशा परिस्थितीत दारिद्र्यग्रस्त आणि मागासलेला समाजवाद आपणास पाहावयास मिळेल.'[4] दुसऱ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे ' समाजवादाचा स्वीकार केल्याने जादूची कांडी फिरविल्यासारखे दारिद्र्याचे लगेच सुबत्तेत रूपांतर होणार नाही. श्रम करणे, राष्ट्राची उत्पादनक्षमता वाढविणे, न्याय्य वितरण करण्याची व्यवस्था करणे हा एकच मार्ग आपल्याला

---

2. ' ...... We should not forget the basic human element and the fact that our objective is individual improvement and the lessening of inequalities, and we must not forget the ethical and spiritual aspects of life which are ultimately the basis of culture and civilization and which have given some meaning to life ( B. A. ).

3. ' Democracy and Socialism are means to an end, not the end itself. ' ( B. A. ).

4. ' But what is Socialism ? It is difficult to give a precise answer. Socialism is a basically a different approach from that of capitalism, though I think it is true that the wide gap between them tends to lessen because many of the ideas of socialism are gradually incorporated even in the capitalist structure. Socialism is ... ... a certain scientific approach to social and economic problems. If socialism is introduced in a backward and underdeveloped country, it does not suddenly make it any less backward. In fact, we then have a backward and poverty-stricken socialism. ' ( B. A. )








उपलब्ध आहे.'[5] ही एक दीर्घकालीन प्रक्रिया आहे आणि म्हणून नियोजन स्वीकारणे आवश्यक आहे.

### नियोजनाची तत्त्वे

या नियोजनाची मार्गदर्शक तत्त्वे भुवनेश्वर ठरावाच्या सहाव्या परिच्छेदात सांगितली आहेतः 'आर्थिक समृद्धि, संधिसमानता, आणि शोषण व विशेष हक्क यांचे निर्मूलन हे नियोजनाचे उद्दिष्ट होय. हे उद्दिष्ट शांततामयमार्गाने, लोकांच्या संमतीने, भारताच्या संविधानात प्रतिष्ठित केलेली लोकशाही मूल्ये आणि कार्यपद्धती यांचे संरक्षण आणि वर्धन करून साध्य करावयाचे आहे. ... म्हणजे लोकशाही, व्यक्तीची प्रतिष्ठा आणि सामाजिक न्याय या तत्त्वावर आधारलेला लोकशाही समाजवाद असे काँग्रेसच्या विचारसरणीचे थोडक्यात वर्णन करता येईल.'[6]

लोकशाही समाजवादाचे हे तत्त्वज्ञान साधन आणि मूल्ये या दोन्ही बाबतीत कम्यूनिझमपेक्षा वेगळे आहे. सोव्हिएट युनियनने अनेक क्षेत्रात मिळविलेल्या यशाचे कौतुक करूनही पंडितजींना कम्युनिझमचा मार्ग पसंत नाही हे त्यांनी स्पष्ट केले आहे. त्यांच्या मते 'कम्युनिझमचे यश वरवरचे आहे, आणि शेवटी ते फोल ठरते. एकतर त्यात लवचिकपणा नाही. दुसरे, अधिक महत्त्वाचे कारण असे की कम्युनिझम मनुष्य स्वभावाच्या काही मूलभूत गरजांकडे दुर्लक्ष करतो. भांडवलशाहीतल्या अंतर्विरोधाबद्दल कम्युनिस्ट साहित्यामध्ये आपण बरेच वाचतो, आणि त्यात तथ्यही आहे. परंतु कम्युनिझमच्या जड साच्यात सुद्धा वाढते अंतर्विरोध आपणास दिसू लागले आहेत. व्यक्तिस्वातंत्र्याची कम्युनिझम गळचेपी करतो आणि त्यातून फार प्रभावी प्रतिक्रिया निर्माण होत असतात. आपण ज्यास जीवनाची नैतिक आणि आध्यात्मिक बाजू म्हणू तिच्याबद्दल कम्युनिझम तिरस्कार बाळगतो. यात मनुष्याच्या व्यक्तिमत्त्वात मूलभूत असलेल्या कशाची तरी उपेक्षा होत आहे. एवढेच नव्हे तर मनुष्याच्या वागणुकीस कोठलेही निकष आणि मूल्ये उरत नाहीत. हिंसेशी त्याचा असलेला संबंध माणसात एका अमंगल प्रवृत्तीस प्रोत्साहन देत असतो.'[7] परंतु हिंसक मार्गांना पंडितजींचा विरोध केवळ नैतिक नव्हता; तो तितकाच आधुनिक युगाच्या

---

5. 'It is not by some magic adoption of socialist or capitalist method that poverty suddenly leads to riches. The only way is through hard work and increasing the productivity of the nation and organizing an equitable distribution of its products. It is a lengthy and difficult process.' (B. A.).

6. 'The object is to attain an economy of abundance ...... Everyone should have equal opportunity and just share in the fruits of progress. Privilege, disparities and exploitation should be eliminated. This change has to be achieved by peaceful means and with the consent of the people, while preserving and fostering the democratic methods and values as enshrined in the constitution of India. The Congress ideology may thus be summed up as democratic socialism based on democracy, dignity of the humau individual, and social justice.' (C & D.).

7. 'But in spite of its apparent success, it fails; partly because of its rigidity, but even more so, because it ignores certain essential needs of human nature. There is much talk in communism of the contradictions of capitalist society, and there is truth in that analysis. But we see the growing contradictions within the rigid framework of communism itself. Its suppression of individual freedom brings about powerful reactions. Its contempt for what

निदानावर आधारलेला होता. आधुनिक जग एक अशा टप्प्याला येऊन पोहोचले आहे की कोठल्याही मोठ्या समाजावर सक्तीने कोणतीही विचारसरणी लादण्याचा प्रयत्न शेवटी निष्फळ ठरणार हे निश्चित आहे. उलट, आजच्या परिस्थितीत त्यातून युद्ध आणि महाविनाश एवढेच निष्पन्न होईल. याच संदर्भात हंगेरीचे उदाहरण देऊन ते पुढे सांगतात की 'हंगेरीत (१९५६ मध्ये) घडले ते कम्युनिझम आणि कम्युनिझमविरोधी शक्ती यांच्यामधला संघर्ष अशा स्वरूपाचे नव्हते. त्याचे स्वरूप परकीय नियंत्रणापासून मुक्ति मिळवू पाहणाऱ्या राष्ट्रवादाच्या आविष्काराचे[८] होते."

## निर्दोष कल्पना पण प्रत्यक्षात ...

पंडितजींची समाजवादाची कल्पना तात्त्विक दृष्ट्या निर्दोष होती असे वरील विवेचनाच्या आधारे म्हणता येईल. लोकशाही, व्यक्तीची प्रतिष्ठा आणि सामाजिक न्याय या तत्त्वांवर आधारलेला लोकशाही समाजवाद आणि समृद्ध अर्थव्यवस्था अस्तित्वात आणणे हे भारतीय नियोजनाचे उद्दिष्ट म्हणून पंडितजींना आणि त्यांच्या पक्षाला मान्य असले तर इतर लोकशाही समाजवाद्यांचा त्यांच्याशी नियोजनाच्या तपशीलावरच मतभेद शक्य आहे. उदाहरणार्थ, नियोजनाच्या वेगवेगळ्या टप्प्यात, विशेषतः सुरुवातीच्या काही वर्षांत, अग्रक्रमां- ( Priorities )चे स्वरूप कोणते असावयास पाहिजे ? एकूण अर्थव्यवस्थेत शासकीय विभागाचे स्थान काय राहिले पाहिजे ? मोठ्या प्रमाणावर भांडवलनिर्मितीची गरज आणि न्याय्य वाटपाची बहुसंख्य लोकांची अपेक्षा, यामध्ये समतोल कसा साधावयाचा ? हे व इतर तत्सम प्रश्न तात्त्विक दृष्टीने तपशीलाचे वाटले तरी ते कसे सोडविले जातात यावरून सर्वसामान्य नागरिक तात्त्विक भूमिकेची सार्थासार्थता ठरवीत असतो. मला वाटते की या बाबतीत अर्थशास्त्रज्ञ आणि इतर तज्ञमंडळी यांनी पंडितजींची दिशाभूल केली. येथे तपशीलात जाण्याची गरज नाही, परंतु दोन गोष्टींचा उल्लेख करणे आवश्यक आहे. एक अशी की भारतासारख्या शेतीप्रधान आणि मर्यादित साधनसामुग्री असलेल्या देशात कोणत्याही सरकारने शेतीकडे दुर्लक्ष करणे अक्षम्य ठरले असते. पंडितजींना जो समाजवाद अभिप्रेत होता त्याच्या संदर्भात तर शेतीच्या विकासास पहिला क्रमांक देणे आवश्यक होते. दुर्दैवाने पंडितजींना जे सल्लागार लाभले त्यांत बरेचसे पुस्तकी स्वप्नाळूपणात रमणारे किंवा कम्युनिस्ट नियोजनपद्धतीचे प्रशंसक असे होते. पंडितजी स्वतः अर्थशास्त्राचे अभ्यासू नव्हते व म्हणून, त्यांनी एकेठिकाणी म्हटल्यानुसार, बहुसंख्य अर्थशास्त्रीय सल्लागारांच्या म्हणण्यानुसार ते आपले धोरण ठरवीत गेले. म्हणून दुसरी पंचवार्षिक योजना क्रमवारीच्या दृष्टीने कम्युनिस्ट स्वरूपाच्या योजनेसारखी झाली. परंतु हे करीत असताना पंडितजींची लोकशाहीवरील श्रद्धा त्या तज्ञांनी लक्षात घेतली नाही. आता मौज अशी आहे की कम्युनिस्ट स्वरूपाची योजना कम्युनिस्टांच्या कार्यपद्धतीनेच 'यशस्वी' करता येते. तशी कार्यपद्धति स्वीकारली नाही तर नियोजनामुळे दुर्दम्य असे नवीनच ताण निर्माण होतात आणि नियोजनाची कल्पनाच धोक्यात येते. तिसऱ्या योजनेत हीच स्थिती कायम राहिली आणि म्हणूनच स्वतंत्र पक्षास इतके यश मिळाले.

## शासकीय विभागाची व्याप्ती

दुसरा प्रश्न शासकीय विभागाच्या आकाराचा होय. येथेही नियोजनाच्या शासनमान्य कल्पनेवर मतभेद

---

might be called the moral and spiritual side of life not only ignores something that is basic in man, but also deprives human behaviour of standards and values. Its unfortunate association with violence encourages a certain evil tendency in human beings. ' ( B. A. ).

8. ' What happened in Hungary was not essentially a conflict between communism and anti-communism. It represented nationalism striving for freedom from foreign control. ' ( B. A. ).

होऊ शकतो. कोठल्याही समाजात शासकीय विभाग एकूण अर्थव्यवस्थेच्या प्रमाणात फार मोठा असला तर व्यक्तिस्वातंत्र्यासच नव्हे तर उत्पादनक्षमतेसही बाध येत असतो. शासकीय आणि खाजगी विभाग यांच्या-मध्ये स्पर्धा असली तर हा धोका थोडातरी मर्यादेत राहण्याचा संभव आहे. ( पोलादाच्या बाबतीत आपल्याकडे तेही झालेले नाही. ) परंतु शासनाची जर मक्तेदारी झाली तर आर्थिक मक्तेदारीत राजकीय सत्तेच्या मक्तेदारीची भर पडून अनेक दृष्टीने अनर्थ माजणे अपरिहार्य होऊन बसते. अविकसित राष्ट्रात हा धोका विशेष असतो. कारण की सुशिक्षित मध्यमवर्गाचा बराच भाग सरकारी नोकरीत असल्यामुळे लोकमत आणि लोकशाही संकेत दुबळे राहतात. लोकशाहीवर आधारलेला समाजवाद आणावयाचा असेल तर हा मार्ग स्वीकारून चालणार नाही. परंतु येथेही पंडितजींची दिशाभल झाली असे म्हणावे लागेल.

पंडितजींनी पुरस्कृत केलेल्या नियोजनपद्धतींचे असे अनेक दोष दाखविता येतील. परंतु ते येथे महत्त्वाचे नाही, कारण त्यानी कधी सर्वज्ञपणाचा दावा केला नाही. उलट अनेकदा ते संशयग्रस्त मनःस्थितीत सांपडत होते, आणि म्हणूनच की काय, त्यांचा भर नेहमी पोथीबंद तत्त्वज्ञानापेक्षा अनुभव आणि स्वतंत्र विचारांवर आणि विशिष्ट कार्यक्रमापेक्षा कार्यपद्धतीवर असायचा. ज्या मूल्यांमुळे या कार्यपद्धतीस पावित्र्य लाभत असते ती मूल्ये त्यांनी निःसंदिग्ध भाषेत सांगितली आहेत. त्यांच्या बहुरंगी आणि अंतर्विरोधी व्यक्तिमत्त्वाचा गाभा या मूल्यनिष्ठेत सापडतो. त्या निष्ठेचे जतन करणे आणि त्या मूल्यांची साधना अविरतपणे चालू ठेवणे, हीच पंडितजींच्या स्मृतीस स्वातंत्र्यप्रेमी व्यक्ति अर्पू शकणारी सर्वोत्कृष्ट आदरांजलि होय.

---





अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ले. समीक्षक

# काश्मीर प्रश्न

पंडित जवाहरलाल नेहरूंच्या सतरा वर्षांच्या कारकीर्दीत सतत सतावणारा प्रश्न म्हणजे काश्मीर प्रश्न होय. विशेषतः गेली दहा वर्षे "हा प्रश्न मुळी आता शिल्लकच नाही. तो कधीच कायमचा निकालात निघाला आहे" या भूमिकेपासून, "तो कायमचा तर राहोच, पण अजून मुळीच सुटलेला नाही; तेथील जनतेचे योग्य परिस्थितीत सार्वमत हाच तो सोडवण्याचा मार्ग होय" या भूमिकेपर्यंत त्याविषयी विविध प्रकारचे मतप्रदर्शन होत आहे. भारत व पाकिस्तान या प्रत्यक्ष संबंध असलेल्या राष्ट्रात व त्यातील जनमतात त्याविषयी पुष्कळच ताठरपणा आहे. सर्वराष्ट्रसंघटना व इंग्लंड, अमेरिका, सोविएट रशिया, चीन इ. राष्ट्रे ही सुद्धा त्यात पडली आहेत. शस्त्रसंधीमुळे काश्मीरमध्ये आज प्रत्यक्ष युद्ध नाही हे खरे. परंतु त्याबरोबरच आहे ही "जैसे थे" परिस्थिती कितपत कायम राहू शकेल हा एक प्रश्नच आहे. किंबहुना ती तशीच कायम राखण्याचा प्रयत्न करणे हे अनेक दृष्टींनी धोक्याचे आहे. ही जाणीव निर्माण झाल्याकारणाने राजगोपालाचारी, जयप्रकाश नारायण इ. नेते त्यासंबंधी पुनः विचार करण्याची वेळ आली आहे, असे म्हणू लागले आहेत.

## थोडासा पूर्वेतिहास

दि. १४ ऑगस्ट १९४७ रोजी ब्रिटिश सम्राटाच्या वर्चस्वापासून ५६२ संस्थाने मुक्त झाली. यात जम्मू व काश्मीर यांचाही अंतर्भाव होतो. ब्रिटिश सरकारची 'पॅरामाऊंट' सत्ता नाहीशी झाली. या संबंधामुळे संस्थानांचे अधिकार नष्ट झाले; व ब्रिटिश सरकारकडे त्यांनी सुपूर्द केलेले सर्व अधिकार त्यांना पुनः प्राप्त झाले. याचाच अर्थ असा की भारत किंवा पाकिस्तान यापैकी कोणत्या राज्यात सामील व्हायचे की स्वतंत्र राहायचे याविषयीचे निर्णय घेण्यास संस्थाने स्वतंत्र झाली. "तांत्रिक वा कायदेशीर दृष्टीने हे बरोबर असले तरी प्रत्यक्ष व्यवहारात निर्णायक भौगोलिक घटक व आपल्या प्रजेचे हित यांचा त्यांना विचार करावाच लागेल," असे लॉर्ड माऊंटबॅटन म्हणाले, "संस्थाने कायद्याने पूर्ण स्वतंत्र झाली आहेत," या भूमिकेचा जिनांनी पुरस्कार केला. उलट, "असे निर्णय घेताना संस्थानिकांनी आपल्या प्रजेचे मत ध्यानात घेतलेच पाहिजे" अशी भूमिका काँग्रेसने घेतली. याच संदर्भात आरंभी जोधपूर व जुनागड प्रकरणे उद्भवली. आणि तेथील जनमनाचा कौल ध्यानात घेता ती भारतातच सामील होणे इष्ट असा आग्रह धरून त्याचा अंमलही करण्यात आला. जुनागडमध्ये १९४८ साली घेण्यात आलेल्या सार्वमतात भारतात विलीन होण्याला जवळजवळ एकमुखाने पाठिंबा मिळाला.

जम्मू व काश्मीरच्या बाबतीत कोणत्या राज्यात सामील व्हायचे हा निर्णय काश्मीरचे महाराज व तेथील प्रजा यांनीच घ्यायचा आहे असा निर्वाळा सरदार पटेल, लॉर्ड माऊंटबॅटन व खुद्द गांधीजी यांनी दिला होता. सप्टेंबर १९४७ मध्ये शेख अब्दुल्ला यांची तुरुंगातून सुटका झाली आणि त्यांनी "भारत वा पाकिस्तान यातील कोणत्याही राज्यात विलीन होण्याचे ठरविताना चाळीस लाख काश्मीरी जनतेचे मत डावलल्यास त्याचे अनिष्ट परिणाम झाल्यावाचून राहणार नाहीत," असा स्पष्ट इषारा दिला.

## आक्रमण, मदत व विलिनीकरण

याच सुमारास पुंच खोऱ्यात काश्मीर महाराजांविरुद्ध स्थानिक बंडाळी सुरू झाली. जातीय भावनेपासून सर्वस्वी अलिप्त असलेल्या काश्मीरमध्ये निर्वासितांच्या हालचालींमुळे जातीय दंगेधोपे सुरू झाले. आणि पाकिस्तानच्या प्रोत्साहनाने व पाठिंब्याने सशस्त्र टोळ्या काश्मीरमध्ये शिरल्या व त्यांनी लूटमार करावयास आरंभ केला. आणि २४ ऑक्टोबर १९४७ रोजी काश्मीर महाराजांनी भारताकडे मदत मागितली.

काश्मीर हे तांत्रिक दृष्ट्या स्वतंत्र राज्य असल्यामुळे हा मदतीचा प्रश्न गुंतागुंतीचा होता. भारतात विलीन होण्याचा निर्णय झाल्यावाचून भारताने त्याबाबतीत काहीही करणे कठीण होते. महाराजाने हा तात्पुरता निर्णय घ्यावा, त्या आधारावर भारताने मदतीस जावे, व आक्रमक टोळ्यांची हकालपट्टी केल्यानंतर लोकमताचा कौल घेऊन अंतिम निर्णय घेण्यात यावा असे ठरले. त्याप्रमाणे विलिनीकरणाचा निर्णय महाराजाने लागलीच घेतला; आणि २७ ऑक्टोबर १९४७ रोजी महाराजांच्या







मदतीसाठी लष्करी साहाय्य देण्याचा निर्णय घेण्यात आला. हा निर्णय घेताना विलिनीकरणाचा प्रश्न अखेरीस काश्मीरमधील प्रजेच्या मतानुसारच घेण्यात येईल, ही भारताची स्पष्ट भूमिका होती व तिचा पंडितजींनी वेळोवेळी निःसंदिग्ध शब्दात उच्चारही केला होता.

इतकेच नव्हे तर "काश्मीरमधील लोकमताचा कौल सर्व राष्ट्रसंघटनेच्या देखरेखीखाली घेतला जाण्यास आपली हरकत नाही, आपण तो मान्य करू" असेही आश्वासन पंडितजींनी दिले होते. हा प्रश्न केवळ काश्मीरचा नसून भारत-पाकिस्तान याजमधील सलोख्याचा आहे. बहुसंख्य प्रजा एका जमातीची तर राज्यकर्ते दुसऱ्या जमातीचे अशी संस्थाने आहेत. आपल्या जमातीचे बहुमत जेथे नाही अशा राज्यात आपल्या राज्यातील बहुसंख्य प्रजेस डावलून, विलीन होण्याचा निर्णय राज्यकर्त्यांकरवी घेतला जाणे शक्य आहे. असे झाल्यास अखेरीस तेथील लोकमतालाच मान दिला गेला पाहिजे; व ते लोकमत योग्य रीतीने अजमावता यावे याकरिता आपण आंतरराष्ट्रीय देखरेखीखाली ते घेण्यात यावे ही कल्पना देखील मान्य करावयास तयार आहोत असे पंडितजींचे म्हणणे होते. हा प्रश्न समाधानकारक रीतीने सुटावा यासाठी १७ डिसेंबर १९४७ च्या भारत-पाकिस्तान संयुक्त संरक्षक मंडळाच्या बैठकीत प्रथम आक्रमक टोळ्यांनी बाहेर जावे आणि त्यानंतर सर्वराष्ट्रसंघटनेच्या देखरेखीखाली लोकमत अजमावण्यात यावे ही कल्पना जवळ जवळ मान्य झाली होती; पण सर्व राष्ट्रसंघटना या झगड्यात कशी पडणार हा प्रश्न होता. अखेरीस हे प्रकरण भारताने त्या संघटनेकडे नेले. व तद्विषयक तक्रार करताना ही भूमिका पुढे मांडली. त्यानंतर पाच-सहा वर्षे याच भूमिकेचा भारताने सतत पाठपुरावा केल्याचे दिसून येते.

## घटनेचा अन्वयार्थ

ज्या घटनांतून अशाप्रकारे काश्मीर प्रश्न उद्भवला त्यांचा योग्य अन्वयार्थ लावणे कठिण आहे. भारताने लोकमताचा कौल मान्य करण्याच्या घोषणा वेळोवेळी केल्या आणि पुढे त्याबाबत टाळाटाळ करून अखेरीस सार्वमत घेण्याची जरूरी नाही अशी नेमकी उलटी भूमिका स्वीकारली असे म्हटले जाते; परंतु सकृद्दर्शनी ते बरोबर वाटले तरी थोडासा काळजीपूर्वक विचार केल्यास ते चुकीचे व अन्याय्य आहे असेच म्हणावे लागते. काश्मीरमधील बहुसंख्य प्रजा मुसलमान धर्माची असताना व राज्यकर्त्यांनी विलीनीकरणाबाबत निर्णय घेताना प्रजेच्या मताला मान दिला पाहिजे अशी भारताची भूमिका असताना पाकिस्तानने काश्मीरशी केलेला 'जैसे थे' करार डावलून सशस्त्र टोळ्या काश्मीरमध्ये घुसडण्याचा प्रयत्न का करावा? हा एक प्रश्नच आहे. केवळ जुनागडची ती प्रतिक्रिया होती असे म्हणता येत नाही. या टोळ्या काश्मीर महाराजांनी विलिनीकरणाचा निर्णय घेतल्यानंतर आत शिरल्या नाहीत तर त्या आधीच बंडाळी उद्भवून ही टोळधाड आली होती हे ध्यानात घेतले पाहिजे. मला वाटते, या प्रश्नाचे उत्तर काश्मीरच्या परिस्थितीतच सापडू शकेल. हिंदू व मुसलमान शेकडो वर्षे भ्रातृभावाने एकत्र राहिले असा तो प्रदेश आहे. आणि यामुळेच भारतात दहा वर्षे फोफावत गेलेल्या द्विराष्ट्रवादाच्या राजकारणाला काश्मीरमध्ये कधीच थारा मिळाला नव्हता. फार तर आपल्या विशिष्ट अस्मितेमुळे आपण स्वतंत्र राहाणे चांगले असे म्हणण्यापर्यंत त्याची मजल गेली असती. बहुसंख्य प्रजा मुसलमान धर्माची असूनही निर्णयाविषयी पाकिस्तानला विश्वास वाटत नसावा हेच याबाबत खरे कारण होय. त्याबाचून या साऱ्या प्रकरणाचा मुळातच उलगडा होऊ शकत नाही.

त्याचप्रमाणे सार्वमताविषयीच्या पंडितजींच्या विश्वासपूर्ण भूमिकेचा अर्थही याच पार्श्वभूमीवर स्पष्ट होऊ शकतो. तात्पुरते का होईना पण कायदेशीर 'अॅक्सेशन' झालेले होते. यामुळे काश्मीर हा भारताचा भाग बनला होता; आणि आक्रमकांना घालविण्यासाठी तेथे सैन्य पाठविणे न्याय्य झाले होते. याचाच अर्थ काश्मीरच्या भूमीवरुन आक्रमकांना पूर्णतया घालविणे भारतीय सेनेच्या दृष्टीने रास्त ठरले असते. पण त्यात एक तर अधिक व्यापक युद्धाचा धोका होता. दुसरे म्हणजे भारत व पाकिस्तान संबंध कायमचे बिघडण्याचाही संभव होता. पंडितजी काश्मीर प्रश्नाकडे या व्यापक दृष्टिकोनातून पहात असावेत. यामुळे लष्करी सामर्थ्याच्या बळावर पाकिस्तानला बाहेर काढण्याऐवजी जगापुढे आक्रमक म्हणून जाहीर करून जावयास लावावे आणि भारताचा शुद्ध हेतु सिद्ध करण्यासाठी "हवे तर आंतरराष्ट्रीय देखरेखीखाली सार्वमत घेऊ देत" असे म्हणून पाकिस्तानच्या भावी










तक्रारीही बंद कराव्या ही त्यांची कल्पना. ती इतकी रास्त व न्याय्य वाटत होती की तसे न झाल्यास काय, हा प्रश्नही त्यांना शिवला नाही. सर्वराष्ट्रसंघटनेकडे हा प्रश्न नेण्याची तयारी या आत्मविश्वासापोटी जन्मली. परंतु हे पाऊल पंडितजींच्या अपेक्षेप्रमाणे यशस्वी ठरले नाही.

अन्य राष्ट्रांना आक्रमक कोण हे ठरविण्याऐवजी प्रथम युद्ध थांबविणे अधिक महत्वाचे वाटले. आणि त्यानंतर पुढचा मार्ग शोधणे. सार्वमत घेण्याची तयारी भारत दर्शवीत होताच. यामुळे त्यासंबंधीची पद्धत निश्चित झाली की हा प्रश्न मिटला असा त्यांचा समज झाला. तो सार्वमताने सोडवण्याची आपली तयारी आहे असे भारताने वेळोवेळी म्हटले खरे ; पण त्यासाठी अनुकूल वातावरण प्रथम निर्माण झाले पाहिजे ही पुस्ती जोडूनच. पण ते निर्माण होण्यासाठी पाकिस्तानला आक्रमक म्हणून ठरविण्याची इतरांची तयारी नव्हती. शिवाय, तसे करण्यात आपण काश्मीर हा भारताचाच भाग होय, अशी अप्रत्यक्ष मान्यता तर देणार नाही ना अशीही चिंता त्यांना वाटत असावी; कारण तसे झाल्यास कलह मिटविण्याऐवजी तो अन्याय आहे एवढे म्हटल्यासारखेच फार तर होईल, असे त्यांना स्पष्ट दिसत होते.

या अवस्थेत काश्मीर प्रश्न अधिकाधिक कठीण स्वरूप धारण करू लागला. शस्त्रसंधी झाला. सर्व-राष्ट्रसंघटनेचे कमिशन येथे आले. आणि बाहेरून आलेल्या लुटारू टोळ्यांना प्रथम घालवावे, नंतर भारताने आपल्या सैन्याचा बराच भाग तेथून परत घ्यावा, आणि काश्मीरमध्ये सार्वमत घेण्यात यावे अशा अर्थाचा ठराव या कमिशनने भारत व पाकिस्तान-च्या संमतीने १३ ऑगस्ट १९४८ रोजी पास केला. भारताने तांत्रिकदृष्ट्या सार्वमताला दिलेली ही संमति.

## वेगळी कलाटणी

संयुक्त राष्ट्रसंघटनेकडे हा प्रश्न नेल्याने त्याला वेगळीच कलाटणी मिळाली हे उघड आहे. वास्तविक तात्पुरत्या का होईना पण भारतात सामील झालेल्या भागावर पाकिस्तानने केलेल्या आक्रमणाचा हा प्रश्न. परंतु तो तसा न रहाता भारत व पाकिस्तानच्या कलहाचा प्रश्न बनला. बाहेरून आलेल्या लुटारू टोळ्यांना घालवणे म्हणजे आक्रमणापूर्वीचा काश्मीरचा सर्व भाग पुनः काश्मीर महाराजांच्या आधिपत्याखाली आणणे. परंतु सार्वमत घेण्यासाठी निर्माण करावयाच्या अनुकूल परिस्थितीची एक प्राथमिक गरज या दृष्टीने ही गोष्ट कमिशनला मान्य होईना. अशा प्रकारे एकीकडे पाकिस्तानला अनुकूल अशी आझाद (?) काश्मीरची राजवट व दुसरीकडे मात्र जिचे भवितव्य अनिश्चित अशी काश्मीर राजवट अशी विचित्र अवस्था निर्माण झाली. सार्वमताचा प्रश्नही मूळ स्वरूपात राहिला नाही. वास्तविक सार्वमत घेण्याचा अधिकार काश्मीर सरकारचा. भारताशी तात्पुरता जोडलेला संबंध लोकांना पसंत आहे की नाही हे त्यांनी अजमावयाचे. पाकिस्तानचे निर्णयाविषयी समाधान व्हावे या हेतूने भारताने सर्वराष्ट्रीय देखरेख स्वीकार-लेली. यामुळे आपण सार्वमतात ढवळाढवळ करीत नाही इतपत कमिशनचे समाधान करण्याची जबाबदारी भारताने स्वीकारली होती. काश्मीर सरकार व कमिशन दोहोंच्या सल्ल्याने ते म्हणतील त्या स्वरूपात ती पार पाडण्याची अपेक्षा भारताकडून करणे योग्य झाले असते. मात्र हे सारे सर्व प्रदेश काश्मीर सरकारच्या ताब्यात आल्यानंतरच. परंतु कमिशनने हा मार्ग स्वीकारला नाही. यामुळे कोणतीही तडजोड निघणे अशक्य झाले.

## घटनासमितीत काश्मीरचे प्रतिनिधी

यानंतरची महत्त्वाची घटना म्हणजे भारतीय घटना समितीत १९४९ साली काश्मीरला देण्यात आलेले प्रतिनिधित्व ही होय. पाकिस्तानने याबाबत कमिशनने निषेध प्रकट केला असता "भारताचे कृत्य कायद्याच्या दृष्टीने आक्षेपार्ह नाही; यामुळे आपण त्याबाबतीत काहीही करू शकत नाही" असे मत कमिशनने प्रकट केले. भारतानेही, तात्पुरत्या 'ॲक्सेशन" च्या अनुषंगाने टाकलेले हे पाऊल आहे; सार्वमताला भारताची मान्यता असून त्याचा निर्णय विरुद्ध गेल्यास हे सबंध राहाणार नाहीत, हे मान्य केले. राज्यघटनेतील ३७० कलम (काश्मीरविषयक) समाविष्ट करतानाही गोपालस्वामी अय्यंगार यांनीही तात्पुरती व्यवस्था असल्याचे सांगून हाच मुद्दा विशद केला. यानंतर सर्वराष्ट्रसंघटनेच्या वतीने डॉ. फ्रॅंक ग्रॅहॅम व सर ओवेन डिक्सन यांचे अयशस्वी प्रयत्न झाले.

नंतरच्या घडामोडींचा विस्ताराने उल्लेख करण्याची गरज नाही. गोपालस्वामी अय्यंगार यांनी काश्मीरमध्ये








निवडणुका घेऊन कायदेमंडळ अस्तित्वात आणण्याची व त्याला जबाबदार असे सरकार स्थापन करण्याची योजना सुरक्षामंडळापुढे मांडली. आणि दि. १ मे १९५१ रोजी काश्मीरसाठी घटनासमिती बोलावण्याचा जाहीरनामा युवराज करणसिंग यांनी प्रकट केला. घटनासमितीने भारतात विलीन होण्याचा निर्णय घ्यावा असे आवाहन शेख अबदुल्ला यांनी केले तथापि भारत सरकारने तसे करण्यास संमति दिली नाही. काश्मीर घटनासमितीने काहीही निर्णय घेतला तरी भारताने सर्व राष्ट्रसंघटनेला दिलेल्या अभिवचनांवर त्याचा काहीही परिणाम होणार नाही असे स्पष्ट करण्यात आले. ही भूमिका नोव्हेंबर १९६३ पर्यंत कायम होती.

## नेहरूंचे मत बदलले

तथापि याच सुमारास पाकिस्तानला लष्करी साहाय्य देण्याचा अमेरिका करार करीत असल्याच्या बातम्या येऊ लागल्या. अमेरिकेच्या या निर्णयावर पंडितजी कडाडले; आणि त्यायोगाने भारत-पाकिस्तान समझोत्याच्या प्रश्नाचे व विशेषत: काश्मीर प्रश्नाचे स्वरूपच बदलले आहे अशी भूमिका त्यांनी घेतली. काश्मीर भारतात कायदेशीर रीतीने सामील झाला असूनही आम्ही या प्रश्नाबाबत सार्वमत घेण्याचे मान्य केले. काश्मीर घटनासमितीच्या रूपाने तेथील जनतेने आपला निर्णय दिला आहे. तो निर्णय देण्याचा काश्मीरी जनतेला पूर्ण अधिकार आहे. तो कोणीही हिरावून घेऊ शकत नाही. घटनासमितीने (काश्मीर) आपले मत प्रकट केल्यामुळे हा प्रश्न आता संपला आहे. आता काश्मीर हा भारताचा भाग आहे अशी पंडितजींनी भूमिका घेतली; व या प्रकरणावर अखेरचा पडदा पडला आहे असे ते म्हणू लागले. यामुळे हा प्रश्न सुटण्याची शक्यता पूर्णतया नाहीशी झाली.

तथापि सुरक्षा मंडळापुढे मात्र अजून तो जिवंत होता. काश्मीर जनतेच्या प्रतिनिधींनी याबाबत निर्णय घेतला असल्याने आता सार्वमत घेण्याचा मुळी प्रश्नच उरलेला नाही अशी बक्षी गुलाम महमद यांनी ऑगस्ट १९५५ मध्ये घोषणा केली. आणि त्याच वर्षाच्या अखेरीस ऋुश्चेव्हने "भारतीय संघराज्याचा एक घटक म्हणून काश्मीरचे स्थान काश्मीरच्या जनतेने ठरवून टाकले आहे" अशी घोषणा केली. या दोन महत्वाच्या घटना नमूद केल्या पाहिजेत. तथापि यानंतर देखील १९५७ साली तो पाकिस्तानने पुन: उपस्थित केला. आणि सुरक्षा मंडळाने त्याविषयी चर्चा करण्याचे ठरविले. अजूनही त्याविषयी अधून-मधून चर्चा होत असते. तथापि ठराव झाला नाही याचे कारण सोविएट रशियाने केलेला 'व्हेटोचा' वापर हे होय.

## अडचणीची परिस्थिती

काश्मीर प्रश्नाची थोडक्यात ही पार्श्वभूमी आहे. ती ध्यानात घेतली की माझ्या समजुतीने गेल्या पाच-दहा वर्षांच्या काही घडामोडींचा अर्थ स्पष्ट होऊ शकतो, तो आता थोडक्यात विचारात घेणे जरूर आहे. तथापि तसे करण्यापूर्वी एक गोष्ट मात्र निश्चितपणे स्पष्ट केली पाहिजे. जगात सगळीकडे भारताविषयी गैरसमज निर्माण करण्यासाठी पाकिस्तानने या प्रश्नाचा पुरेपूर उपयोग करून घेतला आहे. आणि तसे करणे पाकिस्तानला शक्य झाले याची कारणेही स्पष्ट आहेत. एकतर पाकिस्तान हे भारताच्या मानाने लहान व सापेक्षतया दुर्बळ राष्ट्र वाटते. यामुळे प्राथमिक सहानुभूतीचा कल सामान्यत: त्याच्याकडेच झुकतो; व दुसरे म्हणजे पाकिस्तान हे सार्वमताचा आग्रह धरीत असल्यामुळे त्याची भूमिका सत्कृद्दर्शनी सहज पटते. ती अधिक विस्ताराने सांगण्याचा प्रश्नच राहात नाही. पाश्चात्य राष्ट्रात तर ती कोणासही सहज रास्त व न्याय्य वाटेल अशी भूमिका आहे. उलट, भारतासारख्या एरवी शांतताप्रिय व उच्च नैतिक भाषा बोलणाऱ्या राष्ट्राने हा साधा, सरळ व लोकशाही-प्रधान मार्ग का नाकारावा हे प्रत्येकाला कोडे पडते. आणि दीर्घ खुलासा करून गैरसमज नाहीसे करण्याचे प्रयत्न करणे क्रमप्राप्त होते. आणि असा प्रयत्न केला तरी ऐकणाराच्या मनातील संशय दूर होताना दिसत नाही. कारण, सार्वमत हे बहुधा त्याचे श्रद्धास्थान असते; आमचेही ते आहेच.

तात्पर्य प्रचाराच्या लढाईत आम्ही लुळे पडलो आहोत यात संशय नाही. खुद्द न्यूयॉर्कमध्ये पाकिस्तानने या प्रश्नाबाबत महत्वाची "लॉबी" तयार केली आहे. तीच तऱ्हा वॉशिंग्टन मध्येही. भारत-पाकिस्तान-विषयक प्रश्नात अजूनही पाश्चात्य जगात ब्रिटनच्या मताला अधिक मान दिला जातो. कारण येथील परिस्थितीचे व प्रश्नांचे ब्रिटनला अधिक योग्य आकलन आहे असा समज आहे. तेथेही आमच्या विषयी काश्मीर








प्रश्नाबाबत सहानुभूती जवळजवळ नाहीच असे म्हणता येईल. यामुळे या प्रश्नाने आम्हाला अत्यंत अडचणीच्या अवस्थेत टाकले आहे. या गैरसमजाचे परिणाम आमच्या इतर प्रश्नाबाबतच्या भूमिकांवरही होणे अनिवार्य झाले आहे.

## परिस्थितीतील बदल

काश्मीर प्रश्नाबाबत १९५३ साली अभिप्राय देताना "आम्ही दिलेले अभिवचन तर आहेच; पण त्याबरोबरच बदललेल्या सर्वच परिस्थितीचा आम्हास विचार करावा लागेल" असे पंडितजी म्हणाले होते. आज दहा वर्षानंतर तर ही परिस्थिती कितीतरी अधिकच बदलली आहे. आरंभी काश्मीरमधील लोकमत कसेही असले तरी आता ते भारताला सर्वस्वी अनुकूल आहे की नाही हा एक प्रश्नच आहे. याचा अर्थ ते पाकिस्तानला अनुकूल ठरेलच असा नसला तरी आम्हालाही काही अडचणी आहेत हे खास. शिवाय सुरक्षा मंडळाने हा प्रश्न अजून विचाराधीन आहे हीच भूमिका कायम ठेवली आहे. मंडळाचा निर्णय आमच्या विरुद्ध जाऊ शकला नाही याचे एकच कारण; व ते म्हणजे सोविएट 'व्हेटो' होय. याचाच अर्थ आम्ही या प्रश्नाबाबत अगदी हतबल झालो असून एकाच राष्ट्राच्या कृपेवर सर्व काही अवलंबून आहे. नाहीपेक्षा सर्वराष्ट्र-संघटनेचे घटक म्हणून येणाऱ्या आमच्या जबाबदाऱ्या पुऱ्या करण्याची आमची तयारी नाही असे म्हणण्याचा अनवस्था प्रसंग आमच्यावर येण्याचा संभव आहे.

दुसऱ्या दृष्टीने पाहताही आजची परिस्थिती अशीच चमत्कारिक असल्याचे दिसून येते. या प्रश्नामुळे आम्ही केवळ आंतरराष्ट्रीय साम्यवादावरच अवलंबून आहोत असे नाही; अंतर्गत साम्यवाद व त्याचे स्नेही यांनीही त्याचा पुरेपूर फायदा घेतला आहे. चीनविषयक गाफीलपणाला काश्मीर प्रश्नच काहीसा जबाबदार ठरला हे पुराव्यानिशी सिद्ध करता येण्यासारखे आहे. चीनशी बिघडत चाललेले संबंध, त्याने वेळोवेळी आमच्या प्रदेशावर केलेली आक्रमणे हे सारे केवळ गैरसमजापोटी निर्माण होत आहे; खरा शत्रू पाकिस्तानच आहे. असा प्रचार पद्धतशीर सुरू होता. आणि त्यानंतर जेव्हा चीनचे वर्तन अधिकाधिक आक्रमक होऊ लागले तेव्हा चीनशी लढणे आम्हाला शक्य नाही, ती व्यवहार्य कल्पना नाही, आम्ही अशा लढाईत यशस्वी होऊ शकणार नाही हा विचार पुढे आला. प्रत्यक्ष लढाई सुरू होण्यापूर्वीच आमचे नीतिधैर्य सर्वस्वी खच्ची करण्यात आले. उलट हा प्रश्न मात्र कायमचा तापत ठेवण्याचे सतत प्रयत्न झाले. पाश्चात्य राष्ट्रांच्या साध्या समजूतदारपणाच्या सूचनेचाही साम्राज्य-वाद्यांची लूडबूड म्हणून उल्लेख होई. आणि सोविएटचा पाठिंबा हा त्यांच्या मैत्रीचा पुरावा म्हणून मांडला जाई. अमेरिकेने पाकिस्तानला लष्करी साहाय्य देण्याचा करार करून भारतात शीतयद्ध आणले यासाठी पंडितजी रागावले. आणि भारताला शीतयुद्धातील एका बाजूस पुरेपूर ओढण्यासाठी त्या रागाचा साम्यवादाने भरपूर उपयोग करून घेतला, हा इतिहास दृष्टीआड करणे आत्मघातकीपणाचे ठरेल.

साम्यवादाच्या मैत्रीचा बुडबुडा चिनी आक्रमणाने फुटला आहे. आणि त्याबरोबरच साम्यवादाच्या तथाकथित प्रगमनशीलतेचाही. चीन हे साम्यवादी राष्ट्र आहे ही गोष्ट, डावे असोत की उजवे, सर्वच साम्यवाद्यांना मान्य आहे. त्यांच्यातील वाद हा 'केवळ' अंतर्गत वाद आहे. तो विकोपाला गेला असे काही काळ दिसले तरी त्याबद्दल आम्ही समाधान बाळगणे हा शुद्ध खुळचटपणा ठरेल. एकेकाळी आम्ही त्यांच्या मैत्रीवर श्रद्धा ठेवली; आज त्यांच्या अंतर्गत कलहावर ठेवावी असे सांगण्यात येते. पण तसे करताना आवश्यक सावधपणा बाळगणेच शहाणपणाचे ठरेल. साम्यवादी प्रगमनशीलतेच्या दिवाळखोरीचे एक उत्कृष्ट दर्शन म्हणजे चीन-पाकिस्तान मैत्री हे होय. अमेरिकेच्या प्रमुखत्वाखाली स्थापन झालेल्या प्रादेशिक संरक्षण-संघटनात सामील असलेल्या व लष्करी साहाय्य घेणाऱ्या पाकिस्तानशी तथाकथित साम्राज्यशाहीविरुद्ध लढाऊ व आक्रमक क्रांतिवादी (?) भूमिका स्वीकारणाऱ्या चीनची मैत्री कशी होऊ शकते हा प्रश्न डावे वा उजवे साम्यवादी यांपैकी कोणीही सरळ सरळ काढलेला नाही. अमर्याद संधिसाधूपणाचेच हे द्योतक नव्हे काय? व तसे असल्यास त्यावर विसंबून राहाणे शहाणपणाचे ठरेल काय? साध्य गाठण्यासाठी हवे ते साधन वापरण्याचा हा प्रकार असेल तर भारताला नामोहरम करणे हेच ते साध्य नव्हे काय? याचाही विचार होणे जरूर आहे. चीनने केलेला अणुबाँबचा स्फोट व क्रुश्चेव्हची पदच्युती या घटना सावधपणाची आव-श्यकताच स्पष्ट करीत नाहीत काय? आंतरराष्ट्रीय राजनीतीत अजून आम्ही भोळे व भावडेच आहोत असे








दिसते. क्रुश्चेव्ह पदच्युत झाल्याने निर्माण झालेली परिस्थिती काळजीपूर्वक पाहाण्याऐवजी नव्या सोविएट नेत्यांपेक्षाही अधिक जोराने सोविएट धोरण बदलणार नाही असा निर्वाळा आम्हीच देत सुटलो आहोत. हा भाबडेपणा आता बंद होणे जरूर आहेसे वाटते.

## वास्तवता हवी

वरील विवेचनाचा अर्थ असा नव्हे की यापुढे चीन व सोविएट रशिया यांच्यात फरक करायचा नाही, किंवा तटस्थतेची भूमिका सोडली पाहिजे. तथापि साम्यवादी राष्ट्रेदेखील परराष्ट्र धोरणाची आखणी आपापल्या राष्ट्रीय हिताच्या दृष्टीकोणातूनच करीत असतात हे ध्यानात ठेवून आम्ही अधिक वास्तववादी बनण्याची गरज आहे. एका अर्थाने सोविएट-चीन-वादाचा या प्रश्नाशी सुतराम् संबंध नाही असे म्हणता येईल. उलट हा प्रश्न तेवत राहिल्याने दोहोंच्याही हितसंबंधांची जपणूक होते असे म्हणावे लागेल. कारण तो कायम असेतो आम्ही सोविएट व्हेटोवर अवलंबून राहातो व पाश्चात्य राष्ट्रातील आमच्याविषयीचे गैरसमज कायम राहातात. ही परिस्थिती सोविएट दृष्टिकोणातून इष्टच मानावी लागेल. आणि भारत व पाकिस्तान यांच्यातील कलह कायम राहाण्याने आमच्या सर्व संरक्षण-प्रयत्नात एक मौलिक दौर्बल्य कायम राहते. ही झाली चीनच्या हिताची बाब. हे दौर्बल्य कायम रहावे हाच चीन-पाकिस्तान मैत्रीमागील चिनी हेतू असू शकतो. या दृष्टीने आजच्या परिस्थितीत सर्वस्वी नवे घटक वर आले आहेत यात शंका नाही.

## नव्याने विचार करणे आवश्यक

या बदललेल्या परिस्थितीत नव्याने विचार होणे आवश्यक आहे असे स्पष्टपणे म्हणावेसे वाटते. "तर मग काय काश्मीरचे उदक पाकिस्तानच्या हातावर सोडावयाचे काय ?" असे कोणी म्हणेल. तसे सूचित करण्याचा हेतु येथे नाही. पण राष्ट्रहिताच्या दृष्टीने केवळ एकाच राष्ट्रावर सर्वस्वी अवलंबून राहावे लागणारी परिस्थिती कितपत इष्ट आहे याचा विचार झाला पाहिजे. तसेच आक्रमणाची सतत टांगती तलवार शिरावर असताना संरक्षण-प्रयत्नात दौर्बल्य कायम राखणे कितपत शहाणपणाचे ठरेल हेही पाहिले पाहिजे. नालासाठी स्वार घालवावयाचा की काय, हा खरा प्रश्न आहे. काश्मीरमधील लोकमत, वा धार्मिक दृष्टिकोणातून तेथे मतदान होण्याचा संभव इत्यादी फेरविचार करावयास लावणारे मुद्दे हे खरोखर गौण आहेत. आजच्या बदललेल्या परिस्थितीत त्याहून अधिक महत्त्वाचे व मौलिक घटक पुढे आले आहेत. काश्मीर विषयक कलह तेवत राहिल्याने कार्यभाग आमचा साधतो की चीनचा हा खरा प्रश्न आहे; व त्याचे प्रामाणिक व भावनांच्या आहारी न जाता उत्तर देता आले पाहिजे.

तथापि त्याबरोबरच पाकिस्तानने अलीकडे टाकलेली पावले पाहिली की या प्रश्नाचा तुटक वा अलग स्वरूपात विचार करणे अशक्य आहे असेही स्पष्टपणे म्हणावे लागेल. काश्मीरवर दावा सांगणाऱ्या पाकिस्तानची, बारा हजार चौरस मैलांचा अक्साई-चीनचा टापू हा एक सर्वात महत्वाचा कलहाचा विषय असताना, चीनशी मैत्री कशी होऊ शकते हेही एक कोडे आहे. पाकिस्तानने त्यावर उदक सोडले आहे काय? केवळ भारताला कात्रीत पकडण्याचा पाकिस्तानचा हा उपक्रम म्हणजे एक प्रकारचे 'ब्लॅक-मेलींग'च नव्हे काय ? तात्पर्य, पाकिस्तानने आपल्या वर्तनानेच आता काश्मीर प्रश्न हा अलग ठेवला नसून भारत-पाकिस्तान संबंधांचा तो एक घटक बनवला आहे. हा प्रश्न सुटला की भारत-पाकिस्तान संबंध आपोआप सुधारू लागतील असे मानण्यास आता फारसा आधार उरलेला नाही. आणि सार्वमताचा उपाय हाही त्यामुळे आता अर्थशून्य झाला आहे. निधर्मी राज्याच्या दृष्टीने सार्वमत घेण्यातील धोके तर आहेतच; पण नुसते काश्मीरमधील सार्वमत असा हा विषय आता राहिलेला नाही. मात्र भारत-पाकिस्तान संबंध व्यापक पातळीवरून सुधारावेत यासाठी काश्मीरविषयी फेरविचार करण्याची आमची तयारी असणे आवश्यक आहे. यात सर्वांची आता कसोटी लागणार आहे. उभय राष्ट्रातील राज्यकर्त्यांचीच नव्हे तर विरोधकांची देखील !





अनुक्रमणिका

प्रा. एम. के. हाल्दर

# नेहरूंचे परराष्ट्रीय धोरण*

भारताचे परराष्ट्रीय धोरण हा पंडित नेहरूंच्या वैयक्तिक अशा वैचारिक उत्क्रांतीचाच एक भाग आहे. संस्कारक्षम अशा अगदी तरुण वयातच राष्ट्रवादी व आंतरराष्ट्रवादी विचारसरणीचा ठसा त्यांच्या मनावर उमटलेला होता. त्यांचे वडील एक श्रेष्ठ कायदेपंडित होते आणि आयुष्याच्या उत्तर काळात ते भारतातील एक नामवंत राजकीय नेते म्हणूनही विख्यात झालेले होते. आपल्या मुलाला पूर्णतया पाश्चात्य शिक्षण मिळावे या हेतूने हॅरो व केंब्रिज येथे त्याच्या शिक्षणाची त्यानी व्यवस्था केली होती. त्यांच्या प्रमाणेच वकीलीची सनद जवाहरलालजीनीही मिळविली होती.

नेहरू विद्याभ्यासासाठी इंग्लंडमध्ये राहात होते त्यावेळी इंग्लंडमधील मजूर पक्षाच्या चळवळीचा उदय होऊन ती चांगली स्थिरावलेली होती. कम्युनिस्टांच्या दुसऱ्या आंतरराष्ट्रीय संघटनेच्या ( सेकंड इंटरनॅशनल ) वेळी आंतरराष्ट्रवादाचा ठसा प्रथमतः त्यांच्या मनावर उमटला असावा. नेहरूंनी लिहिले आहे : ' सोव्हियट रशियातील राजवटीत काही खटकणाऱ्या गोष्टी असूनही मी त्या देशाकडे आकर्षिला गेलो होतो आणि जगाच्या दृष्टीने तो देश एक आशेचा संदेशच देतो आहे असे वाटत होते. ' ते दिवसच असे होते की बुद्धिमान आणि मनुष्याचा भवितव्याचा जागरूकपणे विचार करणाऱ्या तरुण मंडळींना तिसरी आंतरराष्ट्रीय संघटना फार आशादायक वाटली होती. परंतु नेहरू मात्र या तिसऱ्या इंटरनॅशनलच्या बाबतीत पूर्णतः या विचारसरणीने भारले गेले नसावेत. कारण नेमक्या ह्याच वेळी हिंदुस्थानात सुरू झालेल्या स्वातंत्र्य चळवळीच्या, सत्याग्रहाच्या नैतिक व आध्यात्मिक विचारसरणीने त्यांना आकर्षित करावयास प्रारंभ केला. मग त्यांनी गांधीजींचे शिष्यत्वही पत्करले. पण तरीही गांधीजींच्या अहिंसा तत्त्वाचा मात्र ते स्वीकार करू शकले नाहीत. असे दिसते की नेहरूंनी अहिंसेचा स्वीकार केवळ Pis aller म्हणून केला. कारण नंतरच्या स्वराज्यप्राप्तीच्या काळात स्वतंत्र सरकारचे नेतृत्व करीत असताना त्यानी स्पष्टपणे असे म्हटले आहे की ' माझ्या सरकारने अहिंसेचे तत्त्व आपल्या आचरणात पाळलेले आहे असे मी कधीच म्हटलेले नाही. माझे सरकार त्या तत्त्वाला आदरणीय तत्त्व म्हणून मान देईल. परंतु राज्यकर्ते म्हणून अहिंसेच्या तत्त्वाचा स्वीकार करण्याइतके आम्ही समर्थ नाही हे अगदी स्पष्ट आहे. तसे केले तर आम्हाला भूदल, नौदल, हवाईदल काहीच राखता येणार नाही.

## विरोधी प्रवृत्तींचा गोंधळ

त्यावेळी पं. नेहरूंनी हेही जाणलेले होते की भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीतील अग्रेसर संस्था काँग्रेस ही एक केवळ ' राष्ट्रीय व राजकीय ' संस्थाच आहे आणि त्यापेक्षा वेगळ्या रीतीने विचार करण्याचा प्रघात अद्याप पडलेला नाही. ' ह्यामुळेच राष्ट्रवादी विचारसरणी ही एक निश्चितपणे अपुरी आणि संकुचित् विचारसरणी आहे हे नेहरूंना कळले होते. अशा या काळात राष्ट्रवाद व आंतरराष्ट्रवाद, सत्याग्रहाचे तत्त्व आणि आधुनिक काळातील क्रांती घडवून आणण्याची इतर तंत्रे, विश्वस्तपणाचीवृत्ति ( trusteeship) आणि समाजवादी साध्ये, साम्राज्यवादाचा निषेध आणि ब्रिटिशांबद्दल सकौतुक सहानुभूती अशा विरोधी गोष्टीत त्यांचे मन आंदोलन घेत राहिले.

काँग्रेसने १९२७ मध्ये ब्रुसेल्स येथे भरलेल्या साम्राज्यशाही विरोधी परिषदेस काँग्रेसचे प्रतिनिधी म्हणून नेहरूंना पाठविले आणि नेहरूंनी याचवेळी आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या रंगभूमीवर प्रथमतः प्रवेश केला. कम्युनिस्टांच्या होऊन गेलेल्या दोन्ही आंतरराष्ट्रीय संघटनांमधील संघर्ष त्याना तिथे पाहावयास मिळाला आणि त्यानी अभिप्राय व्यक्त केला की श्रमिकांबाबतच्या विचारात दुसऱ्या आणि तिसऱ्या संघटनांपैकी तिसऱ्या संघटनेकडेच माझ्या मनाचा कल झुकत होता. परंतु सभ्यतेच्या व मानवतावादाच्या कल्पनांनी त्याना स्वतःला तिसऱ्या संघटनेत संपूर्णतः

* Quest-autumn 64 या अंकातील लेखावरून अनुवादित.








वाहून जाऊ दिले नाही. ब्रुसेल्सची परिषद ही कम्युनिस्टांनी आणि त्यांच्या वैचारिक सहकारी मित्रांनीच भरविलेली होती. या परिषदेबद्दल नेहरूंनी नंतर लिहिले आहे " गंमतीची गोष्ट अशी की साम्राज्यशाही विरोधी परिषदेच्या वेळी अनेक समित्यांच्या बैठकीत लहान–सहान बाबतीत मी अँग्लो–अमेरिकनांच्या गटाच्या बाजूचा असे. निदान साधनांच्या, मार्गाच्या बाबतीत आमच्यात काही तरी साम्य होते आम्ही दोघेही प्रेषिताच्या पद्धतीने जाहीरनामे काढणाऱ्या पोकळ घोषणा असलेल्या ठरावांना विरोध करीत असू ". नेहरूंचे हे तिसऱ्या आंतरराष्ट्रीय संघटनेसंबंधीचे प्रेम लवकरच संपुष्टात आले.

१९३१ साली नेहरूंनी जेव्हा गांधी-आयर्विन करार घडवून आणण्यात भाग घेतला तेव्हा त्या आंतरराष्ट्रीय संघटनेतून त्यांची हकालपट्टीच झाली. संघटनेने त्यांना आपल्या कृत्याचे स्पष्टीकरण करण्याची संधीही दिली नाही. नेहरूंनी ह्याबाबतीत गांधीजींचा निर्णय मानून राष्ट्रीय चळवळीतच अधिक लक्ष घालायला प्रारंभ केला. परंतु आंतरराष्ट्रीय विचार करण्याच्या प्रवृत्तीने त्यांना तसे झपाटलेले होतेच. स्पेनमधील यादवी युद्धाने पुनः एकदा आंतरराष्ट्रीय राजकारणात भाग घेण्याची संधी त्याना आणून दिली. प्रारंभी त्यांच्यामुळेच भारतीय काँग्रेसने ह्या यादवी युद्धाबद्दलचा एक ठराव संमत केला. त्या ठरावात म्हटले आहे की, "युरोपातील फॅसिस्ट हुकूमशाही लष्करी प्रवृत्ती आणि स्पेनमधील जनता यांच्यामध्ये चाललेला संघर्ष याबाबत काँग्रेसला अत्यंत सहानुभूती व चिंता वाटते आहे. स्पेनचे सरकार व जनता हुकूमशाही बंडखोरांना विरोध करीत असताना ब्रिटिश सरकार आपले अंतर्गत राजकारणात ढवळाढवळ न करण्याचे धोरण सोडून वागते आहे याचे भारतीय काँग्रेसला मोठे आश्चर्य वाटत आहे." या ठरावावरूनही आपल्याला अगदी स्पष्ट कळते आहे की इतर अनेक राष्ट्रवादी नेत्यांप्रमाणेच ब्रिटनचा अनेक ठिकाणी चाललेला हस्तक्षेप हा चुकीच्या दिशेने चाललेला आहे असेच नेहरूंनाही वाटते आहे.

अशा या ह्या काळातच अनेक घटना व विविध दृष्टिकोन यांची अवजड छाया डोक्यावर असतानाच लखनौ काँग्रेसने ( १९३६ मध्ये ) नेहरूंना काँग्रेसचा एक परराष्ट्रविषयक स्वतंत्र विभाग सुरू करण्याचा अधिकार दिला. आणि येथपासूनच प्रारंभी काँग्रेसच्या व नंतर स्वतंत्र भारत सरकारच्या परराष्ट्रविषयक धोरणाची आखणी नेहरूंनी केली.

### चीनला भेट व फॅसिझम

साम्राज्यवादाचे कट्टे शत्रू असलेल्या नेहरूंना चीनच्या चँग-कै-शेक बद्दल फार आशा वाटली होती. चीनने अनेक मोठ्या संकटाना न जुमानता आपले स्वातंत्र्य संपादिलेले होते. दुसऱ्या महायुद्धाला प्रारंभ होण्यापूर्वी काही दिवस नेहरूंनी चीनचे अंतरंग शोधण्यासाठी चीनला भेट दिली होती. त्यावेळी त्यांनी लिहिले आहे, " ह्या दौऱ्याहून मी भारतात परतलो तो चीन व चिनी जनता यांचा पूर्वीपेक्षा अधिक मोठा चाहता होऊनच. आणि पूर्वपरंपरा असलेल्या ह्या पुनः तारुण्य प्राप्त झालेल्या लोकांच्या चैतन्यावर कोणत्याही प्रकारची परिस्थिती कधी मात करू शकल ह्याची मला कल्पनाही करता येईना. "

परंतु युद्धाचा भडका उडाला आणि नेहरूंच्या सर्व आशा–अपेक्षांनाही जबर धक्का बसला. त्यांनी आपल्या आत्मचरित्रात म्हटले, " खूप आघात झाले आणि त्यांच्याशी जुळवून घेणे फार जड जाऊ लागले. जर्मनी आणि रशियाचा झालेला करार, फिनलंडवर रशियाने केलेले आक्रमण आणि जपानकडे पाहण्याची मैत्रीची दृष्टी ... ... जगात काही तत्त्वाधिष्ठित वागणूक आहे की नाही ? का सगळाच केवळ संधिसाधूपणा आहे ?"

प्रारंभीच्या काळात महात्माजींनी फॅसिझमचे स्वरूप पूर्णपणे ओळखून त्याचा प्रतिकार करणाऱ्या संघटित राष्ट्रांना आपला नैतिक पाठिंबा दिला. परंतु या शतकातील सर्वात भयंकर अशा संकटाशी झगडणाऱ्या ह्या राष्ट्रांची पीछेहाट होते आहे असे दिसताच त्यांनी ब्रिटिश सरकारला युद्धाऐवजी अहिंसेचा मार्ग अवलंबिण्याची सल्ला मसलत दिली. त्यांच्या भव्य व उदात्त ध्येयांच्या दृष्टीने युद्ध ही एक क्षुद्र गोष्ट होती. जेव्हा जपानने भारताचा दरवाजा ठोठावण्यास प्रारंभ केला तेव्हा गांधीजीनी हिंदुस्थानातील लोकांना आपला स्वतंत्र असण्याचा हक्क बजावण्यास हीच वेळ योग्य आहे हे ओळखून ' करेंगे या मरेंगे ' असा आदेश दिला. संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी करून काही बाबतीतच दिल्या जाणाऱ्या अधिकारांच्या योजना धुडकावून लावण्यात आल्या. काँग्रेसच्या राष्ट्रवादी पुढाऱ्यांनी








युद्धपरिणामासंबंधी राजगोपालाचारी, मानवेंद्रनाथ रॉय यांनी दिलेल्या इशाऱ्यांकडे दुर्लक्ष केले. युद्धामुळे अनेक वेगवेगळ्या प्रकारच्या शक्यता निर्माण होतील हे त्यांना दिसले नाही आणि ते आपले दोलायमान परिस्थितीतच राहिले. मग प्रत्यक्षात ज्यावेळी ब्रिटिशांनी सर्व सत्ता भारतीयांच्या हातात दिली त्यावेळी देशाची फाळणी केली गेली, 'न भूतो न भविष्यति' अशी संकटपरंपरा लक्षावधी लोकांवर कोसळली, खंडप्राय असलेल्या भारताच्या राजकारणातील एका विषारी कर्क-रोगाला सुरुवात झाली.

नेहरू अधुन मधून राष्ट्रवादाकडे झुकतच होते. १९४० मध्ये जेलमधून काढलेल्या एका पत्रकात त्यानी म्हटले 'फॅसिझम आणि नाझी राजवट यांच्या विरोधी माझ्याइतका फारच थोड्या लोकानी हिंदुस्थानात आवाज उठवला असेल. माझ्या सर्व प्रवृत्तीच त्यांच्या विरोधी बंड करतात. परंतु इतर अनेकांच्या प्रमाणेच युद्धाने घडून येणाऱ्या अनेक क्रांतीकारक स्थित्यंतरांची इतर अनेक राष्ट्रीय पुढाऱ्यांप्रमाणे नेहरूंनाही कल्पना न आल्याने ते म्हणाले 'आपण युद्धापासून दूर राहिले पाहिजे आणि आपल्या लोकांनाही दूर ठेवले पाहिजे. मनुष्यबळ आणि पैसा या द्वारेही मदत करता कामा नये. हेच यावेळी आपले प्रथम कर्तव्य आहे' 'चले-जाव' चळवळ चालू असूनही युद्धप्रयत्नामध्ये या काळात ब्रिटिशांना भरपूर मदत मिळालेली दिसते. युद्ध संपले आणि साम्राज्यावरील अधिकार सोडून देणे ब्रिटिशांना अपरिहार्य झाले तेव्हा पुनः एकदा नेहरूंना काही वेगळे दृश्य दिसू लागले. २७ जानेवारी १९४७ ला त्यांनी घटना समितीला सांगितले 'भारतीय क्रान्तीचा हेतू आशियातील इतर देशांच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या प्रयत्नांना मदत करण्याचाही राहील. आम्ही हे मोठे कार्य करण्याच्या दृष्टीने कितीही अपात्र असलो तरी हेही ओळखले पाहिजे की आशियांतील स्वातंत्र्य चळ-वळीचा प्रारंभ आम्हीच केलेला आहे. म्हणूनच कोणतीही कृती करीत असताना आपण व्यापक भूमिकेने विचार केला पाहिजे.'

## अलिप्ततेचा आरंभ

ह्याच काळात अलिप्ततेच्या धोरणाबद्दल त्यांच्या मनांत गंभीरपणे विचार सुरू झाला असावा. जगातील सत्तास्पर्धेच्या गटात आपण अलिप्त राहावे ह्या विचारानी त्याना आकर्षित केले असावे. ७ सप्टेंबर १९४७ ला आकाशवाणीवरून भाषण करताना ते म्हणाले 'एक-मेकाच्या विरोधी प्रयत्न करणाऱ्या सत्तास्पर्धेवर आधार-लेल्या गटांपासून शक्य तितके दूर राहण्याचा भारत प्रयत्न करील.' तरीही असे दिसते की नेहरूंना आपल्या धोरणाची स्वच्छ दिशा ४ डिसेंबर १९४७ च्या सुमारास दिसली असावी. आपल्या अलिप्ततावादी धोरणाचे फायदे सांगताना त्यानी त्या सुमारास स्पष्टपणे दाखवून दिले 'आपण दोन्ही सत्तास्पर्धक गटांना अप्रिय वाटेल अशा पुष्कळ गोष्टी केलेल्या आहेत पण हेही त्या गटांना समजले आहे की आम्ही कोणत्याही एका गटाला संपूर्णपणे बांधलेले नाही. ही परिस्थिती त्यांना फारशी प्रियही नाही, कारण आज एकमेकासंबंधी एवढा संशय, एवढे भय त्यांच्या मनात आहे की जो कोणी आपल्या बाजूचा नाही तो शत्रूच आहे अशी समजूत करून घेतली जाते.

'जगात शांतता टिकणे ही जगाच्या दृष्टीने सर्वश्रेष्ठ महत्त्वाची गोष्ट आहे' हे सांगताना नेहरू म्हणाले की, आशियातील देशांच्या बाबतीत हे सर्वात अधिक खरे आहे. या विश्वासातूनच २५ मार्च १९४७ ला त्यानी आशियातील संबंधांची निश्चिती करणारी परिषद भरविली. त्या परिषदेत ते म्हणाले, "राष्ट्रे स्वतंत्र झाल्याखेरीज आणि प्रत्येक व्यक्तीला स्वातंत्र्य, सुरक्षितता व उत्कर्षाची समान संधी मिळाल्याखेरीज खरी शांतता अस्तित्वातच येणार नाही. अनेक अडथळे असले तरी आता जगाची अशी एक अवस्था तयार झालेली आहे की सर्व जगाच्या एकात्मतेसंबंधीचे ध्येय आणि सर्व देशांच्या एकत्रित येण्यातून निर्माण होणारी, एखादी कारभार पाहणारी संघटना (World Federation) या गोष्टी आवश्यकच होणार आहेत. आपण कोणत्याही एका सत्तास्पर्धेतील गटासाठी झटण्यापेक्षा या ध्येयाच्या दृष्टीनेच कृती केली पाहिजे.

१८ डिसेंबर १९४८ ला डच सैन्य इंडोनेशियावर चालून आले. २० जानेवारी १९४९ ला दिल्लीला आशियाई राष्ट्रांची परिषद भरली. ह्यावेळी नेहरूंच्या साम्राज्यविरोधी धोरणाची आणि अलिप्ततावादाची कसोटीच होती. भारताच्या प्रतिनिधीनी ह्यावेळी तत्परतेने एक तीन कलमी योजना मांडली. स्वातंत्र्याची








प्राती अधिकाधिक देशांना व्हावी आणि त्या द्वारे चिरस्थायी स्वरूपाची शांतता प्रस्थापित करावी हा या परिषदांचा, योजनांचा हेतू असून कोणाविरुद्धही द्वेष प्रस्थापित करावयाचा नाही हे नेहरूंनी यावेळी आवर्जून स्पष्ट केले.

या परिषदेचे ठराव सिक्युरिटी कौंसिलकडे पाठविण्यात आले. ठरावाला असलेल्या दिल्लीच्या परिषदेच्या प्रबळ पाठिंब्यामुळे जगाच्या मताचा कल त्याच बाजूचा असल्याने आणि विशेषतः अमेरिका व ब्रिटन त्याच बाजूचे असल्याने नेदरलँडच्या सरकारने आपली इंडोनेशियातील लष्करी हालचाल थांबविली. १९४९ च्या एप्रिलमध्ये वाटाघाटींना प्रारंभ झाला आणि ऑगस्टमध्ये हेग येथे एक गोलमेज परिषद भरली. डच् व इंडोनेशियन्स् यांच्यामध्ये एक नोव्हेंबरला एक करारही झाला आणि नेहरूंच्या परराष्ट्रीय धोरणाचा पहिला मोठा विजय प्रस्थापित झाला.

१९४८ साली अशी एक घटनांची मालिकाच घडली की ज्यामुळे नेहरूंचा आपल्या अलिप्ततावादी धोरणावरील विश्वास वाढतच गेला. ब्रह्मदेश, सिलोन, मलाया या राष्ट्रांना स्वातंत्र्य मिळाले. दक्षिण कोरिया प्रजासत्ताक झाले. परंतु ह्याच वेळी कम्युनिस्टांचे आशियातील अनेक राष्ट्रांत सत्ता बळकावण्याचे जोरदार प्रयत्नही चालूच होते. नेहरूंना त्यांच्या स्वतःच्या देशातच त्याचे प्रत्यंतर आले. तेलंगणात भारतातील कम्युनिस्टांनी थैमान घडवून आणले. युरोपातही ही कम्युनिझमची साथ बळावली. झेकोस्लोव्हाकियातील उदारमतवादी सरकार २८ फेब्रुवारी १९४८ ला कोसळले आणि ग्रीसमध्ये कम्युनिस्टांचे गनिमी युद्ध सुरू झाले.

पाश्चात्य राष्ट्रांना कम्युनिस्टांच्या गटाचे वर्चस्व वाढत आहे याची अधिकाधिक जाणीव झाली. १४ एप्रिल १९४९ ला 'नाटो'ची निर्मिती झाली. (North Atlantic Treaty Organisation) अशा रीतीने अलिप्ततावादी धोरणाचा पहिला विजय डोळ्याला दिसत असतानाच अनेक समस्या, अनेक पर्याय डोळ्यापुढे येत होते. ब्रिटनने नाटोचे सभासदत्व पत्करलेले असूनही नेहरूंच्या नेतृत्वाखाली असलेल्या भारताच्या घटना-समितीने राष्ट्रकुलामध्ये राहण्याचा निर्णय घेतला. मे १९४९ मध्ये नेहरू म्हणाले, 'आपण राष्ट्रकुलातून बाहेर पडलो तर आपण पूर्णतः एकाकीच राहू आणि त्यामुळे आता आहोत यापेक्षा अधिक बांधील राहावे लागेल.'

## चीनबद्दलचे प्रेम

प्रेसिडेंट ट्रूमन, पंतप्रधान ॲटली यांनी ऑगस्ट १९४९ मध्ये नेहरूंना कळविले की, 'कम्युनिझमखेरीज दुसरी कोणतीही शक्ति इंडोनेशिया, इंडोचायना, काश्मीर यासारख्या अशांत प्रदेशात उदयाला येणार नाही.' परंतु नेहरूंना कम्युनिस्ट चीनबद्दल फार आशा वाटत होती. आणि कम्युनिस्ट चीन व आशियातील इतर लोकशाही राष्ट्रे यांच्यामध्ये कोणाचीही एक बाजू न स्वीकारता नेहरूंना राहावयाचे होते.

२१ सप्टेंबर १९४९ ला माओ-त्से-तुंगने चीनच्या प्रजासत्ताक राज्याची घोषणा केली. ३१ जानेवारी १९५० ला मोठ्या उत्साहाने नेहरूंनी चीनच्या ह्या राज्याला आपल्या देशाची मान्यता कळविली. मान्यता देणाऱ्या राष्ट्रांपैकी भारत हे पहिलेच राष्ट्र ठरले.

असेही असेल की आशियातील कम्युनिस्टांचे वाढते वर्चस्व नेहरूंना दिसू लागले असेल आणि म्हणूनच इंडोचायनाच्या हो-चि-मिन्ह बद्दल एक विशिष्ट वृत्ति त्यानी धारण केली. ह्या काळात इंडोनेशियाला पोषक ठरवील अशा अनेक घटना त्यांनी केल्या पण त्यांनी इंडोचायनाला मात्र पाठिंबा दिला नाही. १९५० मध्ये भारताच्या पार्लमेंटमध्ये जे वादविवाद झाले त्यात कम्युनिस्ट चीनच्या वाढत्या वर्चस्वाबद्दल काळजी व्यक्त केली गेली. दक्षिण आणि आग्नेय आशियाला या वाढत्या वर्चस्वाने काही गंभीर धोका निर्माण होतो आहे हे खुद्द नेहरूंनीही मान्य केले असे नॉर्मल कझिन्सने आपल्या रिपोर्टात म्हटले आहे.

१४ फेब्रुवारी १९५० ला नेहरूंनी भारतीय जनतेला असे सांगितले की सर्व जगच आता एका विचित्र संघर्षाच्या कचाट्यात सापडलेले आहे. शेजारच्या राष्ट्रात उलथापालथी होत आहेत व भारतीय जनता व संघ-राज्य यांच्यावर आपल्या देशाचे ह्या संकटात संरक्षण करण्याची जबाबदारी येऊन पडलेली आहे.

नेहरूंना वाटले असावे की अलिप्ततेचे धोरण कम्युनिझमला थोपवील. म्हणूनच अमेरिकेचे माजी अध्यक्ष हुवर (Hoover) यांनी जेव्हा रशियाला वगळून युनोची बैठक घेण्याची सूचना केली त्यावेळी नेहरूंनी अगदी तीव्रपणे आपली विरोधी प्रतिक्रिया व्यक्त केली.








त्यांना अद्याप वाटत होते की नैतिक आवाहनाने कम्युनिस्ट चीन अजूनही वळेल.

### बर्लिनची परिषद

१९५० च्या जूनमध्ये बर्लिनमध्ये काही विचारवंतांची (त्यात बहुतांशी युरोपीय होते) एक बैठक झाली आणि Congress for Cultural Freedom या संस्थेचा जन्म झाला. ह्या परिषदेत विचारवंतांनी हुकूमशाही दहशत दिवसेदिवस वाढत आहे याबाबत काळजी व्यक्त केली. त्याच सुमारास सर ॲन् जेकब् (रॉयल इन्स्टिट्यूटच्या आंतरराष्ट्रीय घडामोडींच्या अभ्यासासाठी नेमलेल्या समितीचे अध्यक्ष) यानी आपला शीतयुद्धातील संरक्षण योजनांसंबंधी अहवाल सादर केला. अहवालाचा सारांश असा की, "कम्युनिस्टांचे आपल्या प्रसाराचे वाढते प्रयत्न आशियातील राजकीय व लष्करी सहकार्य नसलेल्या देशात अधिक होत राहतील आणि पश्चिम युरोपातील अनेक राष्ट्रात थोडेफार असे सहकार्य असल्याने येथे ते भय कमी आहे. पाकिस्तानापासून हाँगकाँगपर्यंत समान ध्येयांच्या व हितसंबंधांच्या संरक्षणाच्या दृष्टीने अटलांटिक कराराप्रमाणे कोणतीही अधिकृत योजना अद्यापपर्यंत अस्तित्वात आलेली नाही. पाकिस्तान, भारत, सिलोन, मलाया हे राष्ट्रकुलाचे सभासद आहेत. त्यामुळे ब्रिटिशांच्या धोरणाचा त्यांच्यावर प्रत्यक्षपणे परिणाम होतो किंवा ब्रिटनच्या धोरणाशी ही राष्ट्रे संबंधितही असतात परंतु युरोपातील राष्ट्रांची संघटना जेवढी दृढ आहे तेवढी आशियाई राष्ट्रांची नाही. अटलांटिक कराराप्रमाणे एखादा पॅसिफिक किंवा हिंदी महासागर करार करण्यात काय काय अडचणी आहेत याचा ह्या समितीने विचार केलेला आहे. तरीही त्याना परस्पर सहकार्याने व समान संरक्षण योजनांना बळकटी आणण्याचे कार्य या विभागात का करता येत नाही हे कळत नाही. पाश्चात्य राष्ट्रांपासून परराष्ट्रीय धोरणात स्वातंत्र्य टिकविण्याची आशियाई राष्ट्रांची उत्कट इच्छा आहे आणि लष्करी आक्रमणाच्या व हस्तक्षेपाच्या भयाचा प्रतिकारही ह्या राष्ट्रांना करावयाचा आहे. त्यांना आपापसात एखादा करार करता आला तरच हे शक्य होईल."

अशा या घटनांच्या वातावरणात भारताबाबत नेहरूंना शीतयुद्धाचे धोके सतत जाणवत होते. एवढ्यात स्टालिनने धूळ खात पडलेला लेनिनचा, शांततापूर्ण सहजीवनाचा सिद्धांत झटकून बाहेर काढला आणि पुनः नेहरूंच्या अलिप्ततावादी धोरणाबाबतच्या आशा अपेक्षा उंचावल्या. मार्च १९५० मध्ये नेहरूंनी पार्लमेंटला सांगितले की 'आपण आपल्या देशाची उभारणी भक्कम पायावर करावी आणि ज्या गोष्टींचा आपल्याशी साक्षात संबंध येत नाही त्यात आपण स्वतःला गुंतवून घेऊ नये.' याचा अर्थ असा नाही की नेहरूंना त्यात रस नव्हता. परंतु 'अशा या जबाबदाऱ्या आपल्यासारख्या देशाला न पेलणाऱ्या आहेत आणि स्वतःचेच प्रश्न अगदी भरपूर आहेत.' 'जॉर्ज वॉशिंग्टन १९ सप्टेंबर १७९६ मध्ये जे म्हणाला, अगदी तेच उद्गार नेहरूंनी जगाची परिस्थिती खूप बदलली असतानाही काढले. ते म्हणाले: "शांतता आणि समन्वय यांची वाढ करण्याचा प्रयत्न करावा; कारण कोणत्याही एका देशाशी भावनेने जखडून घेणे अधिक अहितावह, विविध प्रकारची संकटे आणणारे ठरते. आमचे मुख्य धोरण कायमच्या कराराने जगातील कोणत्याही देशाशी बांधील राहावयाचे नाही या दृष्टीने वाटचाल करीत राहवयाची हेच आहे.'

### कोरिया व तिबेट

दक्षिण व उत्तर कोरियामध्ये संघर्ष निर्माण झाला तेव्हा इतर अनेक राष्ट्रांप्रमाणेच उत्तर कोरियाला भारताने आक्रमक म्हटले. परंतु नेहरूंच्या मनात स्टालिनच्या शांततापूर्ण सहजीवनाचा असा घोष चाललेला होता की त्यांनी स्टॅलिनशी पत्रव्यवहार सुरू केला. आपल्या अलिप्ततावादी धोरणाचा ते कोसळण्यापूर्वी एकदा बचाव करण्यासाठी असे मत दिले की चीनने कोरियात आपले मोठ्या प्रमाणात 'स्वयंसेवक' पाठविले असले तरी कम्युनिस्ट चीनवर आक्रमक म्हणून शिक्का मारू नये. ३० सप्टेंबर १९५० ला त्यांनी युनोला असाही सल्ला दिला की उत्तर कोरियावर सैन्य पाठविणे चुकीचे ठरेल. एकाच आठवड्यात चीनने आपले सैन्य तिबेटमध्ये घुसविले. हिंदुस्थानच्या सीमेवर चिनी सैन्य दिसताच नेहरू संतापले पण त्यांना चीनच्या नेत्यांनी स्पष्टपणे ताकीद दिली की हे सैन्य साम्राज्यवादी वृत्तीचे परिणाम धुवून काढण्यासाठीच आहे.

२२ जून १९५१ रोजी मानवेंद्रनाथ रॉय यांचा एक लेख प्रसिद्ध झाला, "कम्युनिस्टांना माहीत आहे की ब्रिटिशांचा कोणताही परिणाम तिबेटवर राहिलेला दिसत










नाही. अमेरिकनांना तेथे शिरकाव करून घेता येत नाही. त्यांच्या लष्करी हालचालीचे खरे लक्ष हिंदुस्थानात आहे. आपल्या पंतप्रधानांच्या दृष्टीने विचार करता हा फार मोठा क्रूर आघात आहे. कारण, माओ-त्से-तुंगच्या हातात हात घालून आशियाचे आणि स्टॅलिनच्या प्रेरणेतून नव्या नैतिक कल्पनांसह जन्माला येणाऱ्या नव्या जगाचे नेतृत्व करण्याचे त्याचे स्वप्न यामुळे भंग पावत आहे." परंतु नेहरू आपल्या अलिप्ततेच्या धोरणात गुंग होऊन गेले होते. त्यांच्या भगिनी श्रीमती पंडित यांनी जेव्हा असे उद्‌गार काढले की, 'आशियातील कम्युनिझमच्या प्रसारापेक्षा युद्धाचा धोका हिंदुस्थानच्या दृष्टीने अधिक भयप्रद आहे तेव्हा नेहरूंच्याच विचारांचा त्यांनी पुनरुच्चार केला असे म्हटले पाहिजे." ७ डिसेंबर १९५०ला अगदी रागावून नेहरूही म्हणाले की "माझा देश, त्याचे मत आणि माझी निर्णयबुद्धि कोणत्याही एका देशाला किंवा कोणत्याही एका गटाला विकावयाची माझी मुळीच तयारी नाही." कम्युनिस्ट चीनच्या भयप्रद हालचालींच्या संदर्भात पार्लमेंटच्या काही सदस्यांनी नेहरूंना परराष्ट्रीय धोरणाचा फेरविचार करण्याची विनंती केली असता नेहरूंनी वर दिलेले उद्‌गार काढले.

तरीही तिबेटची शोकांतिका नेहरूंच्या परराष्ट्रीय नीतीला मोठेच भगदाड पाडून गेली. ३१ मार्च १९५१ ला न्यूयॉर्क टाइम्सला दिलेल्या मुलाखतीत त्यांनी कबूल केले की 'कम्युनिस्टांच्या हालचाली प्रदेश गिळंकृत करण्यासाठीच आहेत आणि माझे वैयक्तिक मत असे आहे की कम्युनिस्टपक्ष हा त्याबाबतीत वाटेल तो मार्ग आचरील.' नेहरूंना वाटले की ह्यावर एकच उपाय आहे आणि तो म्हणजे दक्षिण व आग्नेय आशियाचा आर्थिक विकास व्हावयास हवा.

ह्या वरील उपायाचा पाठपुरावा करण्यासाठीच कोलंबो योजनेत भारताने महत्त्वाचा भाग घेतला. भारत, पाकिस्तान, ब्रिटन, दक्षिण आफ्रिका, ऑस्ट्रेलिया, न्यूझिलंड आणि सिलोन यांनी दक्षिण व आग्नेय आशियाच्या विकासात सहकार्य करण्याचे ठरविले. सिलोनच्या सर जॉन कोटलवालाने Indian Council of World Affairs पुढे जानेवारीच्या तिसऱ्या आठवड्यात केलेल्या भाषणात म्हटले की दूरदृष्टीने कम्युनिस्टांच्या समस्येचा विचार केला पाहिजे. आशियाच्या निकृष्टप्रतीच्या राहणीमानाची जी अनेक कारणांची यादी त्यांनी नमूद केली त्यात आशियाच्या सर्वात अधिक उत्पादन करणाऱ्या विभागात कम्युनिस्टांच्या युद्धाच्या वणव्याने जो रक्तपात झाला आणि लूट झाली ही गोष्ट एक कारण म्हणून नमूद केली आहे. परंतु एकसंधीपणा विस्कळीत करण्याची ही प्रक्रिया सुरू झालीच होती.

डिसेंबर १९५३ मध्ये अमेरिका पाकिस्तानला लष्करी मदत देणार अशा वावड्या उठलेल्या होत्या. हिंदुस्थानात त्याबद्दल बरीच चर्चा सुरू झाली. १९ डिसेंबर १९५३ मध्ये डेहराडूनला भाषण करताना नेहरू म्हणाले : 'पाकिस्तानला अमेरिकेकडून लष्करी मदत मिळाली तर त्याचे केवळ हिंदुस्थानवरच नव्हे तर सर्व आग्नेय आशियावरही परिणाम होतील. या प्रदेशातील सत्तेचा समतोलच बिघडून जाईल. आशियाई राष्ट्रातील वसाहतींच्या वर्चस्वाविरुद्ध असलेली स्वातंत्र्याची चळवळ या मदतीने दडपली जाईल असेही नेहरूंना वाटले.

प्रेसिडेंट आयसेनहॉअरने मर्यादित प्रमाणात हिंदुस्थानाला देऊ केलेली लष्करी मदत नेहरूंनी नाकारली आणि ते आपल्या तटस्थतेच्या धोरणाला चिकटून राहिले. नेहरूंचे हे धोरण भारताला स्वागतार्ह वाटले; कारण अत्यंत अवजड होऊन बसलेल्या काश्मीरबाबत इतर तटस्थ राष्ट्रांचा पाठिंबा आपल्याला मिळेल असा विश्वास भारताला वाटत होता. १ मार्च १९५४ रोजी पार्लमेंटमध्ये नेहरू म्हणाले 'या दोन्ही देशांची धोरणे परस्परविरुद्ध आहेत.' परराष्ट्रीय राजकारणातील नेहरूंचे सल्लागार श्री. कृष्ण मेनन यानी एक पाऊल पुढे जाऊन सिटो कराराचे वर्णन 'an incipient and embryonic infringement of our peace area approach' या शब्दात केले.

विजयालक्ष्मी पंडित म्हणाल्या : "या सिटो करारात फक्त दोनच आशियाई राष्ट्रे सभासद झाली आहेत. इतर सभासद पाश्चात्त्य देश आहेत : त्यांना आशियाई देशांना शस्त्रे पुरवावीच लागतील. आणि एकदा शस्त्रांसाठी अवलंबून राहणे पत्करले की स्वातंत्र्यही गमावण्याची वेळ येते. आणीबाणीच्या काळात शस्त्रपुरवठा करणाऱ्या देशाचे वर्चस्व मानावेच लागते. या दृष्टीने भारताला असे वाटते की सिटो करार










म्हणजे आशियाई राष्ट्रांच्या स्वातंत्र्याला असलेला धोकाच आहे. शांतता स्थापणे हे या कराराचे उद्दिष्टच नाही – आशियाई लोक या युद्धात साधने म्हणून वापरले जातील."

### अलिप्तता व कम्युनिस्ट

दरम्यानच्या काळात कम्युनिस्टांना अलिप्ततेच्या धोरणात अनेक शक्यता जाणवू लागल्या. 'वर्ग-कलहाचेच वेगवेगळ्या कारणांनी रूपांतर होऊन युद्ध निर्माण होते या लेनिनच्या तत्त्वानुसारच त्यांनी उत्साहाने Clausewitz चा सिद्धांत अमलात आणावयास सुरुवात केली: 'शांततेच्या काळात तुमच्या शत्रूला मुत्सद्देगिरी आणि व्यापार या जोरावर निःशस्त्र करा म्हणजे युद्धभूमीवर तुम्ही त्यांना सहज जिंकू शकाल – या धोरणापणानेच चौ एन् लाय जून १९५४ मध्ये हिंदुस्थानात आले. आपल्या आंतरराष्ट्रीय संबंधातील 'हिंदी चिनी भाई भाई' घोषणेच्या युगाला प्रारंभ झाला. १९५७ पर्यंत नेहरूंना लाल चीनच्या योजनांचा अंदाज आला होता तरीही चीनचे विस्तारवादी धोरण हिंदुस्थानला फारसा धक्का पोहोचवणार नाही असे त्यांना वाटले. २७ नोव्हेंबर १९५९ ला पार्लमेंटमध्ये त्यांनी कबुली दिली की चीनमधील क्रांतीपासून नव्या चीनचे स्वरूप कसे असेल याकडे आमचे नेहमी लक्ष होते. तेथील क्रांती ही केवळ आमच्याच नव्हे, आशियाच्या नव्हे तर जगाच्या दृष्टीनेही एक फार महत्त्वाची गोष्ट होणार आहे हे आम्ही ओळखलेले होते. चीनच्या इतिहासाचा एक भाग आम्हाला माहीत आहे की ज्या ज्या वेळी चीनचे सामर्थ्य वाढते त्या त्या वेळी तो देश विस्तारवादी धोरणच स्वीकारतो. इतिहासाचा हाच एक निष्कर्ष आहे. झपाट्याने चाललेले औद्योगिकीकरण आणि त्याहून आश्चर्यकारक वेगाने वाढणारी लोकसंख्या या दोन्हीतून गंभीर धोकादायक परिस्थिती निर्माण होणार आहे हे आम्हाला माहीत होते. विस्तारवादी धोरण हिंदुस्थानला धोकादायक ठरेल हेही माहीत होते. याबाबत आपल्या व बाहेरच्या इतर देशातही विचारविनिमय झालेला होता. जशी अधिकाधिक वर्षे गेली तसे ते अधिक स्पष्ट होऊ लागले, जर कोणाला असे वाटत असेल की आपले चीनविषयक धोरण हे परिणामांची कल्पना नसल्याचे द्योतक आहे तर ते संपूर्णपणे चूक ठरेल. जर कोणाला असे वाटत असेल की आपण चीनला भिऊन त्यांचा अनुनय करीत राहिलो तर ही दुप्पट मोठी चूक ठरेल. या ठिकाणी एक प्रश्न विचारणे अगदी बरोबर ठरेल की मग हिंदी–चिनी भाई भाईची घोषणा का करण्यात येत होती ?

१९५४ च्या ऑगस्टमध्ये सर जॉन कोटलवालाने कोलंबो योजनेतील देशांच्या पंतप्रधानांची एक परिषद भरवून सिटोच्या ऐवजी Asian Locarno ची स्थापना करावी असे सुचविले. ह्यावर नेहरूंनी ॲफ्रो-आशियन परिषदेची योजना आखली आणि एप्रिल १९५५ मध्ये बांडुंग येथे परिषद घेण्यात आली.

बांडुंगची परिषद नुसतीच साम्राज्यशाही विरोधी न होता पाश्चिमात्य राष्ट्रांच्या विरोधीही ठरली. कृष्णमेनन त्या परिषदेत म्हणाले : 'अमेरिकेबद्दल सहानुभूति असलेल्या कोणाही व्यक्तीला आफ्रिका-आशियातील राष्ट्रांनी एकत्रितपणे व्यक्त केलेली भावना बोचल्याखेरीज राहाणार नाही. बांडुं परिषदेने नेहरूंच्या अलिप्ततावादी धोरणाचा उत्कर्ष स्पष्टपणे दर्शविला. परंतु त्याच वेळी लाल चीनने दक्षिण व आग्नेय आशियातील राष्ट्रांच्या घडामोडीत आपला प्रवेशही करून घेतला होता. या परिषदेमुळे नेहरूंनी पश्चिमी राष्ट्रांना दाखवून दिले की लाल चीनला आफ्रिकी व आशियाई राष्ट्रे आपल्या गटाबाहेरील समजत नाहीत. फिलिफाईन्सच्या Carlos Romulo यानी म्हटल्याप्रमाणे चौ–एन–लायचे सर्वतोपरी रक्षण करण्याची एखाद्या प्रेमळ मातेची वृत्ती या वेळी नेहरूंनी दाखविली.

परंतु लवकरच पंडित नेहरूंच्या आपल्या धोरणाच्या सामर्थ्याविषयीच्या आशा-अपेक्षांना मोठा धक्का बसला. २९ एप्रिल १९५४ मध्ये तिबेटसंबंधीच्या Sino Indian Agreement च्या वेळी त्यांच्या पंचशील तत्त्वांचा उदय झाला. परस्परांच्या देशावर आक्रमण न करणे, एकमेकांना मदत करणे, प्रादेशिक एकात्मतेचा आदर बाळगणे, समान दर्जा सांभाळणे, परस्परांचे हितसंबंध सांभाळणे आणि शांततापूर्ण सहजीवनाचा प्रयत्न करणे इत्यादि गोष्टी या पंचशीलमध्ये अंतर्भूत होत्या. परंतु हा करार होऊन सुद्धा लालचीनच्या दुष्ट हालचाली चालूच राहिल्यामुळे, हंगेरीतील क्रांतीच्या वेळच्या पाशवी अत्याचारामुळे व सुवेझ प्रकरणात








संघर्ष वाढविण्याच्या अमेरिकेच्या वृत्तीमुळे, नेहरूंना आपल्या धोरणाचा पुनर्विचार करावा असे वाटून ' पंचशील 'मधील तत्त्वे व अलिप्ततेचे धोरण भारतीय प्रदेशाच्या एकात्मतेच्या संरक्षणाच्या दृष्टीने पुरेशी नाहीत हे त्यांच्या ध्यानात आले असावे.

१९५७ साली परकीय हुंडणावळीमध्ये फार मोठी घट आली ( ६५० दशलक्ष डॉलर्स ) आणि हिंदुस्थानची दुसरी पंचवार्षिक योजना कशी पार पडेल असा पेच तयार झाला. लाल चीनचा योग्य रीतीने प्रतिकार करण्यासाठी भारताला केवळ स्वतःचे सामर्थ्य पुरे पडेना आणि सोवियट् रशियाची सदिच्छाही उपयोगात येईना. नेहरूंची १९५६ मधील अमेरिकेची वारी आणि १९५९ मध्ये आयसेन हॉअरने हिंदुस्थानला दिलेली भेट यांनी भारत-अमेरिकेचे संबंध बदलल्याच्या, सुधारल्याच्या काही खाणाखुणा दाखविल्या. ' राजकीय दृष्ट्या सत्तांचा समतोल राखावयास भारताचा उपयोग होतो आहे तेव्हा सुप्त अशी कोणतीही आक्रमक शक्ती अगदी सहजतया हा समतोल बिघडवू शकेल असे घडणार नाही ' हे नेहरूंना फार पूर्वी जरी कळले असले तरी प्रारंभीच्या काळापासूनच लाल चीनच्या धोकादायक हालचाली त्यांनी पुरेशा, नीटपणे ओळखल्या नाहीत हेही खरे. त्यामुळेच भारतापुढे विलक्षण अशा समस्या निर्माण होऊन बसल्या. त्यांच्या जागी एखादा चौफेर दृष्टीचा आणि कमी ध्येयवादी असा परदेशविषयक धोरणाचा सूत्रधार असता तर ह्या समस्या टाळता आल्या असत्या.

अलिप्ततावादी धोरण हे काही अंशाने भारताला ज्या वस्तुस्थितीला तोंड द्यावयाचे होते त्याचा विचार करूनही थोडेफार ठरविले गेलेले होते. हिंदुस्थानच्या ठिकाणी प्रत्यक्ष दिसू शकणारे असे सामर्थ्य तेव्हाही नव्हते आणि आजही नाही पण या देशाच्या ठिकाणी सामर्थ्याच्या सुप्त शक्यता ( शक्ति ) फार मोठ्या आहेत. भारताजवळ वसाहतीत व वसाहतीबाहेर वास्तव्य करणाऱ्या लोकांना आदर्श घालून देण्याचे सुप्त सामर्थ्य तेव्हाही होते व आजही आहे. अशा परिस्थितीत अलिप्ततावादाच्या धोरणाखेरीज नेहरूंना गत्यंतरच नव्हते. त्यांचा स्वतःचा कल, तरुण वयापासून कम्युनिस्ट विचारसरणी बाबतच्या बाळगलेल्या आशा, समाजवादी समाजरचनेचा त्यानी घेतलेला ध्यास आणि गांधीवादातील काही नैतिक तत्त्वांचा आंतरराष्ट्रीय धोरणात अंतर्भाव करण्याचा त्यांचा प्रयत्न या सर्वच गोष्टी लाल चीनच्या भारतावरील आक्रमणाने अत्यंत असमर्थ, दुबळ्या आहेत असे वाटू लागले. नेहरूंचा हेतू प्रबळ बलाढ्य राष्ट्रावर नैतिक दडपण राखण्याचा, भारताचे स्वातंत्र्य रक्षिण्याचा, आणि जगात व मुख्यतः आशियात सत्तेचा समतोल राखण्याचा होता. परंतु नेमके इथेच त्याचे धोरण संपूर्णतः नसेल -पण अयशस्वी ठरले एवढे खरे. जरी स्वतःच्या व स्वातंत्र्यप्रेमी आफ्रिकी, आशियाई लोकांच्या रीतसंबंधावर भारताला थोडे फार पाणी सोडावे लागले असले तरी अलिप्ततावादी धोरणाने दक्षिणेतील व आग्नेय आशियातील लोकशाही राष्ट्रांचे नेतृत्व करण्याची मोठी सुसंधी भारताला लाभली म्हणून धन्यवाद दिले पाहिजेत. अशी एक समजूत आहे की अलिप्ततेचे धोरण हे प्रत्यक्षतः दुर्बल पण नैतिक सामर्थ्याच्या दृष्टीने जगावर परिणाम करू इच्छिणाऱ्या राष्ट्रांच्या दृष्टीने अत्यंत हितावह, योग्य असेच ठरलेले आहे. परंतु सत्तास्पर्धेच्या राजकारणातील वस्तुस्थितीचे नीट आकलन झाले नाही या नेहरूंच्या परराष्ट्रविषयक धोरणातील उणिवेचे समर्थन आपण करू शकत नाही. नेहरूंच्या परराष्ट्रीय धोरणामुळे आपल्याला परकीय राष्ट्रांकडून मदत मिळत राहते आहे हा मुद्दाही वादाचाच एक विषय आहे.

---

श्री. आबू सैद अयूब

# पं. जवाहरलाल नेहरूंची धर्माकडे बघण्याची दृष्टि*

' द्वेषासाठी समानार्थी शब्द म्हणून धर्म नेहमी राहिलाच पाहिजे काय ? ' असा प्रश्न श्री. ए. एन. व्हाईटहेड यांनी १९३३ मध्ये आपल्या ' Adeventure of Ideas ' या ग्रंथात विचारला आणि त्यानंतर काही वर्षांनी या प्रश्नात गर्भित असलेला शोकजनक अर्थ आपल्या गळी उतरविण्यासाठी की काय पंडित नेहरूंनी आपल्या आत्मचरित्रात असे म्हटले की भारत हा धर्मप्रधान देश आहे हे त्याचे सर्वात मोठे वैशिष्ट्य आहे असे समजले जाते; आणि हिंदु, मुसलमान, शीख आणि इतर हे त्यांच्या धर्मविषयक श्रद्धांविषयी अभिमान बाळगतात व इतरांची डोकी फोडून आपले सत्य पारखून घेत असतात. नेहरूंचे आत्मचरित्र लिहिले गेले त्यावेळेपर्यंत धर्माच्या नावाखाली फक्त काही शेकडाच डोकी फोडली गेली होती. सुमारे एक डझन वर्षांनी ही संख्या काही हजारांवर गेली आणि नंतर एक वर्षाने ती कित्येक लाखात गेली. नंतरच्या काळात या संख्येत थोडी घट झाल्यासारखी दिसते. नंतर देवदेवतांना तहान लागलेली नव्हती असे एखादेच वर्ष मध्यंतरी गेले असेल–नसेल. नरयज्ञाच्या दृष्टीने १९५० साल हे तेजीचे होते. आणि १९६४ सालाने तर अधिक चांगले कार्य अगोदरच करून दाखविले आहे !

कोणीही आत्मविश्वासाने निश्चितपणे सांगू शकत नसले तरी आपण ( आपण सर्वजण ? ) अशी आशा बाळगून आहोत की धार्मिक रानटीपणाचा भयाण काळ आपल्यापुरता संपलेला आहे. १९३६ साली नेहरूनी जेव्हा घोषणा केली तेव्हा माझे मन त्यानी व्यक्त केलेल्या भावनांशी पूर्णपणे सहमत होते. नेहरूंनी म्हटले होते : ' ज्याला धर्म म्हणून संबोधतात त्याचे, निदान संस्थात्मक संघटित धर्माचे दृश्य रूप पाहून माझे मन भयग्रस्त होते. मी नेहमीच त्याची निर्भर्त्सना केलेली आहे व हे सर्व झटकून टाकावे अशी इच्छा बाळगीत आलो आहे. ' याच संबंधी लिहिताना श्री. व्हाईटहेड यानी यापेक्षा अधिक कठोर शब्द योजले आहेत. आणि विकारवश न होता परिस्थितीचे परिशीलन केले तर त्यांचे म्हणणे नेहरूंच्या विधानाइतकेच समर्थनीय आहे. ' प्राचीन काळापासून आजतागायत पर्यंतचा इतिहास हा धर्माच्या नावाखाली केलेल्या भीषण कृत्यांचा निराशाजनक इतिहास आहे. मानवी जीवनांतील रानटी प्रवृत्तीचे धर्म हे एक अखेरचे आश्रयस्थान आहे. तारतम्य न बाळगता धर्माचा सत्प्रवृत्तीशी संबंध जोडला जातो परंतु त्याच्यापेक्षा वस्तुस्थिती सरळ सरळ अगदी वेगळी आहे. ( Religion & the Making, Page 26 )

चालू काळातील सर्वश्रेष्ठ कृतिशील माणसात पंडित नेहरूंचा समावेश करता येतो. त्यांचे मन अत्यंत संवेदनशील आणि चिंतनशील होते. श्री. व्हाईटहेड याना चालू विज्ञानयुगातील महान विचारवंत म्हणून मी मानतो. धर्माचा जो जातीय स्वरूपाचा आविष्कार घडतो याचा दोघानाही अत्यंत तिटकारा होता. यामुळे धर्मकल्पनेचे शुद्ध सोज्वळ स्वरूप आणि धर्माचे संस्थात्मक संघटित स्वरूप यांच्यामध्ये या दोन्ही विचारवंतांनी गल्लत करण्याची चूक केली नाही. ही स्वरूपे एकच आहेत असे समजण्याची चूक होण्याची शक्यता आहे. वैचारिक नेतृत्व करणाऱ्या अनेक समकालिनांनी ही चूक केलेली आहे. नावेच सांगावयाची झाली तर रसेल आणि लेनिन या दोन प्रसिद्ध माणसांचा उल्लेख करता येईल. धर्मकल्पनेचे मूलभूत मर्म आणि त्या मर्माचा आविष्कार यातील भेद समजावून घेण्याचा गोंधळ, असा उल्लेख करून त्या गोंधळाचे स्वरूप निश्चित करण्यात कदाचित् माझ्याकडून चूक होत असेल. रूढ शब्द अचूक व निश्चित अर्थच्छटा दर्शविणारे नसल्यामुळे ज्यांच्यातील फरक सहज दाखविता यावा व ज्या गोष्टी परस्परापासून स्पष्टपणे वेगवेगळ्या आहेत त्या गोष्टींचा उल्लेख अखेर ' धर्म ' या शब्दानेच करावा लागतो. ' या शब्दाच्या मोघमपणामुळेच गोंधळ निर्माण होतो, वादावादी होते आणि योग्य युक्तिवाद केला तरी त्या शब्दांना

* Quest-autumn 64 या अंकातील लेखावरून अनुवादित.

हवे तसे अर्थ चिकटविले जातात' याची अत्यंत दुःखद जाणीव पं. नहरूंना होती.

## दोन प्रकारचे धर्म

धर्म या शब्दाच्या दोन अर्थाविषयी आपणास प्रामुख्याने विचार करावा लागेल. एक अर्थ व्यक्तीच्या केवळ स्वतःच्या जीवनाशी संबंधित असा आहे आणि दुसरा जातीच्या सामुदायिक जीवनाशी संबंधित आहे. वैयक्तिक धर्मासंबंधी काही ठाम विचार नेहरूंनी मांडले आहेत त्यासंबंधीचे विवेचन नंतर येईलच. परंतु जातीय धर्माविषयी किंवा संस्थात्मक संघटित धर्माविषयी नेहरूंचे मन हे काही पूर्वग्रहांनी व्यापलेले होते. गेल्या चाळीस वर्षात भारताच्या भूमीवर या संघटित धर्माने जे भीषण तांडव केले किंवा १९३० व १९४० च्या सुमारास युरोपमध्ये धर्म आणि वंश-विद्वेषाने साठ लक्ष निरपराधी आणि असहाय लोकांची-बायका-मुलांची जी कत्तल झाली ती ध्यानात घेतली तर नेहरूंच्या पूर्वग्रहांविषयी आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही. आश्चर्य हे की, संघटित धर्मवेडाने या राष्ट्रावर अरिष्ट ओढवले (राष्ट्राचे तुकडे पाडण्यात ज्याची परिणती झाली आणि तरीही ज्याचा शेवट झालेला नाही) तरीसुद्धा नेहरूंनी धर्माची व्याख्या करण्याचा प्रयत्न केला. त्यातला जातीय आविष्काराचा भाग त्यांनी दुर्लक्षिला आणि व्याख्या केली. या व्याख्ये-द्वारे जे सांगितले त्याला मी विल्यमजेम्सच्या प्रमाणे वैयक्तिक वा 'व्यक्तिगत धर्म' असे म्हणेन. पंडितजींच्या शब्दांतच त्यांचे म्हणणे देता येईलः—

'What then is religion (to use the word in spite of its disadvantages)? Probably it consists of the inner development of the iudividual, the evolution of his consciousness in a certain direction which is considered good. What that direction is will be a matter of debate, but as far as I understand it, religion lays stress on this inner change, and considers outward change as but the projection of this inner development.' (Autobiography, Ed. 1962 p. 379)

धर्माची अशी व्याख्या केली तर कोणताही विचारी माणूस ती अमान्य करील असे वाटत नाही. परंतु मुद्दा असा की आंतरिक विकास (inner development) हा काही पोकळीत घडून येत नाही, येऊ शकत नाही. व्यक्ति ही समाजात राहाते आणि विशिष्ट सामाजिक परिस्थितीत तिचा विकास घडतो. ही परिस्थिती वैयक्तिक विकासाला पोषक किंवा मारकही ठरू शकते. काही असाधारण व्यक्ति समाजाचा त्याग करून अरण्यात वडाच्या झाडाखाली बसून श्रेष्ठ आत्मोन्नतीप्रत जातील यात शंका नाही. परंतु बहुसंख्य तमाम जनतेस पुरुषांना आणि स्त्रियांना-हे जमणे शक्य नाही. ज्या परिस्थितीत नेहरूंना विचार करणे प्राप्त होते त्या परिस्थितीच्या आधारे सिद्ध झालेले तर्कशास्त्र नेहरूंना आणखी असे लिहावयास भाग पाडते की 'आंतरिक विकासासाठी सुद्धा बाह्य जीवनात स्वातंत्र्य आणि योग्य परिस्थिती यांची आवश्यकता असते.' परंतु Religion 'considers outward change as but a projection of this inner development' हे नेहरूंचे म्हणणे बरोबर आहे काय ?

चांगल्या जीवनासंबंधी इस्लाम धर्माची जी काही कल्पना होती त्या चांगल्या जीवनाची प्रगती होण्यास योग्य ठरेल अशी जी समाजसंघटना त्या धर्मास योग्य वाटली त्या समाजसंघटनेच्या बारीकसारीक गोष्टींकडे इस्लाम धर्माने अगदी प्रारंभापासून खूप लक्ष दिले. वैदिक धर्मात समाजसंघटनेची तत्त्वे एका धडाक्यात किंवा अल्पावधीत निर्माण झाली नाहीत. ती हळूहळू निर्माण झाली आणि एक हजार वर्षांचा कालावधी गेल्या-नंतर त्यांचे निश्चित, विस्तृत नियमात रूपांतर झाले. हे आपणास मनुस्मृतीमध्ये पाहावयास सापडते. यापूर्वीच्या काळात उपनिषदांच्या शिकवणीमुळे आत्मविकासावर एवढा भर दिला गेला होता की सामाजिक कर्तव्यांकडे लोकांचे फार दुर्लक्ष होऊ लागले होते. ज्यावेळी बुद्ध आणि जीन हे त्या काळातील चांगल्या लोकांची मने त्यांच्याकडे, विहारांकडे आकर्षून घेत होते त्यावेळी भगवद्गीतेच्या निर्मात्याला नवी तत्त्वप्रणाली मांडण्याची आवश्यकता आहे असे वाटले. ती तत्त्वप्रणाली म्हणजे सर्व श्रेष्ठ आत्मोन्नती करून घेऊन मोक्ष साधण्यासाठी जे तीन मार्ग आहेत त्यातला एक मार्ग म्हणजे आपली सामाजिक कर्तव्ये योग्य व विशुद्ध










बुद्धीने करणे हा आहे. असे असूनही काही नवीन सामाजिक ध्येये वा मूल्ये गीताकारांनी मांडली असे नाही त्यामुळे समाजसंस्थेत काही बदल व्हावा असा पुरस्कारही केलेला नाही. परंतु परंपरागत समाजरचनेचे संरक्षण करावे आणि मन लावून विहित कर्मे करावीत हे सांगितले आहे. ख्रिश्चन धर्मानेही, ख्रिस्ताच्या वेळीच नव्हे तर दोन तीनशे वर्षे लोटल्यानंतर, ख्रिश्चन पद्धतीने आयुष्य जगण्यासाठी योग्य समाजरचना करण्याकडे विशेष लक्ष पुरवले.

चांगल्या जीवनपद्धतीविषयी आपापल्या ज्या कल्पना आहेत त्याना अनुरूप असलेल्या समाज-संघटनांचे नियंत्रण करण्यासाठी काही तत्त्वप्रणाली मांडण्याच्या प्रश्नाकडे कोणत्याही धर्माने दुर्लक्ष केले नाही किंवा तो प्रश्न अंगाबाहेर टाकला नाही. दोष आहे तो अन्यत्रच आहे. समाजसंघटनेचा खालच्या पातळीवरून वरच्या पातळीवर अखंड विकास होत राहिलाच पाहिजे हे ध्येय मनश्चक्षूपुढे उभे करण्यात ते असमर्थ ठरले यात तो दोष आहे. धर्माच्या नावा-खाली प्रसंगोपात्त युद्धे झाली, कत्तली झाल्या आणि तरीसुद्धा जगातले सर्व जातीय धर्म हे सामाजिक स्थैर्याचे बळकट आधार ठरलेले आहेत. मानवी आयुष्याच्या प्रगत होणाऱ्या प्रवाहामध्ये बांध घालून ठेवणात व इतिहासाची साचलेली डबकी निर्माण कर-ण्यात या शक्ती न चुकता अतिशय प्रभावीपणे कारणी-भूत झाल्या आहेत ही खेदाची गोष्ट आहे. तुंबलेले पाणी पुन्हा खळखळते ठेवण्याकरता हे बंधारे फोडण्यासाठी युरोपमध्ये अनेक शतके प्रयत्न करावे लागले. भार-तात येथपासून तेथपर्यंत आपण या साचलेल्या डब-क्यांच्यामध्येच जीवन कंठित आहोत. जवाहरलाल नेहरूंना या परिस्थितीची जेवढ्या बारकाईने– लाग-ल्यास दुःखद रीतीने म्हणा– जाणीव आहे तेवढी या राष्ट्रात अन्य कोणासही नाही. समाजविकासाच्या प्रगत अवस्थेचे चित्र मनापुढे उभे करण्यात नेहरूंच्या बुद्धिमत्तेची विशेष चमक दिसून येते आणि हेच ध्येय डोळ्यापुढे ठेऊन त्यांनी आयुष्यभर काम केले; पहाटे-पासून मध्यरात्रीपर्यंत, चौऱ्याहत्तराव्या वर्षी त्यांना मृत्यु आला, अगदी त्याच्या आदल्या दिवसापर्यंत.

### जातीय धर्मांच्या वाढीची प्रक्रिया

काही असले तरी एका गोष्टीचा आपणास विसर पडता उपयोगी नाही. ती म्हणजे मुळात सर्वच जातीय धर्म ह्या क्रांतिकारक शक्ती होत्या. प्रस्थापित निष्ठा आणि रूढी यांच्याविरुद्ध त्या त्या धर्मसंस्थापकांनी बंड उभारले होते. काही धर्माबाबत असे म्हणता येईल की त्या त्या वेळच्या सत्ताधाऱ्यांना ते इतके धोकादायक वाटले की कायद्याच्या तंत्राचा अवलंब करून किंवा जनतेमध्ये प्रक्षोभ जागा करून त्या त्या धर्मांचे निर्मूलन करण्याची गरज प्रस्थापित सत्तेस वाटली. असा छळ चालला असता व अतिशय खडतर परिस्थितीतही त्या धर्मांनी आपल्या तत्त्वांचा प्रचार करण्याचे कार्य चालू ठेवले, आणि प्रस्थापित समाजसत्तेकडून ज्यांना जाच सहन करावा लागला होता त्यांना बाटवून आपल्या धर्माची दीक्षा दिली. त्यांची त्यांच्या तत्त्वावर जाज्वल्य निष्ठा होती आणि नैतिक धमक होती, सर्वत्र प्रकाश पसरावा अशी मानवतावादी कळकळ होती. या गोष्टी बाजूस ठेवून विचार केला तरी इतरांना ज्याची चटकन बाधा होईल अशा प्रकारच्या आकृष्ट करून घेणाऱ्या व्यक्तिमत्त्वांचा त्याना लाभ झालेला होता यांत शंका नाही. त्यांनी आपल्याभोवती लोक गोळा केले. जेथे जेथे ते गेले तेथल्या तेथल्या लोकांना त्यांनी बाटविले. ज्या कोणाचा उपहास झाला, टर उडवली गेली ती ती माणसे आज्ञा-धारकपणे त्यांच्याजवळ राहून त्यांची अनुयायी बनली. धर्मसंस्थापकाच्या हयातीतच किंवा त्यांच्या मृत्यूनंतर बाटवलेल्या लोकांची संख्या सपाटून वाढली. इतकी की प्रस्थापित वर्चस्वाला तोंड देऊन आत्मप्रतिकार करण्या-साठी आपली स्वतःची संघटना उभी करता यावी आणि त्याना जो नवा प्रकाश लाभला होता तो सुद्धा अद्याप अंधारातच चाचपडत राहिलेल्या लोकांपर्यंत पोचविता यावा. धर्माचा अत्यंत सहानुभूतीपूर्वक अभ्यास करणाऱ्या विल्यम जोन्सने Varieties of Religious Experience मध्ये म्हटल्याप्रमाणे कालांतराने, 'संघटित होण्याइतके सामर्थ्य या गटांना जेव्हा प्राप्त झाले तेव्हा त्या गटांच्याच धार्मिक संस्था झाल्या आणि त्यांच्या स्वतःच्या सामुदायिक महत्त्वाकांक्षा निर्माण झाल्या. अशावेळी राजकारण आणि ठामपणे सत्ता प्रस्थापित करण्याची लालसा ही या परिस्थितीत प्रविष्ट होण्या-साठी आणि मुळात अजाण असलेल्या गोष्टींना दूषित करण्यासाठी टपूनच बसलेल्या असतात.'








भावनेच्या दृष्टीने उन्नत करणारा, नैतिक दृष्ट्या स्फूर्ती देणारा धर्मसंस्थापकाचा वैयक्तिक अनुभव म्हणून धर्माचा प्रारंभ होणे, नंतर नवीन बाटवलेल्या लोकांच्या जळजळीत निष्ठेत आणि कळकळीत त्याचे रूपांतर होणे आणि अखेरीस साचेबंद कर्मठ श्रद्धात त्याची परिणती होऊन त्याभोवती कर्मकांडाचा बडिवार वाढतो हे धर्माचे सार्वत्रिक वैशिष्ट्य आहे. मानव्य नष्ट करणाऱ्या व आत्मा मारून टाकणाऱ्या संस्थांची निष्पत्ती यामधूनच होते. जीझस क्राइस्ट ते मध्ययुगीन ख्रिश्चन धर्म हा कालखंड म्हणजे वर सांगितल्याप्रमाणे स्थित्यंतर कसे घडून येते याचे उत्तम किंवा वाटल्यास अत्यंत वाईट म्हणा, उदाहरण आहे. धर्मपीठांची भुते आणि मिलिटंट चर्च ही या ना त्या आवरणाखाली जगातल्या सर्व मोठ्या धार्मिक समाजात वावरताना आढळतात. भारतातील दोन प्रमुख धर्मात तर विशेषच. कर्मठ मताच्या पकडीतून आपण मुक्त आहोत अशी वाजवी फुशारकी हिंदुधर्माने मारावयास हरकत नाही. धर्मांतर करविण्याचा त्याला तिटकारा आहे. तरीसुद्धा कडव्या व असहिष्णू अशा संस्थांचा उत्कर्ष त्यातून झालेला आहे. नेहरूंना त्यांच्या साऱ्या राजकीय जीवनात कट्टर हिंदु आणि मुसलमान यांच्यातील जातीयतेला तोंड द्यावयाचे होते. म्हणून धर्माचा जो देखावा दिसतो त्याबाबत ते एवढे का चिडलेले होते, संतप्त झालेले होते ह्याचे मर्म कळू शकते. परंतु धर्माविषयी ते अधीर वृत्तीचे होते याचे कारण गांधींविषयी त्यांच्या मनात असलेले नितांत प्रेम आणि एकनिष्ठा हे होय.

## गांधीजी आणि नेहरू यांच्या मतांचे वेगळेपण

गांधीजी मुळातच धार्मिक होते हे कोणीच नाकारलेले नाही. अगदी व्यापक अर्थाने ते धार्मिक नव्हते. सॉक्रेटीस, स्पिनोझा, व्हाइटहेड, आइन्स्टीन, टागोर, किंवा अगदी नेहरूही हे या 'विशुद्ध व व्यापक' अर्थाने धार्मिक ठरू शकतील. परंतु ज्यामुळे धर्माची वेगवेगळ्या समाजात विभागणी केली जाते त्या संकुचित अर्थाने गांधीजी हे धार्मिक होते. त्यांनी स्वतःचा हिंदु म्हणूनच विचार केला. 'a Hindu to the innermost depths of his being या शब्दात नेहरूंनी त्यांचे वर्णन केले आहे.

आपल्या काळात हिंदुधर्मात जे काही सर्वोत्कृष्ट आहे त्याचा उत्तम प्रतिनिधी कोण असा आपणास कोणी प्रश्न विचारला तर महात्माजींच्या खेरीज आपण दुसऱ्या कोणाचे नाव सांगणार ? अगदी विवेकानंदांचाही या वर्गात समावेश करणे मला कठीण वाटते. कारण ते असे म्हणाले नव्हते का की 'ज्या ठिकाणी वेद नाहीत, बायबल–कुराण नाही त्या ठिकाणाप्रत मला मानवजातीला न्यावयाचे आहे' ते आणखी म्हणाले होते की, 'स्वतःचा आत्मा म्हणून जो अखिल मानवजातीला मानतो व तिच्याशी अशा आत्मभावाने वागतो असा प्रत्यक्षातला अद्वैतवाद अजून सर्व हिंदुमध्ये विकसित व्हावयाचा आहे. उलट अशा समतेच्या पातळीवर बऱ्याच अंशी दैनंदिन जीवनात जर कोणत्या धर्माचे अनुयायी वागत असतील तर ते इस्लामचे आणि फक्त इस्लामचे. ज्या आपल्या मातृभूमीत दोन मोठ्या विचारपद्धतीची गाठ पडते तेथे वेदान्ताचा मेंदू आणि इस्लाम धर्माचे शरीर हीच एकमेव आशा आहे. याविषयी नेहरू म्हणतात की, हिंदूधर्माच्या कक्षांपलीकडे जाऊन स्वामी विवेकानंदांनी या ठिकाणी विचार केलेला आहे. दोन धर्मांच्या भेटीचे स्थान या दृष्टीने गांधींनी विचार केला नसता. परंतु त्यांनी जो विचार केला तोही तितकाच चकित करणारा आहे.

गांधींनी 'फेडरेशन ऑफ इंटरनॅशनल फेलोशिप्स' यापुढे १९२८ मध्ये जे निवेदन केले ते इतिहासात नमूद आहे. ते म्हणाले, 'प्रदीर्घ अभ्यास केल्यानंतर आणि भरपूर अनुभव घेतल्यानंतर मी काही निर्णयाप्रत आलो आहे. ते म्हणजे (१) सर्व धर्म सत्य आहेत. (२) सर्व धर्मात काही ना काही चुका आहेत. (३) मला माझ्या हिंदूधर्माइतकेच सर्व धर्म प्रिय आहेत. मला माझ्या धर्मश्रद्धांविषयी जेवढी पूज्यबुद्धी आहे तितकीच अन्य धर्मश्रद्धांविषयी आहे. मनापासून आचरणात आणले तर सर्व धर्म परमेश्वराप्रत घेऊन जातात हे गांधीपूर्वी अनेक संतमहंतांनी, विशेषतः हिंदूधर्मातल्या संत-साधुपुरुषांनी सांगून ठेवले आहे हे सत्य आहे.

पण याचा अर्थ असा नाही की सर्व मार्ग सारख्याच लांबीचे आहेत किंवा सारखेच मऊ आहेत.

" शेख काबाच्या मार्गाने देवापर्यंत पोचला आणि मी मनाच्या मंदिराद्वारे पोचलो. ध्येय एकच होते, फक्त मार्ग वेगवेगळे होते ' असे कवीने म्हटले असले तरी तो कोणत्या मार्गाला मान्यता देतो हे कळून येण्यास अडचण पडत नाही. परंतु जेव्हा गांधी म्हणतात की ' मला माझ्या धर्मश्रद्धांविषयी जेवढी पूज्यबुद्धी आहे तितकीच अन्य धर्मश्रद्धांविषयी आहे ' तेव्हा त्यांना जे म्हणायचे होते ते त्यांनी नेमकेपणाने म्हटले आहे, आणि केवळ विनम्रतेमुळे किंवा काही राजकीय हेतू साधण्यासाठी त्यांनी असे म्हटले नाही याविषयी आपण निःशंक खात्री बाळगावयास हरकत नाही. अशा प्रकारचे विधान त्यांनी अतिशय प्रामाणिकपणे व दृढ निष्ठेने केले. कारण, ' त्यांच्या धर्मकल्पनेचा कोठल्याही कर्मठ मतांशी, रूढींशी किंवा कर्मकांडाशी संबंध नव्हता. नैतिक मूल्यांवर त्यांची जी अढळ श्रद्धा होती तिच्याशी त्यांच्या धर्माचा मूलभूत संबंध होता. या नैतिक मूल्यालाच ते सत्य किंवा प्रेम म्हणून संबोधतात. हिंदुधर्माचे मर्म आपण समजावून घेण्याची भूमिका घेऊन जी जी वचने किंवा आचार त्यांच्या आदर्श धर्मकल्पनेत बसले नाहीत ते ते भाग धर्मांत कोणीतरी नंतर घुसडले असले पाहिजेत असे म्हणून त्यांनी टाकून दिले.' (Discovery of India. P. 366 ).

मग विवेकानंदांप्रमाणेच गांधीजी हेही हिंदुधर्माच्या कक्षेपलीकडे गेले आहेत काय ? किंवा त्यांच्या विशेष उदार प्रवृत्ती आणि कल्पना या हिंदुपरंपरेच्या व्यापक प्रवाहाचेच भाग आहेत असा विवेकानंद व गांधीजी या दोघांचाही विश्वास होता काय ? किंवा आपण नव्या मार्गाने चाललो असलो तरी परंपरेचा असा विकास घडवून आणण्याची ताकद आपल्या प्राचीन धर्मश्रद्धांनीच निर्माण केली असे या दोघांचेही मत होते काय ? हा शेवटचा पर्याय बरोबर असण्याची बरीच शक्यता आहे. परंतु स्वामी विवेकानंद व गांधीजी यांच्या या धर्मकल्पनेतून हिंदुधर्माचे खरे मर्म प्रकट होत असेल तर कोण हिंदु होणार नाही ? आणि हिंदु धर्माशी कोण भांडण करील ?

जाता जाता येथे एका गोष्टीचा उल्लेख करतो. ती म्हणजे ' Six Lectures on the Reconstruction of Religious Thought in Islam ' या पुस्तकात महंमद इक्बाल यानीही वरीलप्रमाणेच मुस्लीम परंपरेच्या कक्षा ओलांडल्या आहेत. हे पुस्तक आहे त्याहून अधिक चांगल्या रीतीने समजावून घेतले गेले पाहिजे. यातील एका व्याख्यानात खातिमुल–अंबिया या शेवटच्या प्रेषिताच्या इस्लाम धर्माच्या कल्पनेविषयी अतिशय अर्थपूर्ण स्पष्टीकरण केले आहे. प्रेषितांच्या दीर्घ परंपरेचा शेवट करणारे आपण आहोत अशी घोषणा महंमदाने का केली ? धार्मिक विकासाची परमोच्च अवस्था कुराणात गाठली गेली आणि अखेरी पूर्णावस्थेस पोहोचलेला धर्म निर्माण केला यात अधिक सुधारणा घडवून आणणे शक्य नव्हते आणि म्हणून आता आणखी कोणी नवा प्रेषित अवतरू शकणार नाही. ' असा वरील प्रश्नाचा अर्थ सनातनी जुनाट पद्धतीने लावला जातो. परंतु इक्बालने याचा अगदी वेगळा अर्थ लावला.

आपण म्हणतो की माणूस हा विचारशील प्राणी आहे. परंतु पन्नास हजार वर्षांपूर्वीच्या दोन विचारशील माणसांचे तो अपत्य आहे काय ? व्यक्तिमात्रामध्ये विचारशीलता ही अतिशय हळूहळू वाढत असते. जोवर ह्या विचारशक्तीचा विकास खालच्या पातळीवरच होता. जीवनातली उद्दिष्टे साधण्यास विशेषतः माणसाला योग्य मार्गाचे मार्गदर्शन करण्यास पुरेसा नव्हता तेव्हा त्याच्या नैसर्गिक विचारशक्तीला दैवी शक्तीची जोड देण्याची गरज होती; उदा. साक्षात्काराच्या मार्गाने दैवी मार्गदर्शन करणे. इक्बाल असे म्हणतो की इस्लामच्या आगमनामुळे तर्काच्या निगमन पद्धतीच्या शोधामुळे मानवी विचारशक्तीने विकासाच्या दिशेने झेप घेतली. अनुमानाची ही तत्त्वपद्धती याच्या नंतरच्या काळात बेकनने शोधून काढली हे खरे असले तरी दहाव्या व अकराव्या शतकातील रझी, अविसेन्ना, अलहाझेन इ. अरबी शास्त्रज्ञ या पद्धतीचा उपयोग आत्मविश्वासाने व त्यांच्या शास्त्रीय कार्यात यशस्वी होत करीत होते. नव्या ऐतिहासिक परिस्थितीच्या बदलत्या गरजा भागविण्यासाठी नव्या प्रेषिताला नव्या जाणिवेने पुढे येण्याची गरज वाटली असली पाहिजे. इक्बाल म्हणतो, या काळात आपल्या वैयक्तिक आणि सामाजिक प्रश्नांची सोडवणूक करून आपणास केवळ विचाराच्या आधारावर मार्गदर्शन करण्याची ताकद मानवाच्या








विचारशक्तीत आलेली होती. ज्यांच्याद्वारे मानव-जातीला दैवी मार्गदर्शन घडते अशा प्रेषितांच्या मालिकेतला महंमद हा शेवटचा होय. साक्षात्कारावर आधारलेला इस्लामधर्म हा शेवटचा धर्म होय. यापुढे धर्म नव्या पायावर उभा राहिला पाहिजे. तो म्हणजे विचारशक्तीच्या पायावर.

पुन्हा मुख्य विषयाकडे वळून म्हणावयाचे म्हणजे, गांधींच्या हिंदुधर्माचा कोठल्याही कर्मठ मताशी किंवा रूढीशी किंवा कर्मकांडाशी संबंध नव्हता असे असूनही पंडित नेहरूंचे त्यासंबंधी काय भांडण असू शकेल ? असे असूनही अशी काही क्लेशदायक प्रकरणे होती की ज्याबाबतीत त्यांना या महान मार्गदर्शकाशी हातमिळवणी करावी लागत होती. पहिली गोष्ट अशी की नैतिक आणि राजकीय प्रश्न सोडविण्यासाठी विचारशक्तीचा उपयोग करावा असा नेहरूंचा आग्रह होता. हा एकच मार्ग उपलब्ध आहे असे त्यांना जाणवले. परंतु गांधींचा मार्ग भिन्न होता. जेव्हा जेव्हा राष्ट्रात आणीबाणीची परिस्थिती निर्माण झाली आणि नेहरूंसह सर्वांनी गांधीजींकडे पाहिले तेव्हा तेव्हा गांधींनी परमेश्वरावर हवाला ठेवला. प्रकाशकिरण दिसावा म्हणून ते वाट पाहात थांबले, त्यांच्या ‘आतल्या आवाजाची’ त्यांनी प्रतीक्षा केली. नेहरू हे मान्य करतात की गांधींच्या सहजप्रवृत्तींचा कौल बरोबर असे. या सहजप्रवृत्तीसाठी स्फूर्ती किंवा आतला आवाज याऐवजी ‘इन्स्टिंक्टस’ हा शब्द योजणे नेहरू पसंत करतात.

अशा आणीबाणीच्या परिस्थितीत नेत्याने सहज-प्रवृत्तीस प्रमाण मानून वागावे याला त्यांचा विरोध नाही. परंतु कोठल्याही परिस्थितीचे मर्म नेत्याने विचारशक्तीने ओळखायलाच हवे आणि आपल्या राजकीय निर्णयाबाबत त्याने पुरेशी कारणेही द्यावयास हवीत; ज्यावेळी इतरांनी आपल्यामागे यावे असे वाटते तेव्हा तर ती द्यावयास हवीतच. गांधींच्या कृतीचे नव्हे परंतु त्यांनी अशावेळी जी कारणे पुढे केली त्यांनी नेहरूंच्या मनाला दुःख झाले. आपल्या आत्मचरित्रात त्यांनी यासंबंधी म्हटले आहे, ‘कायदेभंगाची चळवळ गांधींनी बरखास्त केली हे बरोबर केले. परंतु त्यांनी त्याची जी कारणे दिली ती म्हणजे बुद्धीचा अपमान आहे, आणि राष्ट्रीय चळवळीच्या पुढाऱ्याचे हे कृत्य थक्क करून टाकणारे आहे असे मला वाटले. त्यांच्या आश्रमातील सहकाऱ्यांना त्यांनी हव्या त्या पद्धतीने वागविण्याचा त्यांना पूर्ण अधिकार आहे, त्यांनी सर्व प्रकारच्या आणाभाका घेतल्या आहेत आणि विशिष्ट अमलाखाली वागण्याचे स्वीकारले आहे. परंतु काँग्रेसने तसे स्वीकारले नव्हते. मी तसे स्वीकारले नव्हते. जी कारणे मला आध्यात्मिक आणि गूढ स्वरूपाची वाटली, आणि ज्या कारणाबद्दल मला स्वारस्य नव्हते त्यासाठी आम्हाला एकदा या बाजूला आणि एकदा त्या बाजूला का म्हणून टोलवायचे ? कोठलीही राजकीय चळवळ अशा पायावर चालावी याची कल्पना तरी करवते काय ? ’

१९३४ साली बिहारमध्ये जो भूकंप झाला त्यात हजारो लोक भरडून निघाले. त्यांच्या यातनांच्या हृदय फाडून टाकणाऱ्या दृश्यांनी गांधी व नेहरू या दोघांच्या मनावर अगदी भिन्न स्वरूपाचे परिणाम झाले. गांधींनी त्यांच्या मनाच्या धार्मिक ठेवणीनुसार त्याचा अर्थ लावला आणि त्यांच्या नेहमीच्या दुसऱ्या जगाच्या परिभाषेत त्यावर मत प्रकट केले. नेहरूंची प्रतिक्रिया अगदी तीव्र होती, भूकंपाने हादरा दिलेल्या भागात मी दौऱ्यावर असताना ‘अस्पृश्यतेच्या पापाबद्दल मिळालेली ही शिक्षा आहे’ हे गांधींचे निवेदन वाचताना मला जबरदस्त धक्का बसला. हा अभिप्राय लटपटायला लावणारा होता. आणि रवीन्द्रनाथ टागोरांनी त्याला जे उत्तर दिले त्याच्याशी सहमत होऊन त्या उत्तराचे मी स्वागत केले. शास्त्रीय दृष्टिकोनांच्या यापेक्षा अधिक विरोधी काही असेल याची कल्पना करणेही जड जाईल’ ( नेहरूंचे आत्मचरित्र ) नेहरू सर्वात अस्वस्थ कशाने झाले असतील तर त्यांना असे वाटले की ‘मानवी दुःखाविषयी अशी वृत्ती स्वीकारली तर सामाजिक कार्यकर्ते ज्या कळकळीने काम करीत आहेत तिच्यावर वाईट परिणाम होईल– कारण दैवी निर्णयानुसार भोगाव्या लागणाऱ्या परिणामाची तीव्रता कमी करण्याचा प्रयत्न करणे म्हणजे परमेश्वरी योजनेत व्यत्यय आणल्यासारखे आहे असे त्यांना वाटणार नाही का ? ’

अर्थात मूलभूत संघर्ष हाच होता की नेहरू हे सामाजिक यंत्रणेचे जाणकार होते तर गांधी हे आत्मिक व्यथा बरे करणारे होते. गांधींना प्रत्येकाच्या डोळयातील



अनुक्रमणिका






प्रत्येक अश्रू पुसावयाचा होता यात शंका नाही. परंतु हे करायचे ते उत्पादनाचे प्रमाण आणि उत्पादनापाठी-मागच्या प्रेरकशक्तीत बदल घडवून आणून नव्हे तर लोकांचा मनात परिवर्तन घडवून आणून, गरजांचे प्रमाण मोजके ठेऊन आणि त्या भागविण्यासाठी लोकांनी स्वतःहून प्रयत्न करावेत (खरे म्हणजे मॅन्युअल लेबर) यासाठी लोकांना साध्या राहाणीची आणि शुद्ध जीवनाची शिकवणूक देऊन. तपःसाधनेचे प्राचीन ध्येय गांधींच्या अंगी बाणलेले होते तर 'तपस्वीपणाचे जीवन हे काही व्यक्तींना मानवणारे असले तरी सर्व समाजाचे ध्येय म्हणून ते नेहरूंना पसंत नव्हते.'. या सर्वापेक्षाही नेहरूंच्या मनात भीती आणि उदासीनता निर्माण झाली (त्यांच्या आत्मचरित्रात एका प्रकरणाचे शीर्षकच 'Desolation' असे आहे. त्या प्रकरणात, 'माझ्यापासून गांधींना तोडून दूर नेणारे अफाट अंतर' याविषयी नेहरूंनी लिहिले आहे) याचे कारण एका विशिष्ट पातळीच्यावर, यालाच नेहरू तपस्वी-जीवनाची पातळी मानीत. लोकांचे राहणीमान उंचवावे यात गांधींना स्वारस्य नव्हते एवढेच नाही तर लोकांच्या सामाजिक आणि आर्थिक उन्नतीच्या आड नेमकी जी प्रस्थापित हितसंबंधी मंडळी येत होती त्यांना गांधी सक्रीय पाठिंबा देत होते. Gandhi is always laying stress on this idea of the trusteeship of the feudal prince, of the big landlord, of the capitalist. in this he follows a long succession of men of religion' जमिनींची मोठी मालमत्ता जमीनदारांनी आपल्या ताब्यात कशी लज्जास्पद मार्गांनी आणली त्याची संक्षिप्त कूळकथा देऊन नेहरूंनी असे म्हटले आहे, 'गांधीजींच्या मते, ज्या लोकांच्या जमिनी ह्यांनी आपणहून काढून घेतल्या आहेत त्या दुःखी लोकांसाठी हे विश्वस्त आहेत!' नेहरूंच्या पुढील उद्गारात त्यांच्या स्वरातल्या यातना आपल्या पुन्हा ध्यानात येतात : 'तर मग जे काय जसे चाललेले आहे ते तसेच राहायला हवे. चालू परिस्थिती बदलून टाकण्यासाठी प्रयत्न करू नयेत, एकूण जी काय गरज आहे ती म्हणजे लोकांच्या हृदय-परिवर्तनाची, हाच या साऱ्याचा अर्थ होतो. जीवनाकडे आणि जीवनातील प्रश्नांकडे बघण्याची ही शुद्ध धार्मिक प्रवृत्ती आहे.' (नेहरूंचे आत्मचरित्र– पृ. ५३६).

यामुळे ओघानेच आणि अगदी अटळपणे 'माझा साचलेला राग काही अंशी धर्माकडे आणि धार्मिक दृष्टिकोनाकडे वळला.' धर्माला अनेक दशके व एका महान धर्मात्म्याच्या ठिकाणी असणाऱ्या धार्मिक प्रवृत्तींना अगदी जवळून नेहरूंना तोंड द्यावे लागले नसते तर त्यांचा क्रोध याहून कमी संयमित झाला असता. सर्व प्रकारचे संघर्ष आणि राग असूनही गांधीं-विषयी असलेल्या गाढ प्रेमाला आणि त्यांच्याविषयी अगदी लहानमुलासारख्या वाटणाऱ्या भक्तीला कधीही तडा गेला नाही. एका धर्मवेड्या हिंदूकडून गांधींचा वध झाल्यानंतर काही तासांनी ते अगदी मनापासून म्हणाले, 'आमच्या आयुष्यातून प्रकाश निघून गेला आहे.' नेहरूंना गांधीजी हे 'काळोखाला भेदून जाणाऱ्या प्रकाशशलाकेसारखे' भासले ... ते कुठून वरून उतरले नव्हते, ते भारतातल्या लक्षावधी लोकातून वर आले आहेत, त्यांची भाषा बोलून एक-सारखे त्यांच्याकडे आणि त्यांच्या घाबरवून टाकणाऱ्या परिस्थितीकडे लक्ष देत आहेत असे वाटले. (The Discovery of India) लोकांच्या घाबरून टाकणाऱ्या परिस्थितीविषयी गांधीइतकेच नेहरूही संवेदन-शील होते परंतु गांधींची भाषा त्यांना पुरती समजली नाही. याचे नेमके कारण असे की ती लक्षावधी लोकांची भाषा होती. नेहरू केवळ उच्चवर्गीय सुशि-क्षितांची भाषा बोलत होते व ती समजू शकत होते. त्यांचा संघर्ष हा केवळ भाषेचा संघर्ष होता असे सूचित करण्यासाठी हे लिहिले नाही. त्या संघर्षाची मुळे खोलवर गेलेली होती.

### धर्माविषयी नेहरूंचे आक्षेप

जातीय आणि संस्थात्मक संघटित धर्माविरुद्ध नेहरूंनी काही दूरगामी आक्षेप घेतले आहेत. विचारा-साठी विचार करण्याच्या भूमिकेतून नव्हे तर कृतिशील माणूस म्हणून. आणि हेही अगदी राजकीय आणि सामाजिक क्षेत्रातले प्रत्यक्ष कार्य करीत. त्याच्या मध्यावर आले तेव्हापासून. स्थूल मानाने हे आक्षेप तीन गटात मांडता येतील. ते असे :

(१) संस्थात्मक संघटित स्वरूप धर्माने धारण केले की तो प्रस्थापित हितसंबंधाचे स्वरूप घेतो आणि बदल व प्रगती यांच्याशी अपरिहार्यपणे विरोधी बनू लागतो.








(२) नेहमीचा धार्मिक दृष्टिकोन हा स्वच्छ विचाराचा शत्रू आहे. कारण हा दृष्टिकोन केवळ विशिष्ट पक्के आणि न बदलणारे सिद्धान्त आणि कर्मठ मते याविषयी कसलीही शंका न घेता स्वीकार करण्यावरच आधारलेला असतो. एवढेच नव्हे तर तो भावना आणि वासना यावर आधारलेला असतो. तो संकुचित असतो आणि अन्य मते आणि कल्पना यांच्याविषयी तो असहिष्णू असतो.

(३) सामान्यतः धर्माला देवाच्या किंवा पूर्णतत्त्वाच्या समाजजीवनाशी संबंध नसलेल्या शोधाचे स्वरूप येते आणि धार्मिक माणूस हा समाजाचे चांगले कसे होईल यापेक्षा त्याला स्वतःला मुक्ती कशी मिळेल याविषयी अधिकात अधिक काळजी करतो ... नैतिक मूल्यांचे सामाजिक गरजांशी नाते नसते परंतु पापाच्या श्रेष्ठ प्रतीच्या आध्यात्मिक तत्त्वावर ती आधारलेली असतात.

या निबंधाच्या पुढच्या भागात या तीन मुद्यांवर मी माझे भाष्य केलेले आहे.

## लेखकाचे नेहरूंच्या विचारांसंबंधी विवेचन

(१) पहिल्या मुद्यासंबंधीच्या नेहरूंच्या कल्पना या धर्माविषयी मार्क्सवादी भाष्य जे आहे त्याच्याशी घनिष्ठपणे जुळत्या आहेत. धर्माला ' The opium of the peaple ' म्हणावे या मर्यादेपर्यंत दोघांची मते जुळतात असे मात्र नाही. उलट, नेहरूंना पूर्ण जाणीव होती की आपली दुःखे विसरण्यासाठी सामान्य जनांना मादक द्रव्ये वगैरे देण्याच्या भानगडीत न पडता खिस्तपूर्व साहाव्या शतकातल्या बुद्धापासून ते आपल्या काळातील पोपपर्यंत धार्मिक विचारांचे नेतृत्व करणाऱ्यांनी ' मानवी आयुष्यावर आघात करणाऱ्या अनिष्ट गोष्टींवर आणि संकटांवर इतर कोणापेक्षाही अधिक भर दिला आहे. समाजवादी पुढाऱ्यांचे कोठे सहमत होत असेल व कोणत्या बाबतीत ते धार्मिक नेत्यांच्या विरोधी असतील तर ते म्हणजे-चांगल्या गोष्टी किंवा जगण्यासाठी आवश्यक असलेल्या मूलभूत गरजा ज्यांच्यापासून हिरावून घेतल्या गेल्या आहेत त्यांनी आता यापुढे अशा वंचित स्थितीत राहाण्याचे कारण नाही. (आधुनिक विज्ञान आणि औद्योगिक तंत्रविद्या यांचे आभार मानले पाहिजेत) अर्थात याला प्रस्थापित हितसंबंधी लोकांकडून विरोध होईल हे वेगळे. धर्म हाही एक प्रस्थापित हितसंबंधी लोकांचा कारभार आहे आणि तो सत्ता आणि संपत्तीच्या क्षेत्रातील हितसंबंधी लोकांशी हातमिळवणी करतो. समाजविकासाच्या बाबतीत हा अधार्मिक संधी जबरदस्त खीळ घालतो आणि क्रांतीचे आव्हान मिळाले की निर्लज्जपणे कडवे रूप धारण करतो. दुष्ट शक्तींची ही भयानक युती पाकिस्तानात अधिक आढळून येते. पाकिस्तानात झिरझिरीत वेषांतर केलेली धर्माधिष्ठित-फॅसिस्ट पद्धतीची हुकूमशाही आहे. परंतु भारतात सुद्धा ( पाकिस्तानात घडलेल्या दंगलीशी स्पर्धा करणाऱ्या ) नुकत्याच झालेल्या जातीय दंगलीत फॅसिझमला वाव मिळाला ही गोष्ट कोण नाकारील ? या दंगली होऊन गेल्या त्यानंतर नेहरूंच्या मृत्यूचे संकट भारतावर कोसळले. यामुळे अर्ध्या मध्ययुगीन अव-स्थेतल्या भारतातली आधुनिकीकरण घडवून आणणारी आणि प्रगत अशी अत्यंत प्रभावशाली शक्ती भारतास सोडून गेली.

भारतात लोकशाही समाजवाद अंगिकारणे आणि तटस्थतावादी धोरण परराष्ट्राशी संबंध ठेवताना अवलंबणे हे अवघड असेल; परंतु नेहरूंच्या नंतर राज्यावर येणाऱ्या त्यांच्या वारसदारांच्या ताकदीबाहेरचे खचित नाही. परंतु संकुचितपणातून बाहेर पडून व्यापक दृष्टि स्वीकारण्याचे जे कार्य नेहरूंच्या रूपाने अवतरले होते ते कार्य तसे पुढे चालू ठेवणे मात्र सध्याच्या नेत्यांना शक्य आहे. याबाबतीत आपण करू शकतो-ती आशा नेहरूंच्या मृत्यूनंतर काही दिवसानी आकाशवाणीवर भाषण करताना राष्ट्रपती राधाकृष्णन् म्हणाले, 'आपल्या राष्ट्राच्या उभारणीमध्ये नेहरूंचा मुख्य भर कर्मठ श्रद्धांच्या दडपणाखालून आपली मने मुक्त करण्यावर होता. आपण हे जर विचारात आणि आचारात उतर-विले तर नेहरूंना साजेसे असे स्मारक केल्यासारखे होईल.

(२) नेहरूंनी धर्माविषयी, त्याच्या कर्मठ स्वरूपा-विषयी जे आक्षेप घेतले आहेत त्यांचा आता विचार करू. डिस्कव्हरी ऑफ इंडियामध्ये त्यांनी लिहिले आहे : ' एखाद्या देवतेचा, किंवा कोठल्याही अज्ञात श्रेष्ठ शक्तीला मानवी रूप देण्याचा विचार करण्यास

# पं. जवाहरलाल नेहरूंची धर्माकडे बघण्याची दृष्टि

मी असमर्थ आहे असे माझ्या ध्यानात येते, आणि अनेकजण मात्र तसा विचार करतात याचे मला आश्चर्य वाटत आले आहे. व्यक्तिरूप देवाची कल्पना मला मोठी विचित्र वाटते. तरीसुद्धा व्यक्तीला देव मानणे हा धार्मिक प्रवृत्तीचा एक भागच आहे असे मला वाटते. माणसाचा धर्मविषयक जागरूकपणा अशा एका उंचीला पोहोचला होता की त्या ठिकाणी व्यक्तिरूप परमेश्वरावरील किंवा कोणत्याही प्रकारच्या देवावरील श्रद्धा तो झुगारून देऊ शकला हे खरे आहे. प्रारंभीच्या काळातील उपनिषदांमध्ये ही वृत्ती दिसते. अशीच प्रारंभीच्या बुद्धधर्मामध्येही दिसते. परंतु या मधल्या बदलत्या अवस्था होत्या आणि अशा विचारांचा उदय झाला तरी एका उच्च थरातील बुद्धिमतांच्या सुशिक्षितांच्या वर्तुळाबाहेर त्यांचा प्रसार झाला नव्हता. देव हा मानवीरूपासारखाच आहे, माणसाचे गुणधर्मही त्याच्या ठिकाणी आहेत या विषयीची श्रद्धा यानंतर लवकरच पुन्हा उदयाला आली आणि जगातील मोठमोठ्या धर्मांच्या मानसिक ठेवणीवर या श्रद्धेचे वर्चस्व चालत आलेले आहे. ह्यातील परमेश्वर हा सर्वशक्तिमान नियंता, कठोर न्यायाधीश, प्रेमळ पिता असा आहे. तो मनापासून भजणारांना त्याची यथोचित पूजा केली असता त्यांच्यावर कृपा करतो व सांगितलेली कामे योग्य रीतीने केली असता प्रत्येकास त्याचे फळ देतो किंवा ती करण्यात कुचराई झाल्यास शिक्षा देतो. अशी ही या मानवरूपगुणधारी देवाची कल्पना आहे. काही जमातींची किंवा संप्रदायांची अशी श्रद्धा आहे की त्यांचा देव बळी दिलेल्या प्राण्याचा स्वीकार करतो आणि बोकड, गाय, म्हैस किंवा उंट त्याच्या नावाने मारला की खूष होतो. सर्वांचा असा विश्वास आहे की आपल्या सर्वांच्या मध्ये आत्मा नावाची एक अद्‌भुत शक्ति आहे. काही बाबतीत ही शक्ती कोणालाही समजलेली नाही. ती मनापेक्षा अगदी भिन्न आहे. अर्थातच शरीराप्रेक्षाही वेगळी आहे. शरीर विघटित झाले आणि मनही विघटित झाले ( मन आणि मज्जातंतूचे केंद्र ह्यात असलेले जवळचे नाते हा आता वादाचा विषय राहिलेला नाही ) तरी हा आत्मा जिवंत राहतो. नंतर तो दुसऱ्या मानवी शरीरात किंवा प्राण्याच्या गर्भपिंडात स्थलांतर करतो आणि पुढील जन्मात अगोदरच्या जन्माच्या संचित कृत्यांची सुखदुःखात्मक फळे भोगतो किंवा कोठल्यातरी अज्ञात प्रदेशात लक्षावधी वर्षे परमेश्वरी न्यायाचा दिवस उजाडेपर्यंत वसाहत करतो. या दिवशी त्याच्या लेखी असलेले पारितोषिक किंवा असलेली शिक्षा भोगण्यासाठी तो आपल्या पुनर्जात शरीरात प्रवेश करतो. हिंदुधर्माच्या शाखोपशाखात अन्य काही महत्त्वाच्या तात्त्विक बाबतीत भेद असले तरी त्या भेदांनी मुळीच बाधित न होता कर्म आणि पुनर्जन्म ह्या विषयीची कर्मठ श्रद्धा या सर्व शाखोपशाखांना व्यापून आहे. ह्याचे दर्शन मोठे मनोरंजक आहे. कर्म आणि पुनर्जन्म यावरील श्रद्धेच वैशिष्ट्य The Unique Hindu theodicy of the social, that is to say, caste system या शब्दात मॅक्स वेबर- ( Max weber ) ने सांगितले आहे. प्रत्येक धर्मांत इतरांच्या पेक्षा वेगळ्या प्रकारची कर्मठ मते आहेतच. सर्व धर्मांची एकता व्हावी या कल्पनेने मोहित झालेले लोक या भेदांकडे दुर्लक्ष करतात किंवा ते नाकारतात परंतु हे वस्तुस्थितीपासून दूर पळण्यासारखे आहे. आपण प्राथमिक अवस्थेतील टोळ्यांचे धर्म बाजूला ठेवून आजच्या केवळ प्रगत धर्मांचा जर विचार केला तर एकमत असलेल्या काही गोष्टी आढळून येतात त्याचप्रमाणे भेदांचे मुद्देही आढळून येतात. त्यापैकी एकाला एखादा विचार मूलभूत महत्त्वाचा वाटला तर दुसऱ्याला तो टाकाऊ वाटेल, दुर्लक्षणीय वाटेल. सनातनी खिस्ती मेरीच्या पुत्राला, येशूला परमेश्वराचा अवतार मानतात; सनातनी मुसलमानांच्या दृष्टीने मूर्तिपूजा करणे यासारखे दुसरे महान पाप नसेल. तीन तत्त्वांच्या एकतेची खिस्तीलोकांची कल्पना हिंदूंना घरचीच वाटणारी आहे पण मुसलमानांच्या दृष्टीने ती निंद्य ( anathema ) आहे. 'प्राचीन काळाच्या अखेरीस' सती जाणे हे एक धार्मिक कृत्य आहे असे हिंदु मानीत. ही क्रूर प्रथा व तिच्यापाठीशी उभी असलेली मान्यता 'ही अनेक शतके बुद्धिमान आणि सुसंस्कृत लोकांनी सहन केली' असे डॉ. कालीकिंकर दत्त यांनी म्हटले आहे. ह्याच अधिकारी लेखकाने ह्या प्रथेच्या मुळाशी असलेल्या समजुतीचे स्वरूप खालील शब्दात स्पष्ट केले आहे : 'अशी स्त्री आपल्या पतीबरोबर स्वर्गामध्ये शाश्वत सुखाचा उपभोग घेईल एवढेच नव्हे तर आपल्या

पतीच्या माता-पित्यांकडील तीन पिढ्यांचे पाप धुवून टाकील. १८ व्या शतकांत हिंदुस्थानवर राज्य करणाऱ्या खिस्ती राज्यकर्त्यांच्या नैतिक सहनशक्तीला 'या धार्मिक कर्तव्याने' धक्का दिला आणि राजा राममोहन रॉय, ब्राह्मोधर्माचे संस्थापक, यानी अनेक वर्षे अविश्रांत प्रयत्न करून अखेरीस या चालीविरुद्ध लोकमत जागरूक केले. अपेक्षेप्रमाणेच 'राजा राधाकांत देव यांच्या नेतृत्वाखाली सनातनी हिंदूनी राममोहन रॉय याना कडवा विरोध केला. भावनांचा प्रक्षोभ एवढा वाढला की—राममोहन रॉय याना दगाफटका करण्याची धमकी देण्यात आली.'

परस्परांशी अगदी विरुद्ध असलेल्या विचारावर दोन माणसांचा ठाम विश्वास असूनही त्यासंबंधी वैचारिक कारण देण्यास ते असमर्थ असतात, त्यावेळी ते आपापल्या बाजूला पुष्टी देण्यासाठी एखादे आप्तवाक्य पुढे करतात, ( दुसऱ्या पक्षाच्या माणसाकडून तडकाफडकी असे आप्तवाक्य नाकारले जाते ) अशा दोन माणसांची ज्यावेळी परस्परांशी गाठ पडते तेव्हा त्यांनी आतापर्यंत ज्या गोष्टी स्वयंसिद्ध आणि धर्माच्या दराऱ्यामुळे आघातापासून सुरक्षित मानलेल्या असतात त्याविषयी शंका घ्यायला सुरवात केली पाहिजे; नाहीतर दुसरा वैचारिक अंधारात किंवा नैतिक विकृतीत वावरत आहे असा एकमेकांचा तिरस्कार करण्यास शिकले पाहिजे. धार्मिक समाज हे परस्परांपासून अगदी वेगळे आणि परस्परांविषयी अज्ञान बाळगून राहिल्याशिवाय तिरस्कार आणि असहिष्णुताविरहितपणे कर्मठ श्रद्धा, जगू शकणार नाही. हीधन, काफीर, आणि म्लेंच्छ हे तिरस्काराचे शब्द आहेत.

आपल्या ठराविक मताप्रमाणे जे वागत नाहीत त्यांच्याविषयी द्वेष बाळगला जातो. याची उलट बाजू म्हणजे अशा मताशी जे सहभागी होतात त्या गटाच्या गळ्यात गळा घालणे ही होय. माणसाचा धर्म हा खास स्वतःच्या वैयक्तिक अनुभवावर अधिष्ठित असा असेल तर कोणत्याही बाह्य आघातापासून त्याला बाधा होणार नाही. आणि आत्मानुभवाचे स्वरूपच बदलले तरच तो बदलू शकेल. धर्म हा विचारावर आधारलेला असाही असेल. तत्त्वज्ञानाच्या किंवा विज्ञानातील सिद्धांत ज्याप्रमाणे तग धरतात त्याप्रमाणे जोवर त्यांची विचारशक्ती टीकाकाराच्या आक्षेपांना तोंड देईल तोवर ती न डळमळता तग धरू शकेल. एखाद्या गटाचा पाठिंबा मिळाला तर ठीकच परंतु विचारप्रधान धर्माला तो आवश्यक आहे आणि त्याखेरीज चालू शकणार नाही असे मात्र नाही. किंवा एखाद्याचा धर्म हा कर्मठपणावर आधारलेला असेल. धर्माचरण करणाऱ्या शंभर माणसांपैकी नव्याण्णव लोकांचा धर्म या प्रकारचा असतो. आणि तो भंगण्याची मोठी शक्यता असते. आतल्या आत तो अत्यंत खिळखिळा असतो. निदान त्यातल्या सुशिक्षितांना तरी हे जाणवत असते. हा अंतर्गत कमकुवतपणा शक्तीचा बाह्यात्कारी देखावा तयार करून अगदी स्वतःपासूनही लपवावा लागतो. (कर्मठ श्रद्धांच्या घोषणा कशा कर्कश आणि आक्रमक आवाजात दिल्या जातात हे आपण ऐकले नाही काय ? ) आणि अनुभव किंवा विचारशक्तीचा आधार न मिळाल्याने स्वतःच्या गटाचा एकमुखी पाठिंबा असल्याचा टेकू त्याला द्यावा लागतो. हा गट जेवढा मोठा असतो तितके एकेकाला अधिक बरे वाटते. कर्मठ श्रद्धा आल्या की त्यामुळे स्वतःच्या गटाविषयी जबरदस्त ओढ वाटण्याची गरज निर्माण होते. तसेच आपल्याबाहेरच्या गटाविषयी द्वेष आणि त्यांच्यापासून दूर राहण्याची भावनाही तितकीच बलवत्तर असते. कर्मठ श्रद्धा जातीयतेला जन्म देतात आणि तिचे पोषण करतात. ( धर्मप्रवण समाजातील सुशिक्षित वर्ग डोळ्यापुढे ठेऊन मी हा सर्व निबंध लिहिला आहे हे या ठिकाणी सांगायला हरकत नाही. अशिक्षित आणि अर्धशिक्षित जनतेचा सामाजिक प्रश्न याहून वेगळाच आहे. मला वाटते तो यापेक्षा अधिक सोपा आहे. विश्वविद्यालयातून शिक्षण घेऊन बाहेर पडणारे लोक जरा अधिक विचारप्रधान दृष्टिकोनातून पाहातील तर कमी शिकलेल्यांना दुष्ट आणि धोक्याच्या मार्गाकडे वळवले जाणार नाही. )

हिंदुसमाजाच्या घडणीत वांशिक घटक किंवा वंशाच्या शुद्धतेच्या व श्रेष्ठतेच्या फसव्या कल्पनांचा भाग जेवढा आहे तेवढा कर्मठ मतांचा भाग ( खिश्चन आणि मुसल्मान समाजाप्रमाणे ) नाही ही गोष्ट खरी आहे. परंतु यामुळे समाजासमाजात सद्भावना आणि एकात्मता घडवून आणण्याचा प्रश्न अधिक सोपा होतो असे मात्र नाही. वंशविषयक द्वेष हा धार्मिक द्वेषा-








पेक्षाही दूर करणे अधिक अवघड आहे. कारण ज्याचा द्वेष केला जातो असा माणूस धर्मांच्या क्षेत्रात निदान धर्मबंधू तरी मानला जातो.

शेवटी एक मूलभूत आणि सर्वव्यापी अशा कर्मठ-श्रद्धेचा उल्लेख करतो. उरलेल्या सर्व गोष्टी त्यात येतात. तो म्हणजे एक किंवा दोन हजार वर्षांपूर्वी रचलेला एखादा ग्रंथ किंवा ग्रंथमालिका म्हणजे परमेश्वराचेच शब्द आहेत, निदान काही झाले तरी माणसाचे शब्द नाहीत. म्हणजेच ते अपौरुषेय आहेत, परमेश्वरानेच उच्चारले आहेत आणि अमानुष अशा माध्यमाच्या साह्याने ते स्वर्गीय देवाकडून प्रेषिताकडे पोचविले गेले आहेत किंवा सर्व सत्याचे भूत, वर्तमान, भविष्य यांचे प्रत्यक्ष ज्ञान असणाऱ्या द्रष्ट्यांना स्फुरले आहेत आणि म्हणून ते निःशंकपणे, अचूकपणे आणि पूर्णपणे सत्य आहेत. यावर विश्वास असणाऱ्यांची संख्या फार मोठी आहे. व्यक्तिरूप परमेश्वरावर श्रद्धा ठेवल्यापेक्षाही हे अधिक थक्क करणारे आहे.

आपल्याकडील संवेदनशील, स्वच्छ आणि तरुण मनांवर अशा सर्व श्रद्धांचे प्रयत्नपूर्वक दृढ संस्कार केले जातात. उदास चेहेरे असलेल्या माणसांनी त्यांच्या तशाच आवाजात आपणास सांगितले आहे की यापैकी कोठल्याही गोष्टींचा–थोडक्यात म्हणजे Sacred Scriptures मध्ये जे सांगितले आहे त्याविषयीसंशय घेणे किंवा त्याविषयी शंका प्रदर्शित करणे हे भयंकर पाप आहे. याविषयी संशय घेणाऱ्याला किंवा यांना नाकारणाऱ्याला नरकात किती भयानक, दीर्घकालीन (की कायमच्या) यातना भोगाव्या लागतील याचा तपशीलही आम्हाला दिला गेला. दीर्घकाळ चालत आल्यामुळेच ज्यांच्या संबंधी आदरबुद्धी बाळगली जाते अशा ठराविक व शाश्वत कर्मठ तत्त्वांचा नाखुषी न बाळगता स्वीकार करणे नेहरूंच्या साक्षेपी आणि अखेरच्या दिवसापर्यंत ताज्यातवान्या असणाऱ्या मनाला अशक्यच होते. परंतु त्या पुरातन काळात निर्माण झालेल्या समजुती ती तत्त्वे केवळ त्यांच्या पुरातनत्वामुळेच आजच्या काळातील बौद्धिक व नैतिक गरजा भागविण्यास असमर्थ ठरत नव्हती काय ? हे नाकारले जात नव्हते; खरा जोर जर कशावर दिला जात असेल तर तो हा की मागचे युग हे सत्य युग होते व आजचे कलियुग आहे या विश्वासावर, ते युग सत्यकल्पनेच्या व देवाच्या साहचर्याने पुनीत झालेले होते. आजचे तसे नाही. भूतकालातील श्रद्धा आणि जीवनमूल्ये आजच्या काळातील गरजांच्या अनुषंगाने बदलावयास हवीत असे नाही तर आजच्या काळातील लोकांनी आपल्या मनात आणि आपल्या आयुष्यात बदल करून ते जुन्या दोन–तीन हजार वर्षांपूर्वीच्या काळातील सत्याच्या–औचित्याच्या कल्पनेशी जुळते करून घ्यावयास हवे असे मानले जाते. मला वाटते, धार्मिक वृत्तीची जर व्याख्या करावयाची झाली (अपुरी परंतु पुष्कळशी अचूक व्याख्या) तर ज्या लोकांना सुवर्णयुग (सत्ययुग) पूर्वीचे होऊन गेले असून त्यानंतरच्या काळात बौद्धिक नैतिकदृष्ट्या अधःपतनच चालू झालेले आहे असे वाटते तेच खरे धार्मिक म्हणता येतील. आणि ह्या उलट आपले सुवर्णयुग भविष्यकाळात निर्माण होणार आहे, त्यासाठी वैयक्तिक व सामाजिक प्रयत्नांनी एकेक पायरी ओलांडत, एकेक वीट रचत वाटचाल करावयाची आहे असे जो मानतो तो विज्ञान व नैतिक निष्ठा बाळगणारा असे म्हणता येईल.

काहीही असो एवढे खरे की येथे नेहरूंची वृत्ती स्पष्ट होते. परंतु ज्या लोकांमध्ये नेहरूंना राहावयाचे होते, काम करावयाचे होते त्यापैकी काही पूर्णतः विशुद्ध धार्मिक वृत्तीचे तर काही वैज्ञानिक वृत्तीचा अगदी पुसटता स्पर्श झालेले होते. त्यांची मने भूतकाळाचीच अपत्ये होती, त्यांच्या मूलभूत श्रद्धा, समजुती मूल्ये त्यांना लहानपणीच लाभलेली होती. त्यांना हे कधी समजले नाही आणि संस्कृतीचा व सुशिक्षितपणाचा अभिमान बाळगणाऱ्या बहुसंख्यांना, (उच्चशिक्षणाची संधी ज्यांना नाकारलीच गेली त्यांच्याबद्दल मी काहीच म्हणत नाही) सत्ताधिष्ठित असलेल्यांना, व राजकीय, शासकीय, वाङ्मयीन आणि धर्मपीठातील आपल्या देशात वजन असलेले जे लोक होते त्यांनाही हे समजले नाही की प्रौढ बुद्धिमान सुशिक्षित म्हणून जुन्या सनातनी कर्मठ तत्त्वांचे आणि वृत्तीचे विश्लेषण करणे, त्याचे मूल्यमापन करणे, त्याचा बारकाईने विचार करणे, अनेक शतकांच्या मानवी अनुभवाच्या आणि शोधाच्या इतिहासात ज्या गोष्टी असत्य ठरल्या आहेत, ज्यांचा पोकळपणा सिद्ध झालेला आहे, किंवा ज्या वृत्ती घातक वाटल्या आहेत त्यांचा विवेकबुद्धीला








टोचणी न लागता त्याग करता आला पाहिजे आणि उरलेल्या गोष्टींकडेही खुल्या मनाने पाहता आले पाहिजे हे आपले कर्तव्य आहे हे समजले नाही. An unexamined Life is not worth living हे भूतकाळातील श्रेष्ठ तत्त्व त्यांना कधी उमगलेच नाही. अशा लोकांच्या मेळाव्यात वावरताना नेहरूंना एकाकी वाटले, परकेपणा वाटला, ज्या भारतावर मी प्रेम केले होते, ज्याच्यासाठी कष्ट केले तो देश मला नेहमीच अद्‌भूत व विस्मित करणारा वाटला. खरोखरच माझ्या देशबांधवांच्या विचार-पद्धतींशी व वृत्तींशी मला समरस होता आले नाही हा माझा दोष होता काय ? अगदी माझ्या निकटच्या सहकाऱ्यांमध्ये आणि माझ्यामध्ये एक अदृश्य अशा प्रकारची भिंतच उभी आहे असे मला वाटते. जुन्या जगाच्या आवरणात ते जगतात. जुनी ध्येये, आशा, वासना यांचे जग !' थोडे विषयांतर करून मला विचारावेसे वाटते की कोणत्याही देशातील बहुसंख्य लोकांची विचार करण्याची जी पद्धती असते आणि धर्मविषयक जी वृत्ती असते त्याच्याशी नेहरू कधीतरी एकरूप झाले असते का ? अंधश्रद्धा आणि कर्मठपणा भारतात अधिक असेल पण हे काही फक्त भारताच्याच मालकीचे धन आहे असे नाही.

## सर्व मानवजातीची संस्कृती एकच

प्राचीनांनी आपल्या पुढील पिढ्यांसाठी कलानिर्मितीच्या, धर्माच्या, नैतिक शोधांच्या, तात्त्विक अनुमानांच्या व वैज्ञानिक संशोधनाच्या द्वारे ठेवलेल्या वारशाबद्दल अभिमान व आदर बाळगणे ही एक गोष्ट आहे आणि भौतिक व दैवी गोष्टींबद्दल त्यांनी वा त्यांच्यापैकी काही जणांनी व्यक्त केलेले अभिप्राय सर्वप्रकारचे विचार गुंडाळून ठेवून जसेच्या तसे स्वीकारणे ही अगदी वेगळी गोष्ट आहे. भारताच्या परंपरेने चालत आलेल्या सांस्कृतिक धनाबद्दल नेहरूंना असलेला सखोल आदर त्यांच्या डिस्कव्हरी ऑफ इंडियामध्ये अगदी स्पष्ट दिसतो; त्याचप्रमाणे शरणागत वृत्तीचा, जुन्या श्रद्धा व रूढींबद्दल असणाऱ्या दास्यत्वाच्या भावनेचा त्यांना असलेला तिरस्कारही तितकाच स्पष्टपणे दिसतो. ' भूतकाळाचे दडपण चांगल्या आणि वाईट दोन्ही गोष्टींचे असते. ते पूर्ण कबजा घेणारे आणि गुदमरून टाकणारेही आहे. विशेषतः जेव्हा आपण स्वतःला भूतकाळातील एखाद्या विशिष्ट प्रकारच्या घटनेशीच पूर्णतः व स्वतःच्या सर्व अस्तित्वाचा विलय करून बांधून घेतो तेव्हा तर ते असेच असते. म्हणज मग मी वारस तरी कशाचा आहे ? ' नहरूंनी हे विचारून उत्तर दिले आहे ' लक्षावधी वर्षांत सर्व मानवजातीने जे संचित कमावलेले आहे, ते वाटले आहे, भोगले आहे, ज्याचा विचार केला आहे, ज्याचा आनंद लुटत आहे...त्या सर्वांचा आणि सर्व मानवजातीला सामान्य असे जे जे आहे त्या सर्वांचा मी वारस आहे' (Discovery of India p. 22) आजकाल जगातील विविध देशामध्ये, लोकांमध्ये, विविध प्रकारची दळणवळणाची साधने उपलब्ध झालेली असताना, प्रत्येक देशाच्या भिन्नभिन्न कालखंडातील वैशिष्ट्यपूर्ण कमाई बाबतची माहिती उपलब्ध झालेली असताना आपण कोणत्याही एखाद्या भौगोलिक, वांशिक किंवा धार्मिक परंपरेचे वारस नसतोच, आपण सर्व मानवजातीचीच परंपरा पुढे चालविणारे असतो हे नेहरूंनी पुनरावृत्ती करून वारंवार सांगितले आहे.

हिंदु ' हिंदु ' म्हणून आणि मुसलमान ' मुसलमान ' म्हणून ज्या संस्कृतीचा अभिमान बाळगतात त्याचा नेहरूंनी तिरस्कारच केला. वस्तुस्थिती ( reality ) काय आहे ह्याचे जर ज्ञान या लोकांना झाले तर मुसलमानी संस्कृती, हिंदु संस्कृती या कल्पनाच लयाला जातील असे नेहरूंना वाटत असे. वस्तुस्थिती याचा नेहरूंचा अर्थ आजची शास्त्राधिष्ठित संस्कृती, तिचे परिणाम, औद्योगिक क्रान्ती असा आहे. मुसलमानी संस्कृती, व तिने आपल्याबरोबर आणलेली चित्रकला, शिल्पकला संगीतादि क्षेत्रातील पर्शियन् व अरेबिक संस्कृतीतील मूलभूत तत्त्वांची ठेव हे सर्व आता हिंदु संस्कृतीच्या व्यापक प्रवाहात पूर्णपणे मिसळून गेले आहे. तेव्हा हिंदु संस्कृतीच्या अभिमान्यांनी हा आपला सर्वांचाच वारसा आहे, हिंदूंचे, मुसलमानांचे असे काही वेगळे घटक दाखविता येण्यासारखे नाहीत हे पूर्णपणे ओळखावे. मुसलमानांना नेहरूंनी अगदी निःसंदिग्धपणे सांगितले 'धर्मसमजुतीला आवाहन न करता इस्लामपूर्व काळातील वैभवाकडे इराणने दृष्टी ठेवली आहे. ग्रीकांना ख्रिश्चनधर्म स्वीकारल्यानंतर आपल्या पूर्वजांच्या प्रचंड कर्तृत्वाचा

विसर पडलेला नाही. भारताच्या भूतकाळातील विविधता व वैभव ही सर्व भारतीयांची निर्मिती आहे. हिंदु मुसलमान ख्रिस्ति आणि अन्य धर्मीय या सर्वांनीच तिच्या निर्मितीला हातभार लावलेला आहे. दुसऱ्या कोणत्याही धर्मश्रद्धेचा स्वीकार केल्याने ह्या परंपरेशी असलेला त्यांचा संबंध तुटत नाही ( Discovery of India p. 343 )

## आजच्या हिंदु-मुसलमानांकडून अपेक्षा

प्रा. बश्म ( Bashm ) यांच्या उत्कृष्ट ग्रंथातील एका अवतरणाचे अनुकरण करून मी असे म्हणेन की, 'भारताचे लोकविलक्षणत्व' समजावून घेण्याची आणि त्याचा आनंद लुटण्याची वृत्ती आपल्या अंगी कितपत बाणलेली आहे हाच आपल्या सुसंस्कृतपणाच्या पातळीचा एक निकष आहे असे भारतांतील मुसलमानांनी मानावे. आजच्या सुसंस्कृत मानवाने आपण पूर्वीच्या सर्व मानवजमातींच्या सांस्कृतिक संचिताचेच वारस आहोत असे मानावे असे पूर्वी म्हटलेच आहे. परंतु अर्थातच प्रत्येकाला त्याच्या स्वतःच्या जाती जमातीच्या सांस्कृतिक धनाच्या इतिहासातून तयार झालेले एक नाते– हे एक प्रकारचे रक्ताचेच नाते असते– जर आजच्या काळातील भारतातील एखादा मुसलमान विसरू लागला किंवा अधिक वाईट गोष्ट म्हणजे हे नाते नाकारू लागला तर तो आपल्या पितृभूमीशी अप्रामाणिक असल्याचा दोष त्याच्या पदरी येईल; आणि जर एखादा हिंदु आपली वेदकालीन, महाभारत कालीन व अभिजात वाङ्मयाच्या काळातील संस्कृती हा केवळ हिंदूंचाच वारसा आहे असे मानेल तर तो त्या संस्कृतीचा अवमान ठरेल.

( ३ )नेहरूंच्या तिसऱ्या आक्षेपाचा विचार करता मला हे प्रथमतः सांगायला हवे की धर्मप्रवण व्यक्ति ही आपल्या बांधवांच्या हालअपेष्टांकडे लक्ष पुरवत नाही आणि ह्या दृष्टीने ती समाजपराङ्मुख आहे हे खरे नाही. प्रत्येक धर्मांत आश्रमवासी, अरण्यवासी संन्यासी आणि देवकल्पनेने भारावून गेलेले लोक असतात यात शंका नाही. पण त्यांची संख्या नेहमीच फार थोडी असते. नेहरूंनी आपले धर्मविरोधी आरोप-पत्र तयार करीत असताना त्यांचा विचार केला नव्हता. आणि इतर लोकांचा विचार करता जरी धर्मविषयक ध्येय तत्त्वे ( म्हणजे देवकल्पनेवरील विश्वास आणि सर्व प्रजेच्या हिताची काळजी परमेश्वरच करील असे मानण्याची वृत्ती ) समाजसेवा करण्यास फारशी उत्तेजन देणारी नसतील असे वाटत असले तरी प्रत्यक्षात त्या तत्त्वांनी असे घडलेले नाही. कारण धर्माला अंतर्विरोधाचे वावडे नाही. आणि म्हणूनच प्रत्येक धर्मांत जरी परमेश्वर सबळ कारणाशिवाय कोणाला हालअपेष्टा सोसायला लावत नाही हे तत्त्व आढळत असले ( पूर्वी केलेल्या पापांबद्दल ती शिक्षा असेल, देवश्रद्धेची ती कसोटी पाहिली जात असेल किंवा दुःखाच्या खाईतून आत्मसामर्थ्य निर्माण करावयाचे असेल ) तरी त्या आपत्तीचे प्रयोजन संपताच त्या आपत्तीही नाहीशा होतात. ह्या बरोबरच आपल्याला गरजूंची सेवा करण्याची व त्यांच्यासाठी त्याग करण्याचीही धर्माज्ञा आढळते. वेगळया भाषेत सांगायचे म्हणजे 'जनसेवा हीच ईश्वर सेवा' असेही धर्मतत्त्व आढळते. इतिहासात नोंदविल्या गेलेल्या अनेक निस्वार्थी महनीय कृत्यांच्या व अनेक व्यक्तींच्या कार्यामागील प्रमुख प्रेरणा धर्मभावनेची होती हेही आपण मान्य केले पाहिजे.

म्हणजे आपली धर्मविरोधी बाजू नेहरूंना नीट मांडता आली नाही असा ह्याचा अर्थ घ्यायचा की काय? खरोखरीच तसे नाही. फक्त त्यांची समाजाच्या भल्या संबंधीची मूळधारणाच, धार्मिक प्रवृत्तीच्या माणसाच्या धारणेहून फार वेगळी आहे. व्यक्तिमात्राची दुःखातून सोडवणूक करण्याचे कर्तव्य जरी धर्माने मानलेले असले तरी ज्या सामाजिक परिस्थितीतून मुख्यतः ही दुःखे निर्माण होतात त्या परिस्थितीकडे लक्ष दिलेले नाही. नेहरूंना दुःखाचे केवळ वरवरच आविष्कार पुसून टाकायचे नव्हते तर त्याच्या मुळापासूनच्या खाणाखुणा नाहीशा करून टाकावयाच्या होत्या.

फार फार वर्षांपूर्वी गौतम बुद्धाला सव दुःखाचे बीज वासनेत, तृष्णेत सापडले आणि सर्व तृष्णाच नाहीशा करणे हा उपाय त्याने सांगितला. ह्या श्रेष्ठ प्रवर्तकाबद्दल सखोल आदर असूनसुद्धा नेहरूंनी हे अलौकिक उपाय फार असामान्य महात्म्यांसाठी आहेत असे मानले. जीवनाच्या मूलभूत गरजा भागविण्यासाठीच मोठा झगडा करावा लागत असल्याने ज्यांचे विचार केवळ शारीरिक पातळीवरच खिळून राहतात

अशा सामान्य मर्त्य माणसांसाठी-सामाजिक रचने-बाबतच काही ऐहिक मार्ग अवलंबून त्यांच्यासाठी पुष्कळ काही करता येईल असे नेहरूंना वाटत असे. माणसाला अधिकाधिक माणसासारखे जगता यावे यासाठी समाजरचना बदलावयास हवी हेच आपले सर्वप्रथम असे नैतिक कर्तव्यच आहे असे नेहरूंना वाटे. धर्म त्या मार्गात आडवा येऊ लागला; तो स्थैर्याचा भोक्ता होता. म्हणूनच काही वेळा नेहरूंना ' cerasez I infame ' असे उद्गार काढावे असे वाटले असावे. परंतु व्हॉल्टेअरचे हे उद्गार असेच्या असेच नेहरूंनी काढले नाहीत कारण त्याच्यापेक्षा ( किंवा ह्याबाबतीत मार्क्सपेक्षाही ) ते अधिक सुसंस्कारित, दयाळू आणि समतोल बुद्धीचे होते. म्हणूनच अवास्तव विधानांचा त्यांना तिरस्कार वाटत असे. त्यानी विचार केला आणि असे म्हटले की धर्म हा वाईट आहे पण तो अगदी पूर्णपणे वाईट नाही. अगदी कठोर टीकाप्रहार करीत असतानाही धर्मामुळे घडलेल्या हितकारक गोष्टी त्यानी स्पष्टपणे सांगितल्या. परंतु संस्थात्मक संघटित धर्माचे दिवस आता सरलेले आहेत. मानवतावाद आणि विज्ञान हे त्याची जागा घेण्यास पुढे सरसावलेले आहेत ( विज्ञान म्हणजे वैज्ञानिक दृष्टी, सत्यभक्ती, अनुभव प्रमाण मानण्याचा निश्चय असे नेहरू मानत. ) अशी नेहरूंची खात्री पटलेली होती.

## समारोप

**मग ह्यापुढे धर्मांचे भवितव्य काय ?** धर्माची गरज आणि आवश्यकता आजच्या जीवनात नाहीच का ? ह्या निबंधाच्या सुरुवातीलाच मी म्हटले की धर्म ह्या शब्दाच्या जातिसंबंधित व व्यक्तिसंबंधित कल्पनेचा विचार आपल्याला करावयाचा आहे. आतापर्यंत आपण पहिल्याच अर्थाचा विचार केला आहे. ज्यावेळी सामाजिक जीवनातून धर्मकल्पना जाईल- आणि तो लवकरात लवकर जगातून जावा, विशेषतः हिंदुस्थातून जावा यासाठी नेहरू फार उत्सुक होते—आणि त्यांच्यासाठी स्वानुभवाचे व भावनेचे जग एवढेच धर्माचे अस्तित्व उरलेले होते. जातीय किंवा कर्मकांडयुक्त धर्म ( दोन्ही शब्द पर्यायीच आहेत ) जावयासच हवा. तो केवळ सामाजिक व बौद्धिक विकासात अडथळा आणणाराच आहे असे नाही तर धर्मकल्पनेच्या व्यक्तिधर्मात होणाऱ्या उत्क्रान्तीच्या मार्गातही एक अडथळाच आहे.

' रानटी अवस्थेतील लोकांच्या अनगड कल्पनाशक्तीतून धर्माचा उदय ' हजारोवर्षापूर्वी झाला. ( व्हाईटहेड् ) त्या रानटीपणाच्या सर्व खुणा अजून पुसल्या गेल्या नाहीत. तीन हजार किंवा दोन हजार किंवा चौदाशे वर्षांपूर्वीच धर्मविषयक जाणिवेचा विकास खुंटला व अनेक स्थित्यंतरांतून अधःपातालाच प्रारंभ झाला असे मानण्याचे मुळीच कारण नाही. मानवनिर्मित प्रत्येक गोष्टीप्रमाणे धर्मकल्पनाही विकास पावत गेली पाहिजे. परंतु विज्ञानाच्या किंवा तंत्रविषयक विज्ञानाच्या संशोधनाप्रमाणे हे सामुदायिक संशोधन नाही. धर्मभावनेचा शोध हा एकाकी शोध आहे. तो अनंत काळासाठी आहे. आत्म्याच्या असीम प्रदेशात चालणारा तो एक निरर्थक शोध असेल. परंतु हा शोध असा आहे की मनुष्य म्हणून पूर्णत्वाची ओळख करून घेण्याची इच्छा असलेल्या प्रत्येकाने तो स्वतःच्या स्वतः केला पाहिजे. स्वप्रत्यय विरहित विज्ञान किंवा तत्त्वज्ञान ही एक चालू शकणारी गोष्ट आहे. संशोधनातील विलक्षण थरारक अशा अनुभवाशिवाय लाभलेले ते ज्ञान म्हणजे केवळ ' माहिती ' आहे. त्यामुळे फारसे बिघडत नाही. परंतु प्रतीतिशून्य धर्मकल्पना ही एक मात्र भयंकर आपत्तीच आहे – ती कर्मठपणाकडेच झुकते.

---








# पंडित नेहरूंच्या जीवनातील महत्त्वाच्या घटनांची नोंद

**सन १८८९**

–१४ नोव्हेंबरला अलाहाबाद येथे जन्म.

**१९०५**

–युरोपिअन शिक्षकांच्या मार्गदर्शनाखाली खाजगीरीत्या शिक्षण घेतल्यानंतर वडिलांच्याबरोबर इंग्लंडला गमन. नंतर हॅरो येथे व नंतर केंब्रिजच्या ट्रिनिटी कॉलेजात शिक्षण.

**१९१०**

–केंब्रिजमधला अभ्यासपूर्ण. Natural Science Tripos in second class Honours.

–कायद्याचा अभ्यास. Inner Temple मध्ये केला.

**१९१२**

–भारतास परत. अलाहाबाद हायकोर्टात वकिलीस प्रारंभ. बंकिपूर कॉंग्रेसच्या अधिवेशनास प्रतिनिधि म्हणून गेले. येथून राजकीय जीवनास प्रारंभ. डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्यात लखनौ–कॉंग्रेसच्या अधिवेशनात महात्मा गांधींशी परिचय.

**१९१६**

–८ फेब्रुअरीस कमला कौल यांच्याशी दिल्ली येथे विवाह.

**१९१७**

–१९ नोव्हेंबरला इंदिरेचा अलाहाबाद येथे जन्म.

**१९१९**

–९ फेब्रुअरीस अलाहाबाद येथे 'Independent' नावाचे वृत्तपत्र वडिलांच्या सहकार्याने सुरू केले. हे वृत्तपत्र दोन वर्षे चालले

**१९२०**

–पंजाबमधील चळवळी आणि जालियनवाला बागेत झालेली क्रूर कत्तल यांचा परिणाम मनावर होऊन गांधीजींच्या असहकाराच्या चळवळीकडे आकृष्ट झाले. प्रतापगड जिल्ह्यात किसानांचा मोर्चा काढल्यामुळे व त्यानंतर भारतात आलेल्या अफगाणी शिष्टमंडळाशी संबंध ठेवल्याच्या संशयावरून ब्रिटिश सरकारची इतराजी.

–४ सप्टेंबरला कलकत्ता येथे भरलेल्या कॉंग्रेसच्या खास अधिवेशनास प्रतिनिधि म्हणून गेले.

**१९२१**

–नागपूर कॉंग्रेसनंतर शेतकऱ्यांच्या सुखदुःखाच्या प्रश्नात विशेष लक्ष घालून फरिदाबाद जिल्ह्यातील किसानांच्या चळवळीत उडी घातली. त्याबद्दल पाच महिने कारावासाची शिक्षा.

**१९२२**

–गांधीजींनी असहकाराची चळवळ मागे घेतली याबद्दल पंडितजींची नाराजी.

–११ मेला पुन्हा अटक. ऑगस्टमध्ये मुक्तता. परदेशीय कापड विक्रेत्यांना धाक दाखविल्याच्या आरोपाखाली लगलीच ऑक्टोबरमध्ये पुन्हा अटकः सहा महिन्यांची शिक्षा व हजार रुपये दंड.

**१९२३**

–मुक्ततेनंतर अलाहाबाद नगरपालिकेमधील कॉंग्रेसपक्षाचे अध्यक्ष झाले. दोन वर्षांनी या पदाचा राजीनामा दिला.

–सप्टेंबरमध्ये दिल्ली येथे भरलेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनात अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीचे जनरल सेक्रेटरी म्हणून निवडून आले.

–२२ सप्टेंबरला पुन्हा नाभा संस्थानात अटक. नाभा संस्थान सोडावे किंवा दोन वर्षे शिक्षा भोगावी या शिक्षेतील अटींपैकी पहिल्या अटीप्रमाणे नेहरूंनी नाभा संस्थान सोडले.

**१९२६**

–मार्चमध्ये युरोपच्या दौऱ्यावर रवाना. इटली, स्वित्सर्लंड, इंग्लंड, बेल्जिअम, जर्मनी, रशिया या देशांचा पत्नी व कन्येसमवेत दौरा. भारतीय कॉंग्रेसचे प्रतिनिधि या नात्याने ब्रुसेल्स येथे भरलेल्या कॉंग्रेस ऑफ ऑप्रेस्ड नॅशनॉलिटीजच्या अधिवेशनास उपस्थित राहिले. नोव्हेंबरमध्ये मोतीलालजींबरोबर मास्को येथील रशियन राज्यक्रान्तीच्या दहाव्या वाढदिवसाच्या समारंभासाठी गेले. भारतात परतल्यावर मद्रास कॉंग्रेसच्या अधिवेशनात 'संपूर्ण स्वातंत्र्य भारतास मिळाले पाहिजे व त्यासाठी झगडावयास हवे' हे कॉंग्रेसचे धोरण ठरविण्यात पुरस्कार.








१९२८

–सायमन कमिशनच्या विरुद्ध मोर्चा काढला असता त्यावर पोलिसांकडून लाठी हल्ला. पंजाब व केरळ प्रांतीय काँग्रेसच्या अधिवेशनांची अध्यक्षस्थानें भूषविली.

–डिसेंबर २७ ला महात्मा गांधींच्या ' डोमिनियन स्टेटस ' च्या ठरावाला सुधारणा सुचवून ' संपूर्ण स्वातंत्र्याच्या ' ध्येयाचा पुनरुच्चार केला.

१९२९

–२० सप्टेंबरला महात्मा गांधींनी काँग्रेसच्या अध्यक्ष-पदासाठी नेहरूंचे नाव सुचविले. १ ऑक्टोबरला लाहोर अधिवेशनासाठी अध्यक्ष म्हणून निवडले गेले. २९ डिसेंबरला अधिवेशनात ' संपूर्ण स्वातंत्र्याची प्राप्ति करून घेणे हे अटळ ध्येय ' डोळ्यासमोर ठेवून कार्य करण्यास चालना दिली.

१९३०

–कायदेभंगाच्या चळवळीत अटक. मिठाचा कायदा धुडकावला म्हणून सहा महिने कारावास.

–सप्रू आणि जयकर यांच्या योजनेप्रमाणे गांधीजींशी विचारविनिमय करण्यास अनेक बंदिस्त काँग्रेस पुढाऱ्यांबरोबर नैनीच्या तुरुंगातून येरवड्यास रवानगी.

–सुटकेनंतर शेतकऱ्यांच्या सभेत भाग घेतल्याबद्दल पुन्हा अटक. दोन वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा व सहाशे रुपये दंड. डिसेंबर २९ ला त्यांच्या पत्नी सौ. कमला नेहरू यांनाही अटक.

१९३१

–गांधी-आयर्विन करारास साह्यकारक भूमिका निर्माण व्हावी म्हणून सर्व पुढाऱ्यांची कारावासातून सुटका. ( २६–१–३१ ) ( करार ४ मार्च १९३१ ला झाला. )

–६ फेब्रुवारीस मोतीलाल नेहरू यांचे निधन.

–अलाहाबादशहराच्या नगरपालिकेच्या हद्दीबाहेर भ्रमण करण्यास बंदी घालणारी आज्ञा मोडली म्हणून दोन वर्षांच्या सक्तमजुरीची शिक्षा.

१९३३

–मातुःश्री स्वरूपराणी यांच्या आजारपणाच्या कारणाने कारावासातून सुटका. ( ऑगस्ट ३० ).

–गांधी–नेहरूंमधील पत्रव्यवहार १५–९–३३ ला वृत्तपत्रातून प्रसिद्ध. राजकीय व आर्थिक धोरणांमधील दोघांच्या विचारातील तफावत या पत्रातून स्पष्टपणे उघड झाली.

१९३४

–बिहारमध्ये भूकंप. प्रांतात दौरा. पीडितांना साह्य. त्यासाठी फंड-योजना काढली. कलकत्त्यात केलेल्या भाषणासाठी पुन्हा अटक. दोन वर्षांच्या कारावासाची शिक्षा. सौ. कमला नेहरू आजारी पडल्या हे कारण ध्यानात घेऊन सुटका. परंतु सरकारविरुद्ध भाषणे केली म्हणून सुटकेनंतर दहा दिवसानी पुन्हा अटक.

१९३५

–१४ फेब्रुवारीस अलमोऱ्याच्या जेलमध्ये असताना आत्मचरित्र लिहून पूर्ण झाले. पत्नीचे गंभीर आजारपण ध्यानात घेऊन पुन्हा सुटका. औषधोपचारासाठी कमला नेहरूंना स्वित्सर्लंडमध्ये नेण्यात आले होते तेथे जाऊन पत्नीची भेट. परदेशी असतानाच काँग्रेसच्या १९३६ च्या अधिवेशनासाठी अध्यक्ष म्हणून निवड झाली.

१९३६

–सौ. कमला नेहरू यांचे स्वित्सर्लंडमध्ये २८-२-३६ ला निधन.

–एप्रिलमध्ये आत्मचरित्र प्रसिद्ध झाले.

–एप्रिल २३ ला लखनौ काँग्रेसचे अध्यक्षस्थान भूषविले.

–१९३५ च्या इंडिया ॲक्टप्रमाण आपण निवडणुका लढवाव्यात हे काँग्रेसचे मत मान्य केले परंतु सत्ताधिकाराचे पाठबळ नसलेल्या जबाबदारींचे नुसते ओझे डोक्यावर पडेल यासाठी अधिकारग्रहण करू नये असे म्हणून अधिकारग्रहणाच्या मतास विरोध केला. परंतु नेहरूंची ही भूमिका काँग्रेसकडून अमान्य. ज्या प्रांतात मताधिक्य मिळाले होते तेथे काँग्रेसची मंत्रिमंडळे स्थापन झाली.



अनुक्रमणिका

# पंडित नेहरूंच्या जीवनातील महत्त्वाच्या घटनांची नोंद

–९ डिसेंबरला फैजपूर काँग्रेसच्या अध्यक्षपदी निवड, एप्रिल १९३६ ते फेब्रुवारी १९३७ निवडणुकांसाठी देशभर दौरा. बहुतेक प्रांतात काँग्रेसला विजय.

**१९३८**

–मातुःश्री स्वरूपराणी यांच्या निधनाचे दुःख. इटली, जर्मनीमधील हुकूमशाही राजवटींच्या उदयामुळे व्यथित. काँग्रेस मधील अंतर्गत मतभेदाचा त्रास होऊन युरोपच्या दौऱ्यावर प्रयाण.

**१९३९**

–सुभाषचंद्र बोस व गांधीजी यांचा समेट घडवून आणण्याचा यत्न. चीनचा दौरा, युद्धाचे वारे वाहू लागल्यामुळे भारतास परत. ३ सप्टेंबर १९३९ ला युद्ध सुरू झाले. त्याचवेळी संपूर्ण स्वातंत्र्याची पुनः मागणी.

**१९४०**

–वैयक्तिक सत्याग्रहाच्या चळवळीत दुसऱ्या क्रमांकाचे सत्याग्रही म्हणून गांधीजींनी नियुक्त केले. ३१ आक्टोबरला अटक. चार वर्षांची सक्तमजुरी. १९४१ मध्ये सुटका.

**१९४२**

–स्टॅफोर्ड क्रिप्सशी वाटाघाटी. मुंबईस भरलेल्या काँग्रेसमध्ये गांधींनी स्वीकारलेल्या 'चले जाव'च्या चळवळीस पाठिंबा. ८ ऑगस्टला गांधीजी, आझाद आदि नेत्यांसह अटक. अहमदनगरच्या किल्ल्यात रवानगी. 'चलजाव' चळवळ भारतभर पसरली.

**१९४४**

–१३ एप्रिलला Discovery of India या ग्रंथास प्रारंभ. पाच महिन्यात लिहून पूर्ण.

**१९४५**

–अहमदनगर तुरुंगातून सुटका. ब्रिटिश सरकारशी स्वातंत्र्यप्राप्तीसाठी वाटाघाटी. भारताच्या फाळणीच्या मुस्लीम लीगच्या मागणीस विरोध.

–आझाद हिंद फौजेचा खटला लाल किल्ल्यात सुरू. वकिलाचा पोशाख चढवून अधिकाऱ्यांच्या बचावासाठी खटल्यात सहभागी.

**१९४६**

–मार्चमध्ये Discovery of India प्रकाशित. मुंबईत नाविकांचे बंड. त्यासाठी मुंबईत आगमन. आग्नेय आशियाचा दौरा.

–९ मे अखिल भारतीय काँग्रेसचे चौथ्यांदा अध्यक्ष. १२ ऑगस्ट हंगामी मंत्रिमंडळ बनविण्यासाठी व्हाइसरॉयकडून आलेल्या निमंत्रणाचा स्वीकार. व्हाईस-प्रेसिडेंट म्हणून शपथविधी. हंगामी सरकारात येण्यास जीनांचा नकार. परंतु वेव्हेल-जीना वाटाघाटीनंतर मुस्लिम लीगचा मंत्रिमंडळ-प्रवेश. अर्थ, व्यापार, उद्योगधंदे ही महत्त्वाची खाती मुस्लिमलीगच्या मंत्र्यांकडे नियुक्त. तरी मुस्लिमलीगकडून कार्यात असहकार. नेहरूंच्या मनात राजिनाम्याचा विचार.

**१९४७**

–स्वातंत्र्यप्राप्तीचे वर्ष. पंजाबांतील दंगलग्रस्त विभागास भेट. हिंदु मुसलमानांच्या कलहापेक्षा पाकिस्तान देऊन टाकणे श्रेयस्कर हे नेहरू-पटेल यांना पटू लागले. फाळणीच्या विचारास मान्यता.

–घटनासमितीपुढे दोन भाषणे 'स्वातंत्र्याचे शिल्पकार' म्हणून गांधींचा गौरव.

–१४ ऑगस्ट मध्यरात्री म्हणजे १५ ऑगस्टला स्वातंत्र्यप्राप्ती. त्याचवेळी पाकिस्तानही अस्तित्वात आले. भारताचे पहिले पंतप्रधान म्हणून नेहरूंची निवड.

–पंजाब व दिल्लीमध्ये जातीय दंगे.

–२५ नोव्हेंबर काश्मीरवर सुरू झालेल्या आक्रमणाची कल्पना घटनासमितीस दिली.

**१९४८**

–३० जानेवारी महात्माजींचा वध.

–१७ फेब्रुवारी भारताच्या तटस्थतावादी धोरणाची घटनासमितीस कल्पना दिली.

२० जून लॉर्ड व लेडी माऊंटबॅटन यांना निरोप. गव्हर्नरजनरल म्हणून राजगोपालाचारी यांची नियुक्ती.

–२० ऑगस्ट, अणुशक्ति संशोधन मंडळापुढे भाषण. हैद्राबाद मुक्त झाले म्हणून १८ सप्टेंबरला आकाशवाणीवर भाषण.

–६ आक्टोबर राष्ट्रकुल पंतप्रधानांच्या मेळाव्यासाठी लंडनला प्रयाण. काश्मीर प्रश्नावर तडजोड घडवून आणण्यासाठी अॅटलींकडून निष्फळ प्रयत्न.

–२५ आक्टोबर युनोच्या खास अधिवेशनापुढे भाषण.








–२३ डिसेंबर निझामाच्या भेटीसाठी हैद्राबादला रवाना.

## १९४९

–एकोणीस आशियाई राष्ट्रांच्या परिषदेचे उद्घाटन. डचांच्या इंडोनेशियामधील आक्रमक धोरणाचा निषेध.

–१९ एप्रिल राष्ट्रकुल पंतप्रधानांच्या बैठकीस इंग्लडला प्रयाण. राष्ट्रकुलात राहण्याच्या धोरणास मान्यता.

–२४ सप्टेंबर युद्धबंदीचा करार करण्यासाठी पाकिस्तानला आवाहन.

–७ आक्टोबर अमेरिकेचा दौरा. प्रचंड स्वागत. १३ आक्टोबर अमेरिकन काँग्रेसपुढे भाषण. १७ आक्टोबर कोलंबिया विद्यापीठाकडून डॉक्टरेट पदवी.

–२४ आक्टोबर ओटावा येथे कॅनडाच्या पार्लमेंटपुढे भाषण.

–सॅन् फ्रान्सिस्कोच्या नागरिकत्वाचे हक्क नेहरूंना अर्पण करून सन्मान.

–६ नोव्हेंबर निग्रोची दुःखे दूर करण्यात भाग घेतल्यामुळे अमेरिकेचे स्पिन् गार्न मेडल् नेहरूंना अर्पण.

## १९५०

–२६ जानेवारी नवीन घटनेप्रमाणे भारताचे प्रजासत्ताक राज्य अस्तित्वात आले.

–२ एप्रिल अल्पसंख्याकासंबंधीचा नेहरू-लियाकत अली करार.

–२६ एप्रिल पाकिस्तानला भेट.

–१४ जुलै कोरियातील युद्ध थांबविण्यासाठी बड्या तीन राष्ट्रांना विनंती.

–८ सप्टेंबर तिबेटच्या प्रतिनिधीमंडळाशी विचार-विनिमय.

## १९५१

-जिनिव्हा-लंडन-पॅरिसला जाण्यासाठी कैरो येथे रवाना. जपानशी शांततातह करण्याची अमेरिकेस सूचना. चीनविरुद्ध घाईघाईने कृती करू नये अशी युनोस समज दिली. अमेरिका व इंग्लंड काश्मीर, प्रश्नावर पाकिस्तानला मदत करीत आहेत असा आरोप.

–११ जून नेपाळला एक आठवड्याची भेट. युद्धबंदी तह करण्यासाठी पाकिस्तानला पुन्हा आवाहन. काश्मीर प्रश्नासंबंधी अमेरिकेच्या फ्रँकग्रॅहॅमशी वाटाघाटी.

–काँग्रेसमधील उजव्या डाव्या गटाच्या मतभिन्नतेचे प्रकट प्रदर्शन होऊं लागले. टंडन यांचा अध्यक्ष-पदाचा राजिनामा. नेहरू पुन्हा अध्यक्ष लोकशाही सत्तापद्धती यशस्वी करावी असा नेहरूंचा लोकांना आदेश ( २२ नोव्हेंबर )

–निवडणुकीत नेहरूंच्या विरुद्ध पांच उमेदवार उभे. नेहरू प्रचंड बहुमताने विजयी. निवणुकीसाठी केलल्या भारतभर दौऱ्यात आध्रास भेट व भाषावार प्रांतरचना करण्याच्या तत्त्वास प्रकट संमती.

## १९५२

–काश्मीर प्रश्नावर ग्रॅहॅमशी अनेक वेळा चर्चा. ११ मे, नव्या लोकसभेचे पक्षनेते म्हणून निवड. मंत्रिमंडळ बनविण्यासाठी राष्ट्रपतींकडून पाचारण.

## १९५३

–४ जानेवारी ॲटलींचे भारतात आगमन. हैद्राबाद येथे भरलेल्या काँग्रेसच्या ५८ व्या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून नेहरूंची पुनः निवड.

–१३ एप्रिल, पंचवार्षिक योजनेचे महत्त्व विशद करणारे भाषण दिल्लीत केले.

–२८ मे राणी एलिझाबेथच्या राज्यारोहणासाठी इंग्लंडला रवाना.

–३० जून गौरीशंकर विजेता तेनसिंग नोर्के याचे स्वागत.

–२५ जुल पाकिस्तानला भेट.

## १९५४

–कुंभमेळयास भेट.

–एकूणसाठाव्या काँग्रेसच्या कल्याणी ( कलकत्ता ) येथील अधिवेशनाचे अध्यक्ष.

–३ मे, कोलंबो भेटीसाठी प्रयाण.

–२५ जून चीनचे पंतप्रधान चौ–एन्–लाय यांचे स्वागत व त्यांच्याशी चर्चा. 'पंचशील' योजनेवर दोघांच्या सह्या.

–आक्टोबर चीनला भेट.

—१७ डिसेंबर प्रेसिडेंट टिटो यांची भारतभेट.

—२६ डिसेंबर आग्नेय आशियातील राष्ट्रांचा दौरा.

१९५५

—आवडी येथे भरलेल्या कॉंग्रेसच्या साठाव्या अधिवेशनात समाजवादी समाजरचनेच्या तत्त्वाची घोषणा. राष्ट्रकुल परिषदेसाठी इंग्लंडला प्रयाण. परत येताना नासेर यांच्याशी चर्चा.

—२५ फेब्रुवारी चीनला युनोने मान्यता द्यावी व फोर्मोसा प्रश्न सोडवावा अशी मागणी करणारे भाषण.

—१ मे, भारतीयांना नागरिकत्वाचे हक्क नाकारल्याबद्दल सिलोनी राजवटीच्या धोरणाचा निषेध.

—१२ मार्च, बाबूलाल रिक्षावाल्याने हातात चाकू घेऊन नेहरूंच्या उघड्या मोटारीकडे धाव घेतली. संशयित म्हणून त्यास अटक केली गेली.

—१५ एप्रिल, नासेरसह बांडुंग परिषदेस रवाना. पंचशील तत्त्वांनुसार मांडलेल्या दहा तत्त्वांचा बांडुंग परिषदेकडून स्वीकार.

—५ जून सोव्हिएट रशिया, युगोस्लाव्हिया, पोलंड आदि अनेक राष्ट्रांच्या दौऱ्यासाठी रवाना. बुल्गानीनकडून पंचशील तत्त्वांचा पुरस्कार. लोकसभेत गोव्यातील पोर्तुगीजांच्या अत्याचाराचा निषेध.

—६ ऑक्टोबर, आंतरविद्यापीठ युवक महोत्सवाचे उद्घाटन

—१८ नोव्हेंबर, बुल्गानीन व क्रुश्चेव्ह यांचे भारतात आगमन. तीन आठवड्यांचा दौरा. दोघांकडून गोव्यातील पोर्तुगिजांच्या अंमलाचा निषेध.

१९५६

—राज्य पुनर्रचना मंडळाच्या अहवालासंबंधी नेहरूंचे नभोवाणीवर भाषण

—कॉंग्रेसच्या एकसष्ठाव्या अधिवेशनात लष्करी करार व शीतयुद्धे ह्यावर नेहरूंची टीका.

—२९ मार्च, काश्मीरमध्ये सार्वमत घेण्याची आवश्यकता नाही असे लोकसभेत निवेदन

—मे, पहिली पंचवार्षिक योजना लोकसभेला सादर केली.

—जून, युरोपचा दौरा. आयर्लंड, जर्मन विद्यापीठाकडून सन्माननीय पदव्या. ऑडेनॉर नेहरूंच्याकडून पंचशील तत्त्वाचा पुनरुच्चार

—२३ जुलै— अर्थखाते स्वतःकडे घेतले. श्री. सी. डी. देशमुखांचा महाराष्ट्रावर भाषावार प्रांतरचनेत अन्याय झाला म्हणून राजिनामा.

—सुवेझ कॅनॉलचा प्रश्न सोडविण्यासाठी लष्करांचा उपयोग करू नये असा नेहरूंचा इशारा. दिल्लीत कोलंबो राष्ट्रांच्या पंतप्रधानांची बैठक. इजिप्तवर झालेल्या आक्रमणाचा गंभीर विचार. ब्रिटिश, फ्रेंच व इस्राईली फौजा इजिप्तमधून काढून घेण्याची मागणी. हंगेरीतून रशियन सैन्य काढून घेण्याची मागणी.

—३० नोव्हेंबर चिनी पंतप्रधान याची दुसरी भेट.

—१४ डिसेंबर नेहरू व इंदिरा गांधी अमेरिका युरोपच्या दौऱ्यावर रवाना. आयसेनहॉअर यांच्याशी अनेक प्रश्नांवर विचारविनिमय.

—२० डिसेंबर, युनो सभेत भाषण.

—३० डिसेंबर ते २–१–५७ चैएन्–लाय् ची भारतास तिसरी भेट. राजकीय प्रश्नांवर चर्चा.

१९५७

—२८ जानेवारी, ट्रॉम्बे येथील अणुभट्टीचे उद्घाटन.

—१४ जून डेन्मार्क, इंग्लंड, नॉर्वे, स्वीडन् यांचा दौरा.

—४ आक्टोबर, जपानचा दौरा.

—९ आक्टोबर, हिरोशिमास भेट.

—२८ नोव्हेंबर, अणु चाचण्या थांबवाव्यात व परिणामकारक शस्त्रकपात करावी अशी रशिया–अमेरिकेस सूचना.

१९५८

—सायन्स कॉंग्रेस अधिवेशनाचे मद्रासला उद्घाटन.

—बड्या राष्ट्रांच्या शिखरपरिषदेच्या कल्पनेस नेहरूंचा पाठिंबा.

—कृष्णम्माचारींच्या राजीनाम्यामुळे अर्थखाते स्वतःकडे घेतले.

—३ जुलै हंगेरीचे नेते इम्रे नाझ् यांच्या हत्येबद्दल खेद प्रदर्शित केला.

१९५९

—घानाचे पंतप्रधान नक्रूमा यांची भारतास भेट.

—९ जानेवारी, नागपूर येथील कॉंग्रेसच्या अधिवेशनात समाजवादी समाजरचनेचा पुनः पुरस्कार. तसेच सहकारी शेतीचाही पुरस्कार.

–२२ फेब्रुवारी आझादांच्या प्रथम वर्षश्राद्धदिनी ‘India Today and Tomorrow’ या विषयावर दिल्लीत भाषण

–२३ मार्च, चीनने तिबेटावर केलेल्या आक्रमणाचा वृत्तांत लोकसभेत सादर. दलाई लामांच भारतात आगमन.

–२४ एप्रिल दलाई लामांची भेट घेतली.

–११ जून नेपाळला तीन दिवसांची भेट.

–२ सप्टेंबर, सेनाप्रमुख थिमय्या यांच्या राजिनाम्याच्या प्रकरणी मध्यस्थी.

–पार्लमेंटमध्ये मॅकमोहन रेषेविषयी निवेदन

–७ सप्टेंबर भारत–चीन यामधील पत्रव्यवहारासंबंधी लोकसभेत निवेदन.

–१२ सप्टेंबर, चीनची मागणी अस्वीकारार्ह असल्याची नेहरूंची घोषणा. उद्‌भवणाऱ्या परिस्थितीस तोंड देण्याची सिद्धता असल्याचे निवेदन.

–ब्रह्मदेशाचे पंतप्रधान श्री. ने विन यांच्याशी भारत व ब्रह्मदेश यांच्या चीनशी असलेल्या संबंधांविषयी चर्चा.

## १९६०

–एप्रिल चौ-एन्-लाय यांच्याशी दिल्लीत वाटाघाटी, संघर्ष टाळण्याचा प्रयत्न.

–मे राष्ट्रकुल संघाच्या बैठकीस हजर राहून पॅरिस, इजिप्त, तुर्कस्तान, लेबेनॉन् चा दौरा केला.

–१ मे, महाराष्ट्र-गुजराथ राज्यांचे उद्‌घाटन केले.

–१९ सप्टेंबर सिंधु नदीच्या पाण्यासंबंधी पाकिस्तानशी झालेल्या करारावर सह्या केल्या.

–युनोच्या आमसभेने भरविलेल्या शिखर परिषदेस भारताच्या शिष्टमंडळाचे नेते म्हणून उपस्थित राहिले. व अमेरिका व रशिया यांनी त्यांच्या संबंधांचे पुनरुज्जीवन करावे अशी विनंती केली.

–श्री. अयुबखान यांच्याशी राजकीय प्रश्नासंबंधी चर्चा केली.

## १९६१

–१६ जानेवारी– कॅनडा-भारत यांच्या सहकार्याने मुंबई येथे स्थापन होणाऱ्या अणुभट्टीचे उद्‌घाटन केले.

–१८ जानेवारी चीनने भारताच्या उत्तर सीमांवर आक्रमण केले आहे अशी भारताची खात्री झाली आहे असे वृत्तपत्र वार्ताहराना सांगितले. काश्मीरची सरहद्द ठरविण्यासाठी चीनशी चर्चा करण्यास संमती देण्यात पाकिस्तान चूक करीत आहे हेही स्पष्ट केले.

–८ ते १३ फेब्रुअरी : भूतानच्या महाराजांशी विचारविनिमय.

–मार्च : राष्ट्रकुलपंतप्रधानांच्या बैठकीस गेले.

सप्टेंबर : तटस्थतावादी राष्ट्रांच्या शिखर परिषदेसाठी बेलग्रेडला गेले.

–१० डिसेंबर : पंजाबात भाक्राच्या विद्युत् केंद्राचे उद्‌घाटन केले.

–१३ डिसेंबर–रशियाचे अध्यक्ष ब्रेझिनेव यांच्याशी भेट.

## १९६२

–ब्रह्मदेशाचे पंतप्रधान यू नू, डेन्मार्कचे अध्यक्ष काम्पमन व यूएआरचे उपाध्यक्ष अमेर यांच्या जानेवारीत भेटी.

–नव्या निवडणुकांनंतर मंत्रीमंडळ बनविण्यासाठी राष्ट्रपतींकडून पाचारण. १० एप्रिलला मंत्रीमंडळाचा शपथविधी झाला.

–१८ एप्रिल : नेपाळचे राजे महेंद्र यांच्याशी भेट.

–२–३ जून : राष्ट्रीय एकात्मता परिषदेचे अध्यक्ष. राष्ट्रकुल पंतप्रधानांच्या बैठकीस सप्टेंबरमध्ये गेले.

–पॅरीस-कैरो येथे जाऊन आले. २१-९-६२ ला युनेस्कोच्या परिषदेपुढे भाषण. ( पॅरिस )

–१७ आक्टोबर : रुमानियाच्या अध्यक्षांचे आगतस्वागत.

–२२ आक्टोबर : चीनने केलेल्या आक्रमणाविरुद्ध एकजुटीने उभे राहण्यासाठी सर्व भारतीयांना हाक.

–२७ ऑक्टोबर : मलायाचे पंतप्रधान टंकु अब्दुल रहमान यांच्याशी भेट. ३१-१०-६२ सायप्रसच्या अध्यक्षांशी भेट.

–१ नोव्हेंबर : संरक्षण खाते तात्पुरते स्वतःकडे घेतले.

–३० नोव्हेंबर : मतभेद मिटविण्याचे प्रयत्न करण्यासंबंधी नेहरू-अयूबखान यांचे संयुक्त पत्रक.

## १९६३

–१० ते १३ जानेवारी : सीलोनच्या पंतप्रधान श्रीमती बंदरनायके, संयुक्त अरब राष्ट्राच श्री.










अली साब्री व घानाचे Mr. Asante Ofori-Atta यांच्याशी भारत-चीन सीमा संघर्षाबाबत कोलंबो योजनेसंबंधी वाटाघाटी.

–२३ जानेवारी : कोलंबो योजना स्वीकारावी असा ठराव लोकसभेत मांडला.

–फेब्रुवारी : 'लोकमान्य' नामक पहिल्या स्वयंचलित आगगाडी–यंत्राचे उद्‌घाटन.

–१९६५ हे वर्ष सहकार्याचे वर्ष मानावे (Year of co-operation) हा नेहरूंचा प्रस्ताव यूनोकडून स्वीकृत झाला.

–लाओसचे पंतप्रधान (नोव्हेंबर) व जॉर्डनचे राजे हुसेन (डिसेंबर) भेट घेऊन गेले.

१९६४

–जानेवारी भुवनेश्वर येथे भरलेल्या काँग्रेसचे अधिवेशन चालू असतानाच आजारी पडले.

–फेब्रुअरा : जनरल ने विन (ब्रह्मदेश) सिंगापूरचे पंतप्रधान Mr. Lee Kuan Yew नेहरूंना भेटून गेले.

–मे– कोसी आणि गंडक नद्यांच्या योजनांची कोनशिला बसविण्याच्या प्रसंगी नेहरूंनी नेपाळचे राजे महेंद्र यांची भेट घेतली.

–मे : सुदानच्या अध्यक्षांशी भेट.

–२३ ते २६ मे विश्रांतीसाठी डेहराडूनला जाऊन आले.

–२७ मे : दि. २६ ला नेहरू डेहराडूनहून परत दिल्लीस आले. दि. २७ ला दुपारी दोन वाजता हृदयविकाराच्या आघाताने त्यांचे दिल्लीच्या तीन मूर्ति मार्गावर असलेल्या सरकारी निवासस्थानी प्राणोत्क्रमण झाले. सकाळीच त्यांची तब्येत बिघडली होती. ते बेशुद्धावस्थेत होते व पुन्हा शुद्धीवर न येताच त्यांचे प्राणोत्क्रमण झाले.

–दि. २८ ला माध्यान्ही एक वाजता त्यांची स्मशानयात्रा निघाली. राजघाटावर महात्माजींच्या समाधीसन्निध अंत्यसंस्कार झाला. यावेळी श्री. डीनरस्क (सेक्रटरी ऑफ स्टेट, अमेरिका), श्री. अलेक डग्लस होम, व श्री. लॉर्ड माउंटबॅटन (इंग्लंड), श्री. अलेक्सी कोसीजीन (रशिया), श्रीमती शिरिमाओ बंदरनायके (सीलोन), हुसेन शेफी (संयुक्त अरब-राष्ट्र-उपाध्यक्ष), झेड. ए. भुत्तो (पाकिस्तान परराष्ट्र मंत्री), राजे महेंद्र (नेपाळ), आदी मडळी याप्रसंगी उपस्थित राहिली होती.





अनुक्रमणिका








## वाचकांचा पत्रव्यवहार -

श्री. संपादक ' नवभारत ' यास

श्री. पी. एन्. बोडके ( मालाड ) यांचे सप्टेंबर १९६४च्या ' नवभारतातील ' पत्र पाहिले. त्यानी माझ्या दोन विधानाबाबत आक्षेप घेतला आहे, त्यापैकी पहिले विधान ' सिंधू संस्कृतीतील लोक आणि ऋग्वेदात वर्णन असलेले आर्यांचे शत्रू एकच आहेत ' हे होय. त्याबद्दल श्री. बोडके यानी लिहिले की ' पहिल्या विधानाबद्दल मला एवढेच सांगावयाचे आहे की, सिंधू संस्कृतीतील लोक आणि ऋग्वेदात वर्णन असलेले आर्यांचे शत्रू एकच आहेत हे ऋग्वेदाच्या अंतर्गत आधारावर उभारलेले एक अनुमान आहे ' ' अनेक इतिहासकारांनी गृहीत धरलेल्या या साध्या गोष्टीला भारदस्त पुरावे कशाला हवेत. ' माझे दुसरे विधान ' आजपावेतो भारतात अथवा भारताबाहेर या विषयावर कोणी लिहिले नाही ' चूक आहे असे दाखविण्यासाठी त्यानी मराठी पाचव्या इयत्तेच्या पाठ्य पुस्तकातील उतारा ( १९५४ ) व स्टुअर्ट पिगटच्या Prehistoric India या पुस्तकातील व्हिलरच्या लेखावर आधारलेला उतारा असे दोन उतारे उद्धृत केले आहेत.

श्री. बोडके यानी माझे लेख वाचले आहेत असे त्यानी आपल्या पत्रात लिहिले आहे तरी त्यांचे वरील विधान वाचून त्यांनी ते वाचले नाहीत अथवा समजूनही घेण्याचा प्रयत्न केला नाही असे दिसते. त्याना माझ्या लेखनाचा काय विषय आहे हेही माहीत नाही. माझ्या लेखनाचा विषय सिंधू उत्खननातील पुराव्याची ऋचातील आर्यांच्या शत्रूंच्या वर्णनाशी तुलना करून वेदातील आर्यांचे शत्रू व सिंधू संस्कृतीतील लोक एकच आहेत हे सिद्ध करणे हा होय. त्यासाठी मी Indus civlisation in the Rgveda हे पुस्तक सन १९५४ च्या जुलै महिन्यात व १९५६ च्या सप्टेंबर पासून मार्च १९६४ पावेतो नवभारतातून १५० पानाचे लिखाण प्रसिद्ध केले आहे. त्यात त्यांची शहरे, रंग, रूप, सांपत्तिक स्थिती, उद्योगधंदे, डोक्यावर शिंग धारण करण्याची पद्धति, देव धर्म, चालीरीती, राज्यव्यवस्था, समाजरचना, संस्कृति नष्ट होण्याची कारणे इत्यादि सर्व सांस्कृतिक जीवनात दोघांचे ऐक्य दाखवून ते दोघेही एकच आहेत हे सिद्ध केले आहे. नुसत्या सामान्य गोष्टीवरूनच नव्हे तर डोक्यावर शिंगे धारण करणे, दोघांचाही तीन तोंडाचा देव असणे इत्यादि निर्णायक गोष्टी वरूनही ( crucial points ) ते एकच आहेत असे सिद्ध केले आहे.

ही पुराव्याची तुलना व त्यावरून काढलेले निष्कर्ष भारतीय व पाश्चात्य थोर विद्वानांना मान्य झाले आहेत हेही ' नवभारत ' मार्च १९६४ च्या ' आर्यांच्या भारतात प्रवेशाची कालगणना ( उत्तरार्ध ) ' या लेखात उद्धृत केलेल्या मतावरून दिसून येईल.

श्री. बोडके यांच्या मताने ' अनेक इतिहासकारांनी गृहीत धरलेल्या या साध्या गोष्टीला भारदस्त पुरावे कशाला ' श्री. बोडके याना तर्कशास्त्राची थोडी जरी तोंडओळख असती तरी त्यांनी असे लिहिले नसते. सिंधू उत्खननात भाग घेऊन ती सर्व माहिती चार मोठ्या पुस्तकात संकलित करणारे सर जॉन मार्शल व हरप्पातील तटबंदीचे उत्खनन करणारे सर एरिक व्हिलर यांनाही सिंधू संस्कृती आर्यपूर्व असून ती आर्यांनी नष्ट केली असे वाटत होते व त्यांनी आपले मत नमूदही करून ठेवले आहे. ते एक गृहीत प्रमेय होते. परंतु ते त्यांना सिद्ध करता आले नाही. तसे सिद्ध करण्याचा थोडासा अनिर्णीत प्रयत्न व्हिलरने केला परंतु ज्ञानाच्या सद्यःपरिस्थितीत ते आपणास सिद्ध करता येत नाही असे म्हणून तो विषय तसाच टाकून दिला. सर जॉन मार्शल व व्हिलर याना तसे सिद्ध करण्यास फार मोठी अडचण होती; त्याचा विचार ' आर्यांच्या भारतात प्रवेशाची कालगणना ( पूर्वार्ध )' या फेब्रुवारी १९६४ च्या नवभारतात केला आहे. एखादी गोष्ट गृहीत प्रमेय म्हणून धरणे वेगळे आणि ती शाबीत करून सिद्धांत बनविणे वेगळे. कितीही इतिहासकारांनी एखादी गोष्ट गृहीत धरली तरी त्यामुळे ती सिद्ध गोष्ट होत नाही व त्यांचे लिखाण गृहीत प्रमेयावरीलच लिखाण राहील. वरील प्रमेय गृहीत धरून सिंधुसंस्कृतीवर फार मोठे वाङ्मय प्रसिद्ध झाले आहे. त्यासाठी श्री. बोडके याना

वरील दोन उताऱ्यावरच भिस्त ठेवण्याचे कारण नव्हते. ते पुस्तकांची एक यादीच प्रसिद्ध करू शकले असते. सिंधू संस्कृतीवर यापूर्वी कोणी लिहिले नाही असे माझे बिलकूल म्हणणे नव्हते. सिंधूसंस्कृतीतील लोक व ऋचातील आर्यांचे शत्रू यांची सिंधू उत्खननातील पुराव्याची ऋचातील आर्यांच्या शत्रूच्या वर्णनाशी सर्वांगीण तुलना करून त्यांचे ऐकात्म्य सिद्ध करणे हा माझ्या लिखाणाचा विषय आहे व माझ्या माहिती-प्रमाणे तसे इतर कोणीही सिद्ध केले नाही. श्री. बोडके याना माहीत असल्यास त्यानी जरूर कळवावे म्हणजे मी जरूर कबूल करीन. त्यात कोण-ताही अभिनिवेश असण्याचे कारण नाही मात्र त्यांनी वरीलप्रमाणे गृहीत कृत्याच्या (Hypothisis) आधारावर लिहिलेल्या पुस्तकांचा पुरावा देऊ नये. प्रमेय (Hypothisis) आणि शक्ती (proof) यातील फरक त्यांनी ध्यानात ठेवावा. तर्क शास्त्रात प्रथम निरीक्षण नंतर प्रमेय बनविणे व नंतर शाबीत करून सिद्धांत बनविणे अशा तीन श्रेणी आहेत हे श्री. बोडके याना सांगण्याची जरुरी आहे असे वाटत नाही.

त्यांच्या मताने हा एक वृथा खटाटोप आहे. मुळात ऋग्वेदालाच ऐतिहासिक दृष्ट्या काही महत्व नाही असे त्यांचे मत दिसते. त्यांच्या मताप्रमाणे " ऋग्वेदात इतर अनेक गोष्टी सिद्ध करण्यास भरपूर पुरावे सांपड-तात म्हणून त्या साऱ्या गोष्टी ऐतिहासिक दृष्ट्या सत्य आहेत असे मानण्याचा काळ आता मागे पडला आहे. " श्री. बोडके यांनी असे विचित्र सामान्य स्वरूपाचे विधान करण्याऐवजी जर आपले म्हणणे ऋग्वेदातील एखादे उदाहरण घेऊन सिद्ध केले असते तर बरे झाले असते. ऋग्वेद इतिहास नसला तरी भारतीय इतिहासाचे ते अत्यंत मोलाचे व फार प्राचीन साधन आहे असे जगातील सर्व विद्वान मानतात. 'इतर साऱ्या गोष्टी' संबंधी सामान्य विधान करण्या-ऐवजी आजपर्यंत अनेक संशोधकांनी ज्याच्यावर भिस्त ठेवली आहे तो आर्यांच्या शत्रूबद्दलचा पुरावा ऐति-हासिक सत्य नाही असे श्री. बोडके यानी दाखविले असते तर त्यांच्या म्हणण्याला काही किंमत असती. ऋग्वेद देवांच्या स्तुतिपर सूक्ते असली तरी त्यातून इतिहास कसा सापडतो हे प्रस्तुत लेखकाने 'Indus civilisation in the Rgveda' या पुस्तकात व 'प्राचीन भारतीय इतिहास व ऋग्वेद' या जून १९५७ नवभारत या लेखात दाखविले आहे. त्याची येथे पुनरावृत्ती करण्याची जरूरी नाही. सिंधूसंस्कृतीचे उत्खनन करणारे सर जॉन मार्शल व व्हिलरच नव्हे तर व्हिलरच्या लेखाच्या आधारावर Prehistoric India या पुस्तकाचे लेखक (ज्यांच्या पुस्तकाने श्री. बोडके प्रभावित झाले व ज्याचा उतारा त्यांनी आपल्या पुस्तकात उद्धृत केला आहे) स्टुअर्ट पिगटही ऋग्वेद हे प्राचीन भारतीय इतिहासाचे अमोल साधन आहे असे मानतात. इतकेच नव्हे तर सर पार्टीमर व्हिलरने तर सिंधुसंस्कृती प्राचीन भारतीय इतिहासास (ऋग्वेदास) जोडली नाही तर ती भारतीय इतिहा-साचा सलग भाग होणार नाही असेही नमूद करून ठेवले आहे. आणि सिंधु संस्कृती ऋग्वेदातील अंतर्गत पुराव्याशी जोडण्याचा त्रोटक प्रयत्नही केला. श्री. बोडके यानी उद्धृत केलेल्या पुराव्यावरून व्हीलरच्या पुराव्याचा आधार घेऊन एकदोन ऋचाच्या आधारे पिगटनेही सिंधु संस्कृती ऋग्वेदास जोडण्याचा प्रयत्न केला. यावरून श्री. बोडके यांच्या ध्यानात यावयास पाहिजे होते की ऋग्वेद हे भारतीय प्राचीन इतिहासाचे अमोल साधन आहे. व जगातील सर्व विद्वान् तसे मानतात. सिंधु संस्कृतीचा नाश आर्यांनी केला हे सिद्ध करण्यास तर ऋचा खेरीज दुसरा पुरावाच नाही. शिवाय सिंधू उत्खननात डोळ्याने दिसणाऱ्या गोष्टींचे तंतोतंत प्रतिबिंब ऋग्वेदात दिसत असल्यामुळे त्याच्या ऐतिहासिक सत्याबद्दल संशय घेण्यास जागाच नाही. श्री. बोडके यानी या दोन्ही विषयाचा अभ्यास न केल्यामुळे व 'त्यांचा छंद वेगळाच असल्यामुळे' त्याना ह्या गोष्टी कळणे कठीण आणि म्हणून त्यानी ऋग्वेदाचे ऐतिहासिक महत्व नाकारून ऋग्वेदावर व पर्यायाने भारतीय ज्ञानावैर अजाणता निष्कारण प्रहार केला. इतकेच करून ते थांबले नाहीत तर ऋग्वेदाच्या आधारे लिहिणारांना त्यानी 'किमया' कार ठरविले. त्याना कदाचित माहीत नसेल की सर जॉन मार्शल, व्हिलर व ते ज्याच्या पुस्तकाने प्रभावित झाले ते पिगटसुद्धा या यादीतून वगळता येत नाहीत. त्यांच्या दृष्टीने ऋग्वेदाच्या आधारे लिहिणे हा एक वृथा खटा-टोप आहे. तसे लिहिण्याचा काळ केव्हाच मागे पडला.








श्री. बोडके यांच्या मते ' सिंधूसंस्कृतीतील लिपीचा बोध करून घेण्यात निर्णायक यश आल्यानंतरच निर्णय घेण्यास नवीन आधार उपलब्ध होतील ! हे जे श्री बोडके यानी मत व्यक्त केले ते चुकीचे आहे व त्यावर त्यानी जास्त विचारही केलेला दिसत नाही. सिंधुलिपी वाचली गेली म्हणजे सिंधुसंस्कृतीतील लोकांबद्दल जास्त माहिती मिळेल हे निःसंशय आहे. परंतु त्यामुळे तेच वैदिक आर्यांचे शत्रू होते व त्यानाच ठार मारले व त्यांची शहरे जाळली ह्या गोष्टी मुद्रांवरून कळण्याची शक्यता नाही. कारण आर्यांच्या स्वाऱ्या आणि सिंधुसंस्कृतीचा विनाश ही त्यांच्यावर आलेली शेवटची आपत्ती होय हे न कळून श्री. बोडके यानी उपलब्ध उत्खननातील पुराव्याची ऋचांच्या पुराव्याशी तुलना करून काढलेल्या निष्कर्षांना वृथा कमी लेखण्याचा प्रयत्न केला आहे.

सिंधु संस्कृती भारतीय वाङ्मयीन इतिहासाशी जोडली जाणे ही भारतीय इतिहासाची फार मोठी गरज होती. ती भागविण्यासाठी प्रस्तुत लेखकाने Indus civilisation in the Ṛgveda हे पुस्तक व नवभारतातील १५० पानाचे लिखाण लिहून अल्पसा प्रयत्न केला. त्यावर विद्वानांची काय प्रतिक्रिया आहे हे ' नवभारत ' मार्च १९६४ मधील ' आर्यांच्या भारतात प्रवेशाची कालगणना ( उत्तरार्ध ) या लेखात उद्धृत केलेल्या दिल्लीच्या हिंदुस्थान टाईम्सच्या परीक्षणावरून कळून येईल. या पुस्तकामुळे सिंधु संस्कृती भारतीय इतिहासास जोडली गेली असे या पत्राचे मत आहे. तशा प्रयत्नाची जाणीव कदाचित् श्री. बोडके याना नसेल.

मागील लेखात मी केली तशी प्रखर टीका करणे इतिहास संशोधन कार्यात अप्रस्तुत आहे अशी श्री. बोडके यानी तक्रार केली आहे. ती मला काहीशी संमत आहे व ती बोचक झाली असल्यास त्याबद्दल मी दिलगीर आहे. परंतु दीर्घ व्यासंग करून लिहिलेल्या लेखांची सहज लीलेने हेटाळणी करण्याची प्रवृत्ती थांबविण्यास त्याशिवाय अन्य कोणता मार्ग आहे ?

– प्र. रा. देशमुख



## पुस्तक परिचय –

### चरित्रामृत

**( ब्रह्मीभूत प. प. शंकरानन्दभारती अर्थात् म. म. श्रीधरशास्त्री पाठक ) लेखक व प्रकाशक विश्वनाथ श्रीधर पाठक** आयुर्वेदतीर्थ, पेठ ग. नं. ६, धुळे, **१९६४** ( पाने १२+७+२८६ ) मूल्य ५ रु.

पूर्वीच्या पुणे येथील डेक्कन कॉलेजमध्ये इ. स. १९१७–१९३१ पर्यंत ज्यांनी शास्त्री म्हणून व्याकरण व वेदान्तादि दर्शने यांचे अध्यापन केले व ज्यांचे व्याकरण, वेदान्त, धर्मशास्त्र इत्यादींवरील ग्रंथ संस्कृताभ्यासकांस सुपरिचित आहेत, ते प्रसिद्ध म. म. श्रीधरशास्त्री पाठक किंवा संन्यासाश्रमांतील स्वामी शंकरानंदभारती यांचे प्रस्तुत ' चरित्रामृत ' हे चरित्र आहे. प्रस्तुत पुस्तकाचे दोन भाग आहेत. पहिल्या भागात ५ पर्वे किंवा प्रकरणे असून त्यातील पहिल्या दोन पर्वात त्यांचे जीवन व त्यातील संस्मरणीय प्रसगांचा वृत्तान्त आहे, तिसऱ्या पर्वात त्यांनी लिहिलेल्या वाङमयाचा व स्थापलेल्या संस्थांचा संक्षिप्त परिचय करून दिला आहे, आणि ४ थ्या व ५ व्या पर्वातून त्यांच्या व्यक्तिमत्त्वांतील विविध गुणविशेषांचे विवेचन केले आहे. दुसऱ्या भागात स्वामींच्या व्यक्तिमत्त्वाने व विद्वत्तेने प्रभावित झालेल्या म. म. काणे, श्री. खुपेरकरशास्त्री, ह. भ. प. सोनोपंत दांडेकर इत्यादि शंभरांवर व्यक्तींच्या संस्कृत, मराठी, हिंदी या भाषातून दिलेल्या सुमारे ११५ वर आठवणी व आदरांजली दिलेल्या आहेत.

म. म. श्रीधरशास्त्री ह्यानी काशीत ७ वर्षे राहून प्राचीन शिक्षणपरंपरेप्रमाणे व्याकरण, न्याय, वेदान्त यांचे पांक्त असे अध्ययन केले होते. त्यामुळे त्यांचा या शास्त्रांतील अधिकार विद्वन्मान्य होता. त्यांचे या विषयांचें अध्यापन व प्रवचने प्रभावशाली होत असत. त्यांचे पातंजलमहाभाष्य व पाणिनिकात्यायन-आदिप्रणीत वार्तिक यांच्यावरील पं. चित्राव यांच्या सहकार्याने तयार केलेले शब्दकोश; शुक्लयजुर्वेद-संहिता, ईश, केन, कठ, व मुण्डक ही उपनिषदे, वल्लभाचार्यकृत ब्रह्मसूत्राणुभाष्य यांवरील त्यांच्या संस्कृत टीका; दायभागावर त्यांनी दिलेली संस्कृत व्याख्याने; नैष्कर्म्यसिद्धि, सिद्धान्ततत्त्वबिन्दु, जीवन्मुक्तिविवेक यांचे त्यांनी केलेले मराठी अनुवाद; विनोबांच्या गीताप्रवचनांचा संस्कृत अनुवाद-इत्यादि त्यांचे वाङमय त्यांच्या विद्वत्तेची व व्यासंगाची साक्ष देते. " 'गीतारहस्यां'त आपणास प्राचीनशास्त्रदृष्टया २६ चुका आढळून आल्या " असे त्यांनी लो. टिळकांना समक्ष सांगितल्याचा आठवणीवजा उल्लेख या चरित्रात (पान ४०) आला असून, एकदोन तांत्रिक चुकांचा निर्देशही केला आहे. "गीतारहस्या' तील चुकांचा परामर्श घेण्याचे व त्याचे सांगोपांग परीक्षण करण्याचे, टिळकांच्या मोठेपणानें भारावून गेल्यामुळे श्रीधरशास्त्र्यांनी टाळले असे दिसते. ते प्राचीन संस्कृत विद्येकडें वळले ही गोष्ट कदाचित् योगायोगाने घडून आली असावी हे दाख-विणारी घटना प्रस्तुत चरित्रात सांगितली आहे, तिचा उल्लेख करावासा वाटतो. वयाच्या दहाव्या वर्षापर्यंत इयत्ता ४ थी पावेतो पूर्वखानदेशमधील पारोळे या जन्मग्रामी शिक्षण झाल्यावर "इंग्रजी शिकण्याच्या उत्कट इच्छेने ते त्यावेळी खान-देशात सुप्रसिद्ध असलेले श्री. भय्यासाहेब मांडे मामलेदार यांच्याकडे आश्रयार्थ गेले. परंतु दैववशात् रावसाहेब मांडे दिवंगत झाल्यामुळे निरुपायास्तव त्यांना इंग्रजी शिक्षणाचा नाद सोडून द्यावा लागला " ( पान. ८ ). पुढे त्यांनी इंदूर व नंतर काशी येथे जाऊन संस्कृत व्याकरण व दर्शने यांचे अध्ययन केले. जर त्यावेळी इंग्रजी शाळेतून शिकण्याचा त्यांचा मनोदय यशस्वी झाला असता, तर आपल्या कुशाग्र बुद्धीने व उदंड व्यासंगशीलतेने त्यांनी इंग्रजी शिक्ष-णांतही पारंगत पदवी गाठली असती व काय सांगावे, त्यांच्या जीवनाला परंपरागत वळणाहून कदाचित् निराळे आधुनिक वळण लागले असते !

श्रीधरशास्त्र्यांचे प्राचीन परंपरेप्रमाणे संस्कृत-मधील धर्मशास्त्रांचे व दर्शनांचे अध्ययन झाले होते व त्यातील जीवनतत्त्वज्ञानविषयक विचाराशी ते पूर्णपणे समरस झाले होते. असे असूनही इतर परं-परागत सनातनी पंडिताप्रमाणे ते आधुनिक काला-तील सामाजिक जाणीवा व मानव्यभावना यांच्या-विषयी पराङमुख किंवा उदासीन नव्हते. उलट,



अनुक्रमणिका

ते अत्यंत अभिमुख व जागरूक होते याचे प्रत्यंतर 'अस्पृश्यतेचा शास्त्रार्थ' या त्यांच्या ग्रंथावरून दिसून येते. हिंदु समाज व धर्म यावरील अस्पृश्यतेचा कलंक धुवून काढण्याकरिता बद्धपरिकर झालेले म. गांधींसारखे नेते यांना, 'अस्पृश्यतेला शास्त्रात आधार नाही' असे आपल्या ग्रंथद्वारे दाखवून, म. म. श्रीधरशास्त्री यांनी शास्त्रोक्त पाठिंबा देण्याचे सनातनपंडितांमध्ये विरळाच दिसून येणारे महान धैर्य दाखविले. 'वचनात् प्रवृत्तिः वचनात् निवृत्तिः' अशी त्यांची प्राचीन धर्मशास्त्रावरील निष्ठा होती. पण ही त्यांची निष्ठा किती मानव्याभिमुख, व डोळस होती हे अस्पृश्यतानिवारण, पतितपरावर्तन, सकेशा विधवेला पांडुरंगाच्या मूर्तीला स्पर्श करण्याचा हक्क इत्यादि बाबतीत त्यांनी वेळोवेळी व्यक्त केलेल्या परिवर्तनवादी व प्रगतिशील विचारांवरून स्पष्ट होते.

म. म. श्रीधरशास्त्री धर्मशास्त्रे, वेदान्त आदि प्राचीन भारतीय संस्कृत वाङमयात इतके घोळले होते की आपले जीवन त्या धर्मशास्त्रातून व दर्शनातून वर्णिलेल्या धर्मनिष्ठ, ज्ञानी पुरुषाप्रमाणे व्यतीत करावे अशी त्यांना तळमळ होती. आरंभी काशीला त्यांनी व्याकरणाचे अध्ययन करून 'व्याकरणाचार्य' ही पदवी मिळविली. तोपर्यंत त्यांनी वेदान्ताचे अध्ययन केले नव्हते. वेदान्ताच्या अध्ययनाकडे त्यांना प्रवृत्त करण्यास डॉ. ॲनी बेझंट कशा निमित्त झाल्या याचे वर्णन या चरित्रात आलेले (पान १४२) उद्बोधक आहे. या निमित्ताने एकदा वेदान्तशास्त्राच्या अध्ययनाकडे वळल्यावर त्यांनी तळमळीने व परिश्रमशीलतेने त्यात पारंगतता मिळविली एवढेच नव्हे तर त्यातील जीवनादर्श आपल्या जीवनात बाणवण्याचा प्रयत्न केला. त्याप्रमाणे त्यानी वयाच्या ५५ व्या वर्षी (१९३३ साली) वानप्रस्थाश्रमाची व ६३ व्या वर्षी (१९४१ साली) संन्यासाची दीक्षा घेतली. 'रेवातीरे तपः कुर्यात्' या वचनाप्रमाणे गृहत्याग करून बारा वर्षे त्यांनी नर्मदातीरी वास्तव्य केले व 'मरणं जाह्नवीतटे' या वचनानुसार आपला मनोरथ पूर्ण व्हावा म्हणून (१९४९ सालापासून) ७१ व्या वर्षी ब्रह्मावर्ताला जाऊन राहिले व १९६० साली ब्रह्मीभूत होईपर्यंत ते तेथेच होते. संन्यासदीक्षेनंतर त्यांच्या परम विरक्तीची खूण अशी की त्यांनी सरकारकडून चालू असलेले पेन्शनही घेणे बंद केले. आपणास ज्ञानाने जीवन्मुक्ति लाधावी, साक्षात्कार व्हावा अशी त्यांची अखेर-अखेरच्या वर्षातील तळमळ होती. व अशा साक्षात्काराचा अनुभव त्यांना एकदा वयाच्या ६१ व्या वर्षी व दुसऱ्यादा ७० व्या वर्षी आला असे या चरित्रग्रंथात नमूद केले आहे. त्यांच्या पाठकघराण्यात संन्यासाश्रम स्वीकारणारे श्रीधरशास्त्री हे तिसरे होत. यांचे पंजोबा व त्या पंजोबांचे पंजोबा यांनीही संन्यास घेतला होता.

म. म. श्रीधरशास्त्री यांच्या जीवनचरित्राचा विचार करताना त्यांचेच साधारण समकालीन होऊन गेलेले म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर व नारायणशास्त्री मराठे ऊर्फ स्वामी केवलानन्द यांच्या जीवनचरित्रांची आठवण झाल्याशिवाय रहात नाही. हे दोघेही भारतीय संस्कृतीतील धर्मशास्त्रें व वेदान्तादि दर्शने यातून प्रकट होणारा प्राचीन जीवनादर्श आपापल्या जीवनात आत्मसात् करण्याचा प्रयत्न करणारे होते. वासुदेवशास्त्री अभ्यंकर गृहत्याग न करता गृहस्थाश्रमात राहून शेवटपर्यंत अध्यापन व ग्रन्थरचना करीत राहिले. स्वामी केवलानन्दांनी संन्यासाश्रम स्वीकारल्यानंतरही आपली कर्मभूमि न सोडता, मीमांसाकोशासारख्या ग्रंथांचें रचनाकार्य अखेरपर्यंत चालू ठेवले. म. म. श्रीधरशास्त्री यांनी सेवानिवृत्तीनंतर १९३१ साली 'सरस्वतीपाठशाळा' ही संस्था काढली, व तिचे कार्यही जोरात चालू केले. परंतु त्यांनी पुढे आपल्या गृहाचा व कर्मभूमीचा त्याग करावयाचे ठरविले व अधिकाधिक विरक्त होऊन संन्यास घेऊन सर्वसंगपरित्यागपूर्वक निवृत्त जीवन व्यतीत केले.– भारतीय संस्कृतीतील दोन प्राचीन जीवननिष्ठा–अनासक्त कर्मयोगी प्रवृत्ति व निःसंग मोक्षमार्गी निवृत्ति–यांचे या अलीकडील थोर पुरुषांच्या जीवनचरित्रातून जे थोडे दर्शन घडते त्यामुळे या प्राचीन जीवनादर्शाबद्दल आदर व कौतुक वाटल्याशिवाय रहात नाही.

**– वि. म. बेडेकर**



अनुक्रमणिका








# सार-संकलन

## चिनी बॉम्ब

'हजार बाँब फुलोत': जगाच्या दृष्टीने योग्य आहे त्यापेक्षा अणुबाँब तयार करणे आज सोपे व स्वस्त झाले आहे. बारा वर्षापूर्वी ब्रिटनला अण्वस्त्रांच्या जगात प्रवेश करण्यास २० कोट पौंडस् (अंदाजे २६० कोट रुपये) खर्च आला. त्यानंतर अणुबाँबबद्दलची शास्त्रीय माहिती सर्वत्र फैलावली असून चीनला अणुबाँब तयार करणे ब्रिटनपेक्षा नक्कीच सोपे गेले असेल.

अणुबाँब तयार करण्याची पहिली पायरी म्हणजे ज्यातून स्फोटक अणु निघू शकतील. अशा द्रव्याचा पुरेसा साठा तयार करणे. निसर्गात अशा तऱ्हेचे एकच द्रव्य आहे व ते म्हणजे युरेनियम २३५. पण हे द्रव्य युरेनियम २३८ मध्ये इतके बेमालूमपणे मिसळलेले आढळते व ते वेगळे करून शुद्धावस्थेत आणण्यास जी रासायनिक यंत्रसामग्री लागते, ती तयार करण्यास वैज्ञानिकदृष्टया पुढारलेल्या पाश्चिमात्य राष्ट्रांना-सुद्धा सर्व प्रकारचा ताण सहन करावा लागला. म्हणून चीनने या मार्गाने युरेनियम २३५ चा साठा मिळवला असेल असे वाटत नाही. संहारकशक्तीच्या दृष्टीने कमजोर असलेले प्लुटोनियम, नैसर्गिक युरेनियम पासून तयार करणे फारच सोपे आहे. नैसर्गिक युरेनियमची एका विवक्षित तऱ्हेची व पाहिजे तेवढी मोठी 'पाइल' तयार केली म्हणजे त्यातून प्लुटोनियम तयार करता येते. या क्रीतीकरता लागणारे गणिती व तांत्रिक ज्ञान आज सर्वत्र उपलब्ध आहे.

जुन्या युरेनियममधून ताजा प्लुटोनियम वेगळा करणे ही एक धोकादायक व किरणोत्सर्गी पद्धती आहे. परंतु साध्या रासायनिक तंत्राने सुद्धा हे काम करता येते. साधारणतः पाच पेक्षा जास्त व दहा पेक्षा कमी किलो ग्रॅम्स प्लुटोनियमची स्फोट करण्यास आवश्यकता असते. ५० टन नैसर्गिक युरेनियममधून एवढे प्लुटोनियम काढणे शक्य असते. एखाद्या देशास अणुबाँब बनविण्याची घाई असल्यास युरेनियमची 'पाइल'. बनविण्याच्या भानगडीत न पडता शास्त्रीय संशोधना-करता वापरला जाणारा 'रिॲक्टर' या कामी वापरता येतो.

भारताजवळ अशा तऱ्हेचा 'रिॲक्टर' आहे. इझराइलजवळ पण तो आहे. पुरेसे प्रोत्साहन मिळाल्यास अणुबाँब बनविण्यात थोड्याच दिवसात भारत चीनची बरोबरी करू शकेल. अशा तऱ्हेचा बाँम्ब बनविण्यास फारसा आर्थिक ताण पडत नाही. खरा ताण पडतो, तो हा बाँब फेकण्यास लागणारी यंत्रसामग्री तयार करण्यात. पूर्व युरोपमधील अफवावर विश्वास ठेवला तर चीनने हा बाँब एखाद्या अण्वस्त्राच्या मनोऱ्यावरून उडवला नसून विमानातून फेकून फोडला असे म्हणावे लागेल. अद्ययावत पद्धतीची 'गायडेड मिसलीज' ची संरक्षण फळी फोडण्यास चीनजवळ आहेत त्यापेक्षा कितीतरी पटीने चांगली विमाने लागतील हे मात्र निर्विवाद.

'दि इकॉनॉमिस्ट' लंडन २४-१०-६४

## भारत हुश्शार !

क्रुश्चेव्हच्या पदच्युतीनंतर पंतप्रधान शास्त्री व परराष्ट्रमंत्री सुवर्णसिंग यांनी अनेक क्रेमलिनतज्ञांशी प्रदीर्घ चर्चा केली. व नंतर भारत व रशिया यांचे संबंध नव्या नेतृत्वाखाली दृढतर होतील अशी आशा व्यक्त करणारे पत्रक प्रसिद्ध केले. जगाच्या सर्व राजधान्यातून रशियन प्रतिनिधींची सारखीच वागणूक दृष्टीस पडली. दिल्लीतही रशियन वकीलाने पंतप्रधानांची भेट घेऊन, लेनिनप्रणीत शांतता व सहजीवन या तत्त्वावर आधारलेले धोरणच नवे नेते पुढे चालवतील असे सांगितले.

परंतु लेनिनच्या तत्त्वप्रणालीत शस्त्रास्त्रांचा पुरवठा मंदगतीने करणे, त्यात कपात करणे किंवा थांबवणे या गोष्टी बसतच नाहीत असे नाही. या गोष्टींचा परिणाम चीनच्या अणुबाँब स्फोटामुळे जास्तच भयंकर होण्याची शक्यता आहे. तटस्थतेचे धोरण स्वीकारल्यानंतर अशा तऱ्हेच्या बिकट प्रसंगात कदाचित भारत पहिल्यानेच सापडला जाईल. चीनची अणुशक्ती नजीकच्या भविष्यात फार भयंकर किंवा महत्वाची असणार नाही. परंतु सर्व दक्षिण आशियावर त्याचा भावनिक परिणाम मात्र पुष्कळच झाल्याखेरीज रहाणार नाही. अशा परिस्थितीत आपली संरक्षणफळी मजबूत करण्याची भारत नक्कीच धडपड करील. तसे करताना त्यास पाश्चिमात्य राष्ट्रांवर जास्त जास्तच अवलंबून रहावे लागणार आहे. तटस्थतेचे धोरण ही एक राष्ट्रीय हिताची

गोष्ट म्हणून न मानता भारताने त्याचा तत्त्वतः स्वीकार केला होता; त्यामुळे नव्या परिस्थितीशी जुळवून घेताना त्याची कुचंबणा झाल्याखेरीज रहाणार नाही हे मात्र खरे.

परंतु अशा तऱ्हेची कुचंबणा भारताच्या संरक्षणाच्या वाटेत येणार नाही हे कायरो परिषदेतील भारताच्या वर्तणुकीवरून सिद्ध होते. तटस्थ राष्ट्रांचा टापू हा अणुस्फोटयुक्त टापू असावा या ठरावास पाठिंबा देताना हिंदीमहासागरटापूचा त्यात खास उल्लेख करावा असा आग्रह भारताने धरला नाही. पाकिस्तान सुद्धा सर्व शेजारी राष्ट्रांच्या राजधान्यातून अमेरिकेच्या सातव्या आरमाराच्या हिंदीमहासागरातील परिभ्रमणाविरुद्ध निघालेल्या जोरदार आवाजाशी भारताचा उडवाउडवीचा दृष्टीकोन विसंवादी होता. म्हणूनच लष्करी असमानता नष्ट करण्याकरता पाश्चिमात्य राष्ट्रांनी जर मदत देऊ केली तर भारत ती नाकारील हे शक्य वाटत नाही.

भारताची कायरो परिषदेत झालेली निराशा लक्षात घेता वरील विधानास पुष्टीच मिळते. ही परिषद सुरू झालेल्या दिवसापासून, चीनला अण्वस्त्रांचा निषेध करण्यास प्रवृत्त करण्याकरिता एक शिष्टमंडळ पाठविण्यात यावे अशी भारतीय प्रतिनिधींची खटपट चालली होती. परंतु बहुसंख्य राष्ट्रे चीनला नाखूष करण्यास तयार नसल्यामुळे या सूचनेस पाठिंबा मिळाला नाही.

त्यानंतर चीनच्या अणुबाँब स्फोटाचे तीनच दिवस अगोदर भारताने आपली सूचना संयुक्त राष्ट्रसंघाकडे नली. अण्वस्त्रांचा प्रचार कसा थांबवता येईल याबद्दल जनरल असेंब्लीने काही तरी मार्ग काढावा असे भारताचे म्हणणे. प्रचाराच्या दृष्टीने अशा तऱ्हेच्या ठरावास महत्त्व असले तरी नुसत्या पोकळ ठरावाने आशियात सत्तासमतोलता प्रस्थापित होईल अशी आशा करणे व्यर्थ आहे. म्हणूनच आपले नैतिक वक्तव्य दोन तऱ्हेने मजबूत करण्याची भारताची इच्छा आहे. एक तर आपली संरक्षणक्षमता वाढवणे व दुसरे म्हणजे चीनच्या सत्तेस शह देणाऱ्या कोणत्याही व्यवस्थेस गर्भित अर्थाने (जरूर पडल्यास उघडपणेसुद्धा) मान्यता देण्यास तयार होणे.

चीनच्या अणुबाँब स्फोटाने भारतात बाँब तयार करण्याची मागणी जोरात पुढे येऊ लागली आहे. सध्या शांततेकरता वापरली जाणारी अणुशक्ती बाँब तयार करण्यास वापरल्यास भारत दीड वर्षात बाँब तयार करू शकेल असे म्हटले जाते. पण जेव्हा जेव्हा बाँब तयार करण्याची गोष्ट निघते तेव्हा तेव्हा दिल्ली आपला अण्वस्त्रविरोध चटकन जाहीर करते. आता संरक्षणाला अधिक महत्त्व येणे क्रमप्राप्त आहे व त्यामुळे दिल्लीचे मत बदलल्यास नवल नाही. आधीच तणातणीच्या अर्थव्यवस्थेस हा नवा ताण कितपत सहन होईल ही मात्र विचार करण्यासारखी गोष्ट आहे.

— 'दि इकॉनॉमिस्ट' लंडन २४-१०-६४

## आक्टोबर १९६४ ची रशियन क्रांति

### क्रुश्चेव्ह कसा पडला

विरोधकांनी एक गट निर्माण करून क्रुश्चेव्हला पदच्युत केले. परंतु त्याच्या ऱ्हासाचे मुख्य कारण म्हणजे, त्याचे परराष्ट्रीय धोरण लष्करी खर्चात कपात करण्यास उपयुक्त ठरले नाही हे होय. त्यातच अंतर्गत आर्थिक अडचणीमुळे जीवनोपयोगी वस्तूंच्या उत्पादनाविषयी जनतेला दिलेले वचन त्याला पाळता आले नाही. घरची आघाडी मजबूत नसल्यामुळे परराष्ट्रधोरणातील महत्त्वाच्या आणीबाणीच्या वेळी —चीनशी असलेले संबंध तुटून आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीस तडा जाण्याच्या वेळी— तो टिकाव धरू शकला नाही.

आंतरराष्ट्रीय राजकारणातील सहजीवनाच्या धोरणाच्या पुरस्काराचा फायदा, राष्ट्रीय जीवनात क्रुश्चेव्हला उठवता आला नाही. १९६१ साली लष्करी खर्च पुन्हा वाढवावा लागला. त्यातच शेतीच्या धंद्यात नुकसान सोसावे लागल्यामुळे, लोकांचा कल्याणकर्ता म्हणून कमविलेले नावही बद्दू झाले. गेलेली प्रतिष्ठा पुन्हा मिळविण्याकरिता त्याने जनतेला नवी वचने देण्याचा सपाटा लावला. गेल्या महिन्याच्या शेवटी सरकारी अधिकारी व पक्षनेते यांचे सभेत १९६४ सालची पिके चांगली आली असून त्यामुळे जनतेची परिस्थिती सुधारेल अशी ग्वाहीही त्याने दिली. पण लोकप्रियता परत मिळवण्याची ही संधी



अनुक्रमणिका







त्यास फार उशीरा मिळाली. लष्करी गोटातील विरोध वाढतच राहिला. संरक्षण सामर्थ्यात व 'मिसिलीज' तयार करण्यात पाश्चिमात्य राष्ट्रे व रशिया यांचेतील अंतर वाढत असल्याची या गोटास चिंता लागली होती.

त्याच्या परराष्ट्रीय धोरणावर दोन्ही बाजूने हल्ले होण्याची शक्यता निर्माण झाली होती. काही लोकांना त्याच्या धोरणाबद्दल पहिल्यापासूनच शंका होती. परंतु अलीकडे मास्कोतील सहजीवनवाल्या राजधुरिणांनासुद्धा क्रुश्चेव्हचे धोरण पाश्चात्यांच्या पथ्यावर पडत आहे असे वाटू लागले होते. पाश्चात्त्यांना सहजीवन पाहिजे होते. त्यांची रशियाबरोबर दोस्तीचा तह करण्याची तयारी नव्हती. उलट सहजीवनाबरोबर लष्करी सामर्थ्य वाढविण्याची खटपटही चालू होती. इटालियन कम्युनिस्ट पक्षाचा नेता सिनॉर टोग्लिअनि याने "आंतरराष्ट्रीय परिस्थिती दिवसेंदिवस बिघडत चालली असता चीनच्या मदतीशिवाय तुम्ही ती कशी सावरणार?" असा स्पष्ट सवाल केला होता. कदाचित् अनेक महत्वाच्या रशियन नेत्यांनापण तसे वाटत असण्याची शक्यता आहे. निदान मिकोयानला ही काळजी वाटू लागली होती. कारण सहजीवनाचा क्रुश्चेव्ह इतकाच पुरस्कार करूनही नव्या नेत्यांच्या अधिकारग्रहणाची पूर्व तयारी करण्यास त्याची बरीच मदत झाली असे बोलले जाते.

१५ डिसेंबरला जागतिक कम्युनिस्ट परिषदेची तयारी करण्याकरता बोलावण्यात आलेल्या प्राथमिक सभेत रशिया-चीन वाद पुन्हा जोरात डोके वर काढणार हे तात्कालिक कारणही क्रुश्चेव्हच्या विरोधकांना मिळाले. त्याचे दोष दाखवून त्याला बाजूस सारणे त्यांना कठीण नव्हते. त्याचा आततायीपणा, बडबडण्याची सवय, बेजबाबदार वर्तन, आप्तस्वकीयांचे बाबतीतील स्वार्थ (विशेषतः जावयाच्या कारवाया)' व स्वतःची वैयक्तिक प्रतिष्ठा वाढवून 'क्रुश्चेव्ह कल्ट' निर्माण करण्याची कोशीस ही सर्व हत्यारे त्याचे विरुद्ध वापरण्यात आली.

## क्रुश्चेव्हचे कर्तृत्व

निकिता क्रुश्चेव्ह हा ग्रामीण व नागरी रशियाचा खरा प्रतिनिधी होता. कारण तो स्वतः अर्धा शहरी तर अर्धा खेडूत होता. परंतु बदलत्या युगातील नेता होता हे विशेष होय. स्टालीनच्या पंचवीस वर्षांच्या एकछत्री कारकीर्दीनंतर रशियन राज्यकारभाराच्या पद्धतीत आमूलाग्र बदल करण्याची गरज त्यास स्पष्ट दिसत होती. परंतु मृत हुकूमशहाचा अनुयायी असल्यामुळे व त्याच्याच तालमीत तयार झाल्यामुळे स्वतःला पटत असलेल्या सुधारणा करण्यास तो तयारही नव्हता व समर्थही नव्हता. त्याची पार्श्वभूमी लक्षात घेता त्याने केलेल्या एवढ्या सुधारणाच फार झाल्या असे म्हणावेसे वाटते. १९५५ साली मेलेंकॉव्हला पदच्युत करताना मोठे उद्योगधंदे व लष्करीसामर्थ्य वाढविणाऱ्या गटाचा कैवारी म्हणून तो सत्तारूढ झाला. अण्वस्त्रांनी फक्त मांडवलदार जगाचाच नाश होईल असेही त्याने प्रतिपादले होते. चीन व त्याचे पाठिराखे आज तेच बोलत आहेत. व त्यामुळे रशियाचे परराष्ट्रीय व अंतर्गत धोरण बरेच कडक होईल असे त्यावेळी सर्वास वाटत होते. परंतु वर्षा-दोन वर्षातच त्याने मेलेंकॉव्हचे धोरण स्वीकारले—नव्हे—मेलेंकॉव्हलाही 'सुधारणा', 'शांतता' व 'सुबत्ता' यांच्या घोषणात मागे टाकले.

क्रुश्चेव्हच्या कारकीर्दीत झालेल्या सर्वच सुधारणांची सुरवात त्याने केलेली नाही. तर अनेक वेळा काळाची पावले ओळखून त्याने या सुधारणांना अचूक वेळी आपला पाठिबा मोठ्या नाटयपूर्ण रीतीने देऊन श्रेय मात्र मिळविले. याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे त्याचे विसाव्या काँग्रेसपुढील स्टालीनविरोधी भाषण. या भाषणाने स्टालीनवादी कम्युनिस्ट जगाला हादरे बसले, पोलंडने आपले स्वातंत्र्य प्रस्थापित करण्यास सुरवात केली तर हंगेरीमध्ये बंड झाले. स्टालीननंतर गुंतागुंतीच्या होत चाललेल्या आर्थिक व्यवहारासाठी उद्योगधंद्यांची व्यवस्था व नियोजन यांची पुनर्रचना करणे आवश्यक होते. रशियन शेतीला भूतकाळातून भविष्यात खेचणे जरूर होते. रशियन जनतेच्या अनेक वर्षांच्या खडतर परिश्रमांचे चीज होण्यासाठी या गोष्टी करणे अपरिहार्य होते. जनता आता उतावीळ होऊ लागली होती. पण रशियन जनतासुद्धा नुसत्या भाकरीवर जगत नाही कॉसेंट्रेशन कॅम्पस्मधून सुटलेले अनेक राजबंदी व नव्याने सुशिक्षित झालेली तरुण पिढी यांना स्टालीनचे पोलादी चिलखत असह्य



अनुक्रमणिका






झाले होते. नागमोडी वळणे घेत, काही वेळा भूतकाळाशी ताटातूट करण्याचा प्रयत्न करीतही क्रुश्चेव्हेने रशियास सुधारणांच्या मार्गावर आणून सोडले.

परराष्ट्रीय धोरणातसुद्धा त्याने आपली सुरवातीची भूमिका सोडून दिली. १९५७ साली स्पुटनिकच्या प्रक्षेपणाने रशियाजवळ अण्वस्त्रांच्या क्षेपणास लागणारी सर्व यंत्रसामुग्री आहे हे सिद्ध केले. त्याचाही कम्युनिस्ट जगाच्या दुफळीवर परिणाम झाल्याखेरीज राहिला नाही. या सर्वनाशी शस्त्रांच्या छत्राखाली जागतिक क्रांतिकारी चळवळी चालवाव्यात असे क्रुश्चेव्हचे मत नव्हते. उलट अशा तऱ्हेची शस्त्रे बाळगणाऱ्या दुसऱ्या सत्तेशी-अमेरिकेशी- आयझनओव्हर, केनडी, जॉन्सन यांचेशी समझोत्याचेच धोरण स्वीकारणे त्यास योग्य वाटत होते. वैयक्तिक मुत्सद्देगिरीवर थोडासा हृदय हेलावणारा विश्वास ठेवून नवागताच्या हिरीरीने, क्वचित प्रसंगी मागसराष्ट्रातील क्रांतिकारक शक्तींना मुरड घालूनसुद्धा त्याने वाशिंग्टनशी आपले संबंध सुधारण्याचा आटोकाट प्रयत्न केला. त्यामुळे चीनशी संबंध बिघडू लागले. कारण अमेरिका म्हणजे चीनचा पहिल्यानंबरचा वैरी व आफ्रिका व आशिया ही मुख्य युद्धभूमी. ही दोन बलाढ्य कम्युनिस्ट राष्ट्रे एकमेकास शिवीगाळ करू लागताच जागतिक कम्युनिस्ट चळवळीचा पायाच हादरला गेला.

या सर्व गोष्टींमुळे क्रुश्चेव्हच्या कारकीर्दीतील रशियाचे धोरण फारसे सुसंगत नाही. १९६२ सालचे क्युबा प्रकरण अघटित वाटते. अन्तर्गत धोरणात चुका व त्यांची दुरुस्ती वारंवार सापडते. औद्योगिक व्यवस्थापनेत पहिल्याने स्थानिक पुढाकारास उत्तेजन मिळाले; तर काही काळाने केन्द्रीय निर्बंधास प्राधान्य मिळाले. नियोजनात थोडीफार ढवळाढवळ झाली पण त्यात मूलभूत फरक केला गेला नाही. शेतीचा प्रश्न सोडवण्यात मक्याचे पीक काढण्यासारखी चटकन होणारी गोष्ट किंवा पडिक जमिनीची लागवड करण्यासारखी कष्टदायक पद्धत यांचा त्याने अवलंब केला. पण त्यामुळे रशियन शेती सुधारली नाही. लेखकांचे बाबतीतही स्पष्ट, स्वतंत्र लिहा असा आदेश देऊन पुन्हा गप्प करण्याचे वारंवार निघणारे हुकूम क्रुश्चेव्हच्या सांस्कृतिक बाबतीतील धरसोडीच्या धोरणाचे द्योतक होत.

या सर्वातून क्रुश्चेव्ह वाट काढण्याचा प्रयत्न करीत होता. सुसंस्कृत तरुण पिढीला त्याची बागणूक अडाणीपणाची किंवा त्याचा तिरसटपणा अप्रगल्भ वाटत असेल. परंतु बदलत्या राजवटीचा प्रतिनिधी म्हणून त्याचे सर्वत्र स्वागत झाले. त्याचे धोरण लोकप्रिय असल्यामुळे त्याचे स्टालीनवादी विरोधकही त्याचेवर उघड हल्ला करू शकले नाहीत. शेवटची वेळ सोडल्यास प्रत्येक वेळी शिशाच्या बाहुल्याप्रमाणे कसाही फेकला तरी तो ताठ उभा राहू शकत होता.

## नव्या नेत्यांची परीक्षा

क्रुश्चेव्हला एका गटाने पदच्युत केले. पक्षाचे सरचिटणीसपद लिओनिड ब्रेझिनेव्ह यांचेकडे आले आहे. क्रुश्चेव्हप्रमाणेच ब्रेझिनेव्ह युक्रेनमधील पक्षसंघटनेतून वर चढला आहे. १५ जुलैला औपचारिक असलेली राष्ट्रप्रमुखाची जागा मिकोयानकडे जाऊन क्रुश्चेव्हचा वारस म्हणून ब्रेझिनेव्ह पुन्हा चिटणीसमंडळात दाखल झाला. खरोखरच प्रकृति बिघडल्यामुळे जर क्रुश्चेव्हला सेवानिवृत्त व्हावे लागले असते तर ब्रेझिनेव्ह किंवा कोसिजीन या दोहोंपैकी एकासच त्याची जागा मिळाली असती. दोघांच्यातील चुरस संपली नाही. परंतु पुढील प्रश्न मात्र दोघांनाही टोलवता येणार नाहीत.

## रॉकेट की रेफ्रिजरेटर

देशाच्या आर्थिक प्रश्नावर लवकरच निर्णय घ्यावा लागेल. स्थानिक व्यवस्थापकांना किती स्वातंत्र्य द्यावयाचे हा वाद चालूच रहाणार. परंतु आर्थिक विकासात कोणत्या गोष्टींना प्रामुख्य द्यावयाचे हे निश्चित करावे लागेल. लहान उद्योगधंद्यातील तज्ज्ञ कोसिजीन, जर क्रुश्चेव्हने दिलेले जीवनोपयोगी वस्तू पुरवण्याचे वचन पाळणार असला, तर मोठ्या उद्योगधंद्यांना व लष्करी सामुग्रीच्या उत्पादनाला आळा घातला जाईल व पूर्व पश्चिम संबंध पूर्वीसारखे सुधारणेच्या मार्गावर रहातील. असे झाले तरच रशियाचे सध्याचे परराष्ट्रीय धोरण चालू आहे हे सिद्ध होईल. नक्की धोरण काय ठेवावयाचे याचा निर्णय मात्र नव्या नेत्यांना नजीकच्या काळातच






अनुक्रमणिका





घ्यावा लागेल. सध्या चालू असलेल्या सप्तवार्षिक योजनेचा काळ संपत आला आहे. नव्या योजनेचा आराखडा सादर करण्याकरता १९६५ साली पक्ष परिषद बोलवावी लागेल.

या बाबतीत धोरण बदलले की काय हे ठरवणे कठीण आहे. काही महिन्यापूर्वी स्लोझेन्त्सिन या ख्यातनाम रशियन लेखकाने रशियातील जीवनाच्या घृणास्पद बाजूचे वर्णन मोकळेपणाने केले होते. परंतु इव्हतुशेंकोसारखे तरुण कवी मात्र बरीचशी संरक्षणात्मक भूमिका घेताना दिसतात.

थोड्याच दिवसापूर्वी क्रुश्चेव्हचा वारस म्हणून गणला जाणारा कोझलाव्ह सांस्कृति कबाबतीत सनातनी होता हे सर्वश्रुत आहे. पण गेल्यावर्षी मेंदूत रक्तस्राव झाल्यामळे तो बाजूस पडला. नंतर त्याचे काय झाले ते समजलेच नाही. नवे पुढारी सांस्कृतिक बाबतीत काय धोरण ठेवतात ते अजून दिसावयाचे आहे. परंतु जनतेच्या मताची दखल त्याना घ्यावी लागेल व मानसिक स्वातंत्र्याकडे आगेकूच करावी लागेल असे भविष्य बिनधोक वर्तवण्यात चूक होणार नाही. आंतरराष्ट्रीय प्रश्न मात्र जास्त गुंतागुंतीचे आहेत.

## सहजीवन कोणत्या प्रकारचे ?

ब्रेझिनेव्हसुद्धा सर्व रशियन नेते सहजीवनाचे धोरण कायम राहील असा दिलासा पाश्चिमात्य राष्ट्रांना देत आहेत. पेकिंगशी दुरावलेले संबंध पुन्हा जोडणे हेही या नव्या नेत्यांचे उद्दिष्ट आहे. पाश्चिमात्यांचे बरोबर सहजीवन व चीनशी सलोखा या दोन्ही गोष्टी कशा साधणार हे स्पष्ट करावे लागेल. संयुक्त राष्ट्रसंघात सामील झाल्यास व इतर बलाढ्य राष्ट्रांच्या तोडीचा म्हणून गणला गेल्यास चीन आपले धोरण मवाळ करील या युक्तिवादावर तर ते विसंबून रहाणार नाहीत ना ?

क्रुश्चेव्हवर एककल्ली सवलती देण्याबद्दल ठपका ठेवण्यात आला होता. यापुढील रशियाचे धोरण दूरवर मिळणाऱ्या फायद्यावर केन्द्रित न होता तात्कालिक देवाणघेवाणीवर आधारले जाण्याची शक्यता आहे. प्रत्यक्षात रशियाचे जर्मनीविषयीचे धोरण कडक होईल व अनेक राष्ट्रीय लष्करीशक्तींच्या संघटनेस होणारा विरोधही तीव्र होईल. अनेक देशातील लष्कराने बनविलेल्या फौजा अण्वस्त्रांचा प्रसार करण्यास उपयुक्त पडतील असा दावा करून चीनने पहिला अणुबाँबस्फोट केल्यामळे बिकट झालेल्या परिस्थितीत निःशस्त्रीकरणाची बोलणी रशियाला लटकत ठेवता येतील. ( या आठवड्यात रशियन राज्यक्रांतीच्या निमित्ताने केल्या जाणाऱ्या घोषणात अणुबाँबस्फोट बंद करण्याच्या घोषणेचा नामनिर्देश नाही हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. ) पण इंडोचायनासारख्या वादग्रस्तप्रदेशात आपले परस्परविरोधी धोरण पुढे रेटणे मास्कोला जड जाईल. कारण येथील हालचाली नुसत्या पेकिंगवर अवलंबून न रहाता वाशिंग्टनवरही अवलंबून रहातील.

## पेकिंगबरोबर समझोता

जागतिक कम्युनिस्ट पक्ष प्रतिनिधींची परिषद क्रुश्चेव्हबरोबरच बाद झाली; परंतु मास्को व पेकिंग मतभेद मात्र तसे झालेले नाहीत. कदाचित पेकिंगशी असलेले मतभेद जास्त सौम्य शब्दात मांडून दोघांची दोस्ती तुटणार नाही अशी खबरदारी नवे नेते घेतील. (द. गॉलच्या विरोधामुळे नॅटो मोडला नाही—तशा तऱ्हेचे संबंध दोन्ही राष्ट्रात निर्माण होतील.) ही कामगिरी फार कठीण आहे. त्यासाठी पूर्व युरोपियन राष्ट्रांच्या पाठिंब्यावर अवलंबून रहाता येणार नाही. इतर कम्युनिस्ट पक्षांनी मास्कोच्या धोरणाची 'री' ओढण्याचा काळ कधीच संपला आहे. रशियन–पेकिंग समझोत्यासाठी आपला बळी देण्यास युरोपियन कम्युनिस्ट पक्ष तयार नाहीत. व जागतिक कम्युनिस्ट चळवळ म्हणजे मॉस्कोचे हुकूम पाळणारे एकजिनसी, शिस्तबद्ध लष्करही नाही.

## भवितव्य वर्तविणे कठीण

या अस्थिर काळात भविष्य वर्तवणे फार कठीण आहे. नवी सत्तास्पर्धा रशियाचे धोरण क्रुश्चेव्हच्या धोरणापेक्षा जास्त नागमोडी करील. नवा गट फार काळ सत्ताधिष्ठित राहील याचीही खात्री नाही. ब्रेझिनेव्ह क्रुश्चेव्हच्या तालमीत वाढला आहे. प्रमुख नायकाच्या भूमिकेत तो कसा वागेल ? कोसिजीनला पक्षसंघटनेचा व राज्यकारभाराचा जास्त अनुभव असला तरी त्याचे व्यक्तिमत्त्व प्रभावी वाटत नाही. वारस बनण्याची पात्रता असलेल्या पॉडगोर्नीचे काय?








क्रुश्चेव्हवरील हल्ल्याचा मुख्यतांत्रिक सुसलाव्ह किंवा त्याच्या अंतर्गत धोरणावर टीकाहल्ला सोडणाऱ्या डिमिट्री पॉलिनस्की यांचे काय ? या सर्व प्रथम-श्रेणीतील पुढाऱ्यांच्या वयोमानाकडे पहाता नव्या पिढीतील नेते अजून पुढे यावयाचे आहेत असे वाटते. हा संक्रमणकाळ मोठा मनोरंजक आहे हे मात्र निश्चित.

'दि इकॉनॉमिस्ट, लंडन २४-१०-६४

## कम्युनिस्टांचा मास्कोवर मोर्चा

क्रुश्चेव्हला ज्या पद्धतीने गुंडाळण्यात आले त्यात कम्युनिस्ट जगाला स्टालीनवादाचा प्रतिध्वनि ऐकू आला असल्यास नवल नाही. परंतु क्रेमलीनच्या अंतस्थ व्यवहाराबद्दल इतर कम्युनिस्ट जगाने एवढा भयंकर असंतोष व कुतूहल दाखवावे याबद्दल खुद्द स्टालीनला-सुद्धा विषाद वाटला असता. त्यातच ज्यावेळी मॉस्कोची आपल्या अंकित राष्ट्रावरील पकड ढिली पडत आहे त्याचवेळी मॉस्कोचे कम्युनिस्ट जगात अनन्यसाधारण स्थान असल्यामुळे तेथील पक्षाच्या अंतर्गत कारभाराची माहिती आपणास मिळावी असा युरोपियन कम्युनिस्ट पक्ष दावा करीत आहेत. परंतु एका राष्ट्राच्या कम्युनिस्ट पक्षास दुसऱ्या राष्ट्रातील कम्युनिस्ट पक्षाच्या कारभाराविषयी चौकशी करण्याचा हक्क असावा असे मात्र कोणीही प्रतिपादित नाही.

क्रुश्चेव्ह ज्या ठिकाणी गोमुल्काला अनेक वेळा भेटला होता त्याच ठिकाणी ब्रेझिनेव्ह व कोसिजीन त्यास जाऊन नुकतेच भेटले. या भेटीनंतर काही दिव-सांनी ही भेट होऊन 'त्यांचेत संपूर्ण मतैक्य' असल्याचे जाहीर करण्यात आले. परंतु क्रुश्चेव्हच्या पदच्युती-विषयीचे सोव्हिएट निवेदन मानण्यास व त्यास संमति देण्यास इतर पूर्व युरोपियन कम्युनिस्ट राष्ट्रांच्या मानाने (रुमानिया सोडून) पोलंडने बराच काळ लावला असे दिसते. मोंगोलिअन पंतप्रधान त्सेडेनबाल यांच्या सत्कारप्रसंगी केलेल्या भाषणात क्रुश्चेव्हची पदच्युति ही 'पक्षान्तर्गत लोकशाही व लेनिनिस्ट तत्त्व-ज्ञान' यांना धरून आहे असे गोमुल्काने जाहीर केले. अंकित राष्ट्रांपैकी बल्गेरियाने क्रुश्चेव्हचा गौरव करणे टाळले. पूर्व जर्मनी, झेकोस्लाव्हेकिया व हंगेरी येथील पक्षांनी थोडयाशा साशंक मनानेच सोव्हिएट कार-वाईस संमति दर्शविली. पूर्वजर्मनीत ' रशियन पक्षास क्रुश्चेव्हविरुद्ध कारवाई करावी लागली याचाच अर्थ क्रुश्चेव्ह त्याचेवर सोपविण्यात आलेली कामगिरी करण्यास असमर्थ होता असा आहे ' अशा अर्थाचा ठराव पोलाइटब्युरोने केला. झेक पक्षाने क्रुश्चेव्हला काढून टाकले याची नुसतीच दखल घेतली असे नमूद केले. तर हंगेरियन पक्षाने 'हाती आलेल्या बातमी-वरून असे समजते की, प्रकृतिस्वास्थ्य बिघडल्या-मुळे व वय झाल्यामुळे कॉ. क्रुश्चेव्हला आपले काम करणे जड जात आहे असे समजते.' एवढेच पत्रक काढले. त्यांचे हातून चुका झाल्याचे कबूल करून त्याच्या मागील कर्तृत्वा बद्दल गौरवाचे उद्गार या पक्षाने काढले आहेत.

अशा तऱ्हेचे प्रतिध्वनी गोमुल्काशी झालेल्या भेटी-सारख्या अनेक भेटींची जरूरी दर्शवितात. सर्वच पूर्व युरोपियन राष्ट्रांना खाजगीरित्या खुलासा पाठविला आहे. या आठवड्यात होणाऱ्या रशियन राज्यक्रांतीच्या वाढदिवसप्रसंगी जर हे पुढारी हजर राहिले तर या प्रश्नावर साधकबाधक चर्चा होईल हे निश्चित.

पूर्व युरोपच्या बाहेरील कम्युनिस्ट पक्ष मात्र मॉस्कोस जाऊन प्रत्यक्ष काय घडले ते जाणून घ्याव-यास उत्सुक आहेत. फरान्स, इटली, भारत, आस्ट्रिया, पश्चिम जर्मनी व डेन्मार्क या पक्षांचे प्रतिनिधी मॉस्कोत पोचले आहेत. फरेंच व इटालियन प्रतिनिधींनी आपणाला भेटलेच पाहिजे असा आग्रह धरल्यामुळे ते मॉस्कोचे नावडते पाहुणे ठरल्यास नवल नाही.

क्रुश्चेव्हच्या हाकलपट्टीने निर्माण झालेल्या विरोधी लोकमतामुळे फरेंच व इटालियन पक्षाचे नुकसान होणार आहे. यापूर्वी क्रेमलिनमध्ये होणाऱ्या बदला बद्दल फरेंच पक्ष उदास असे. पण या वेळेस पक्षाच्या मध्यवर्ती समितीने 'झालेल्या प्रकाराचा संपूर्ण खुलासा व माहिती' मागितली असून 'सोव्हिएट सेंट्रल कमिटीने हा निर्णय घेण्यात कोणत्या पद्धतीचा अवलंब केला' याबद्दल विचारणा केली आहे. स्टालीनच्या कारकीर्दीत फरेंच पक्षास फरान्समध्ये एकलेपणा भोगावा लागला होता. त्यातून तो पक्ष नुकताच बाहेर पडू लागला आहे. अशा परिस्थितीत कोठलीही धडपड न करता हातचे घालवण्यास फरेंच पक्ष तयार नाही.

इटालियन पक्षाने प्रसिद्ध केलेले पत्रक पण स्पष्ट आहे. रशियन बदलाचे संपूर्ण आकलन होण्याकरता








आणखी माहितीची मागणी त्यात आहे. सोव्हिएट पक्षाच्या 'डिस्टालिनायझेशन' कार्यक्रमात झालेला खोळंबा फक्त क्रुश्चेव्हच्या चुकामुळे व दोषामुळे झाला हे म्हणणे बरोबर नाही असेही त्यात म्हटले आहे. आपल्या खाजगी गोष्टीवर इतकी स्पष्ट टीका करणाऱ्या इटालियन प्रतिनिधींना मुलाखत देताना नव्या नेत्यांना आपल्या भ्रातृभावाची शिकस्त करावी लागेल. क्रेमलिनला इतका कडक विरोध करण्यास इटालियन पक्ष तयार झाला याचाच अर्थ रशियात झालेल्या घडामोडींमुळे इटालीतील त्यांच्या चालत्या गाड्यात खिळा घातला जाईल अशी फार मोठी भीती उत्पन्न झाली आहे असे वाटते.

इटालियन पक्षास मतदारांना खूष करावे लागते. त्यांच्या राजकीय व कामगार चळवळीतील विरोधकांनी क्रुश्चेव्हच्या पदच्युतीचा भरपूर फायदा घेण्यास सुरवात केली आहे. नव्या रशियन नेत्यांनी नुकत्याच झालेल्या घटनांसंबंधी योग्य खुलासा दिला नाही तर २२ नोव्हेंबर रोजी होणाऱ्या स्थानिक निवडणुकीवर परिणाम झाल्याखेरीज रहाणार नाही अशी पक्षास साधार भीती वाटत आहे.

नव्या सोव्हिएट सत्तेस पाठिंबा देण्यात उडालेल्या खळबळीमुळे चीनचा प्रश्न थोडासा मागे पडला आहे असे दिसते. रशियाने सध्या चीनवर उघडउघड हल्ला करण्याचे सोडून दिले असले तरी ते चीनशी असलेल्या मतभेदाबद्दल मूग गिळून स्वस्थ आहेत. माऊ-त्से तुंगच्या 'हार्दिक शुभेच्छा' बद्दल अजून काहीही प्रतिक्रिया व्यक्त करण्यात आलेली नाही. 'क्रुश्चेव्हची पदच्युति एक चांगली घटना आहे या चाऊ-एन-लायच्या भाष्याशिवाय चीनची प्रतिक्रिया पण समजलेली नाही. 'क्रुश्चेव्हचा ऱ्हास म्हणजे त्याच्या धोरणाचा ऱ्हास नव्हे' या अल्बानियाच्या इशाऱ्यास चाऊ-एन-लायचा पाठिंबा मिळण्याची शक्यता आहे. रशियाने सवलती देऊ केल्यामुळे पेकिंग व मॉस्कोत समझोता होण्याची शक्यता आहे हे युगोस्लाव्हियाचे म्हणणे कितपत खरे आहे हे अजमावणे कठीण आहे.

१५ डिसेंबरची मॉस्कोतील बैठक रद्द होईल की काय हे अजून स्पष्ट नाही. कदाचित ही बैठक होईलही. परंतु त्यात चीनशी समझोता कसा करावा यावरच चर्चा होण्याची शक्यता जास्त आहे. (गोमुल्काच्या भाषणात यावरच भर होता.) इझवेस्ताच्या पहिल्या पानावरील संपादकीयात आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीत व पक्षात एकजूट असावी असे प्रतिपादले असून चीनी किंवा इतर कोणत्याही फुटीर पक्षावर ताशेरे झाडलेले नाहीत. चीनला सर्व वाटा मोकळ्या करून देण्याऐवजी थोड्याफार सवलती देऊन कम्युनिस्ट जगास व चळवळीस गेलेले तडे सांधता आले तर बरे असे नव्या रशियन नेत्यांना वाटत असेल.

— दि इकॉनॉमिस्ट ३१-१०-६४





अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

॥श्री॥

# दि बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेट लिमिटेड, पुणें-२

म्हणोनि सद्भाव जीवगत । बाहेरि दिसती फांकत ॥
स्फटिक गृहींचे डोलत । दीप जैसे ॥ -श्री ज्ञानेश्वरी

कै. चंद्रशेखर गोविंद आगाशे यांनीं स्थापिलेल्या व अहर्निश कष्ट करून वाढविलेल्या या साखर कारखान्याची सतत वाढ होण्यासाठीं संचालक मंडळ सदैव प्रयत्न करीत आहे.

*स्पिरिटच्या नवीन मोठ्या मशिनरीच्या इरेक्शनच्या कामास सुरवात झाली असून, डिसेंबरमध्यें वाढत्या उत्पादनास सुरवात होईल व स्पिरिटचे वार्षिक उत्पादन बारा लाख गॅलन पर्यंत होईल.*

◇◇◇◇ ◇◇◇◇ ◇◇◇◇

**येत्या हंगामाचे साखरेच्या उत्पादनास नोव्हेंबर मध्यें सुरुवात होईल.**

आमचे ठेवीदार, भागीदार व हितचिंतक यांना ही

**दिवाळी व नूतन वर्ष सुखसमृद्धीचे व भरभराटीचे जावो.**

-संचालक मंडळ-

श्री. शं. ल. लिमये, बी. एस्सी., एल्एल्. बी., वकील
अध्यक्ष

श्री. भ. ग. भाडुले,
बी. एस्. सी. एल्एल्. बी, वकील

श्री. रा. मा. देशमुख, एम्. ए.,
एल्एल्. बी., बार. अॅट्. लॉ, एम्. पी.

श्री. वि. कृ. साठे, बी. ए. (टिळक)
माजी पुरवठा मंत्री. (मुंबई राज्य)

श्री. ग. ह. सबनीस

श्री. श्री. र. केसकर, अॅडव्होकेट

श्री. ज. चं. आगाशे

श्री गो. न. जोशी, बी. एस्सी.

श्री. रा. ह. केळकर, बी. कॉम.,
एफ. सी. ए.

श्री. गो. श्री. वाळिंबे, बी कॉम., ऑफिशिएटिंग मॅनेजर.




